गुणलुब्धाः स्वयमेव संपदः ।

# महाराष्ट्र-कुटुंब-माला

## पुष्प १३ वें

# मातृसेवा



लेखक

श्रीयुत नारायण विनायक कुलकर्णी.

आक्टोबर १९२८.

किंमत एक रुपाया

संपादकः—नारायण विनायक कुलकर्णी,
प्रकाशकः—विठ्ठल रामचंद्र खाडीलकर,
मालक, श्रीदत्त एजन्सी, ३९१ नारायण पेठ पुणें शहर.

महाराष्ट्र कुटुंब-माला
चौथ्या वर्षाचें
दुसरें पुष्प
जानेवारी १९२९ मध्यें
प्रसिद्ध होईल.

मुद्रकः—गणेश काशिनाथ गोखले,
सेक्रेटरी, श्री गणेश प्रिंटिंग वर्क्स,
४९५-४९६ शनवार, पुणें.

# समर्पण

आई,

ठेंच लागली किंवा मनाला त्रास झाला की देवाऐवजीं ' आई ! आई !' अशा तुलाच मन हांका मारीत असतें. तुझ्याचकडून सुखाची अपेक्षा करीत असतें. पण स्वतः आनंदांत असतांना तुझी आठवणही त्याला होत नाहीं; असें द्वाड, खट्याळ, मूर्ख ओढाळ मन आहे. आईची सेवा म्हटली, आईला सुख द्यायचें म्हटलें की बसल्याच कपाळाला आठ्या ! असें अधः-पतित मन आहे. त्यामुळें तुला सुख देण्याची कल्पनाही त्याला शिवत नाहीं ! परंतु संकटाची परमावधी झाली म्हणजे मग तुझी आठवण येते आणि वाटतें की आईला कधींच सुखदेण्याची कल्पनाही येऊं दिली नाहीं, त्याचें हें कटु फळ आहे. अशा वेळींच कांहीं तरी कायिक, मानसिक, वाचिक, आईविषयीं निदान सद्‌बुद्धी बाळगावी असें वाटतें. त्याप्रमाणेंच प्रस्तुत प्रसंगीं झालें आहे. मनाच्या याच वृत्तीनें विनता मातेची गरुडानें केलेल्या पावन सेवेची पुराण-कथा बोबड्या बोलांनीं गाईली. बोल बोबडे आहेत. पण तेच आईला अधिक आवडतात; त्यांत अंतःकरणाची खरी तळमळ असली म्हणजे आईच्या आनंदाला पारावार रहात नाहीं. माझे हे बोबडे बोल तुलाही तसेच आवडतील—मला तुझ्या सेवेला समर्थ करतील याच आशेनें तुझ्या पावन चरणीं हे बोबडे बोल समर्पण करीत आहें.

तुझा अज्ञ बालक

—नाना

# चौथ्या वर्षाची सुरुवात

श्री. नारायणराव कुळकर्णी यांनीं लिहिलेल्या “ मातृसेवा ” या पुस्तकानें मालेचा नवा वाढदिवस साजरा होत आहे. तीन वर्षाच्या वयांत मालेनें कोणकोणतीं दुखणीं काढलीं आणि तशाही स्थितींत आपल्या उपजत बाललीलांनीं वाचकांना कसें रंजविलें हें सर्वश्रुतच आहे. मालेची पूर्व पुण्याईच चौथा वाढदिवस आनंदानें साजरा करावयास पाठीशीं उभी आहे.

चौथ्या वर्षाच्या आरंभापासून ‘ मालें ’त अंतर्बाह्य बऱ्याच सुधारणा करावयाच्या, परंतु तसा योग—तशी शक्ति—अजूनही तिच्यांत नाहीं, हें जरी खरें, तरी अंतरंगांत पूर्वीहून अधिक सुधारणा होत असल्याचें प्रस्तुत पुस्तक पाहून सहृदय आश्रयदाते कबूल करतील असा भरंवसा वाटतो.

कादंबरींतील प्रसंगविशेषांचीं चित्रें द्यावयाचा संकल्प असून त्याचा उपक्रम या पुष्पापासून झाल्याचें दिसून येईल. या खेपेस पुस्तक लेखकाचें छायाचित्र त्यांची अनिच्छा दिसल्यावरून देण्यांत आलें नाहीं.

चौथ्या वर्षांत तिसरें पुष्प ‘ कौटुंबिक गोष्टी ’ या नांवानें लघुकथांचा संग्रह देण्यांत येणार आहे. यांत महाराष्ट्रांतील महशूर झालेले लघुकथा—लेखक मिळविण्यांत येणार आहेत. यापेक्षां या वर्षी अधिक सुधारणा करतां येईलच असें आजच सांगतां येत नाहीं.

प्रस्तुत पुस्तकांतील देखाव्याचें छायाचित्र श्रीसमर्थ नाटक मंडळींतील सुप्रसिद्ध नट व मालक श्री. दत्तोपंत वैशंपायन, व नट श्री. बापट, यांनीं दिल्याबद्दल त्यांचे, व छायाचित्र सुन्दर घेऊन दिल्याबद्दल फोटोग्राफर मेसर्स एस्. जी. नाईक आणि कं. चे आभार मानणें जरूर आहे. माझे मित्र श्री. सदाशिवराव वैशंपायन, महाराष्ट्र लिथो प्रेस, यांनीं लीथोचें सुंदर कव्हर हौसेनें करून दिल्याबद्दल, यांचेही आभाराचा उल्लेख नमूद करणें मालेचें कर्तव्य आहे.

## मातृसेवा

सीमोल्लंघनाच्या सुमुहूर्तावर मातृसेवेची कांस धरून सत्कृत्यें हातून अधिक घडोत या इच्छेनें विचाराविचारांचें माला सीमोल्लंघन करीत आहे. तें मालेला आणि मालेच्या प्रिय आश्रयदात्यांना सारखेंच श्रेयस्कर होवो अशी श्री गुरुचरणीं नम्र प्रार्थना आहे.

महाराष्ट्र–कुटुंब–माला,
३९१ नारायण पेठ पुणें.
विजयादशमी ता. २३।११।२८.

आश्रयदात्यांचा कृपाभिलाषी,
विठ्ठल रामचंद्र खाडिलकर

---

# प्रस्तावना

प्रस्तुत कादंबरीला प्रस्तावना लिहिण्याबदल मी माझे सन्मित्र **प्राच्य-विद्यालंकार** श्री. श्री. ना. उर्फ आप्पासाहेब ताडपत्रीकर बी. ए. यांना विनंती केली होती. प्रस्तावनेऐवजीं त्यांनीं पत्र पाठविलें, व प्रास्ताविकाची जबाबदारी त्यांनीं माझ्यावर सोंपविली. तेव्हां, प्रथम त्यांचें पत्र जसेंच्या तसें द्यावें व त्यानंतर आपलें प्रास्ताविक जोडावें असें ठरविणें भाग पडलें. त्याप्रमाणें यापुढें श्री. ताडपत्रीकरांचें पत्र दिलें आहे व नंतर मी माझें प्रास्ताविक जोडलें आहे.

"रा. ना. वि. कुलकर्णी यांस प्रेमपूर्वक न. वि. वि.:—

तुमच्या "**मातृसेवा**" कादंबरीला मी प्रस्तावना लिहावी असा तुमचा प्रेमाचा आग्रह मी नाकारला त्याचें कारण एक तर हा प्रकार परस्परप्रशंसेचा अतएव गौण दिसला असता आणि दुसरी याहीपेक्षां महत्त्वाची गोष्ट म्हणजे कोणत्याही पुस्तकाला प्रस्तावना लिहिण्याचा अधिकार पोंचण्याइतका, मराठी वाङ्मयाच्या आखाड्यांत वरचेवर कुस्त्या मारून लोकांच्या नजरेपुढें असण्याचा अधिकार मीं मिळविला आहे असें मला वाटत नाहीं. मराठी ललित वाङ्मयाच्या सर्व क्षेत्रांत आपल्याला अधिकारानें संचार करतां यावा अशा प्रकारची माझी महत्वाकांक्षा खरोखरच सफळ झाली आहे काय याचा विचार करूं लागलों असतां 'नाहीं' असेंच उत्तर देणें भाग आहे. इतकेंच नव्हे तर माझी जी कांहीं अल्पस्वल्प कृती आजवर इकडे-विखुरलेली आहे, त्यापैकीं कांहींचें कर्तृत्वसुद्धां माझ्याकडे देण्यास कांहीं चिकित्सक तयार नाहींत, असें कित्येक वेळां कर्णोपकर्णी कळून आलें आणि याचें कारणही उघड आहे. प्रत्येक महिन्याला पांचचार मासिकांतून कविता, चारदोन टीकात्मक लेख, वर्षाच्या कांठीं एकदोन कादंबऱ्या, एकाददुसरें नाटक, अशी सारखी धामधूम चालू ठेवण्याइतकी अनुकूल परिस्थिति मला

लाभली नाहीं. त्यामुळें वाङ्मयाची एकनिष्ठसेवा माझ्या हातून एकसारखी होत नाहीं.

असें आहे, तरी तुम्हीं आपल्या कादंबरीला घेतलेल्या कथानकाच्या मांडणीची कल्पना व प्रत्यक्ष कादंबरी लेखन यांत तुम्हांला जें माझें थोडें बहुत विचार साह्य झालें, त्याचा एकपरीनें माझ्याकडूनच उल्लेख करवून तुम्हांला स्वतःवरील जबाबदारीची तितकीच विभागणी करण्याची इच्छा—कादंबरीचा विषय व मांडणी अगदींच नवीन पद्धतीची असल्यामुळें,—होणें स्वाभाविक होतें आणि म्हणूनच प्रत्यक्ष नकार आणि प्रस्तावना या मधील ही पत्र लिहिण्याची तुमची तडजोड मला मान्य होऊन, कादंबरींतील प्रस्तुत विषयाचें थोडेंसें दिग्दर्शन या खालीं करीत आहें.

प्राचीन संस्कृत वाङ्मयांत जीं बहुमोल रत्नें आपल्या तेजानें प्रकाशीत होत आहेत त्यांपैकींच ‘ सौपर्ण ’ हें एक आहे. वेदामध्यें ‘ सुपर्णाध्याय ’ म्हणून एक स्वतंत्र प्रकरण असून त्यांतील कथा हीच प्रथमची धरली पाहिजे. यांत अंगुष्टमात्र वालखिल्ल्यांचा इंद्रानें अपमान केला म्हणून त्यांनीं आपलें अर्धें तप तारक्ष्याला देऊं करून गरुडाची उत्पत्ति करविली; नंतर विनता आणि कद्रू यांच्या मधील ‘ पणा ’ मध्यें विनता दासी होऊन गरुडावरही सेवाचाकरी करण्याची पाळी आली. तेव्हां कद्रूनें आपल्या-मुलांसह सर्वांस एका रमणीय द्वीपावर नेण्याची आज्ञा केली. त्या त्रासानें गरुडानें सुटकेचा उपाय विचारला असतां ‘ अमृतहरण ’ हा उपाय कद्रूनें सांगितल्यावरून गरुडानें स्वर्गांतून अमृत आणलें आणि तें कद्रूला दाखवून आपली व विनतेची मुक्तता करून घेतली आणि त्याच पावलीं तें अमृत नेऊन दिलें. त्या वेळीं ज्याची शक्ति असेल त्यानें आपल्याला विरोध करावा, असें गरुडानें सर्पांला आव्हानही केलें. अर्थात्‌च त्यांचें कांहीं न चालतां गरुड वचनांतून मुक्त झाला आणि स्वर्गातील अमृत स्वर्गांत परत नेल्याबद्दल देवेंद्रही त्याच्यावर खूष झाला ! अशी सरळ कथा आहे. हीच कथा जास्त विस्तारानें महाभारतांत आदिपर्वामध्यें अस्तिकाच्या प्रसं-गानें आलेली असून महाभारताच्या दाक्षिणात्य प्रतींतून ती पुन्हां अनुशा-

सनपर्वांमध्यें अध्याय वीस ते एकोणतीसमध्यें आलेली आहे. महाभारतांतील या दोनही ठिकाणीं वैदिक कथेमध्यें बराच फेरफार केलेला आढळून येतो. मूळ कथेंत उच्चैश्रव्याचा वर्ण कोणता ? याविषयीं दोघींची पैज लागून उघडया डोळ्यानेंच त्याचा निकाल झालेला आहे. म्हणजे एकप्रकारें विनतेला पांढरा दिसत असतां केवळ कद्रूच्या दडपशाहीच्या बोलण्यामुळें तिला आपण हरल्याचें कबूल करावें लागलें. याच गोष्टीला महाभारतांतील कथेनें सर्पांची मध्यस्थी घालून सयुक्तिकपणा आणण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांत आस्तिक प्रकरणांतील कथेमध्यें शेष वैतागून निघून गेल्याचें सांगितलें आहे, त्याप्रमाणें बाकीच्यांनीं प्रत्यक्ष अश्वाला जाऊन चिकटल्याचा उल्लेख स्पष्ट झालेला नाहीं. त्या ठिकाणीं एकंदर कथाभाग बराच घरसोडीचा दिसतो. तेंच दाक्षिणात्य प्रतींतील अनुशासन पर्वांतील कथेच्या कद्रूचा शाप होतांच कांहीं सर्प भयानें दूर पळून गेले व बाकीच्यांनीं आईचें वचन पाळलें, असें सांगितलें आहे. आस्तिकांतील कथेंत विनतेनें पणाला सुरुवात केली तर अनुशासन पर्वांत ती कद्रूनें केली आहे. अनुशासनांतील कथेंत नारदांचाही प्रवेश आणला असून विनतेच्या दास्यासंबंधीं हकीकत त्यांनीं गरुडाला सांगितली असा उल्लेख आहे. आस्तिक प्रकरणांत रामणीयक द्वीपाचा प्रवास व तिकडे जातांना सूर्याच्या तेजामुळें सर्पांचा झालेला दाह वगैरे हकीकत वैदिक आख्यानाला धरून आहे. तिचा उल्लेख दाक्षिणात्य पाठांत नाहीं. आणि शेवटची महत्वाची गोष्ट म्हणजे आस्तिक प्रकरणांत गरुडानें इंद्राशीं संगनमत करून सर्पांसाठीं दर्भावरील पसरलेलें अमृत त्याला घेऊन जाण्याविषयीं सुचविलें, तर दाक्षिणात्य पाठांत वैदिक आख्यानाला अनुसरून कद्रूला अमृत दाखवून परत नेलें असा उल्लेख आहे. कद्रू अमृत मागूं लागली असतां "अमृत आणण्याची अट होती आणून देण्याची नव्हती" असा गरुडानें जबाब देऊन तें अमृत जिकडील तिकडे पोंचविलें.

अशा रीतीनें मूळच्या वैदिक कथानकांत महाभारतांतच दोन प्रकारानें फेरफार केलेले दिसून येतात. महाभारताची सर्व कथा ज्या निमित्तानें

व्यासांशिवरून वैशंपायनानें जनमेजयाला सांगितली, तें निमित्त म्हणजे सर्पसत्र त्याला पोषक असा हा कद्रूचा शाप महाभारतांत नवीन आला. मूळ कथेच्या मुख्य घोरणाला बाघ न आणतां कथानकांत बारिकसारिक फेरफार केले असतां ते क्षम्य समजले जातात, असाच यावरून निष्कर्ष निघतो. कळावें लोभ असावा हे वि. आपला

श्रीनिवास नारायण ताडपत्रीकर"

महाराष्ट्रकुटुंबमालेंतून प्रसिद्ध झालेल्या माझ्या कादंबऱ्यांना प्रास्ताविक जोडण्याची आजवर फारशी आवश्यकता भासली नाहीं, ती आज भासली म्हणूनच हे प्रास्ताविकाचे दोन शब्द जोडीत आहें.

प्रस्तुत कादंबरीचा विषय पौराणिक असून तो विषय श्री. श्रीनिवास नारायण ताडपत्रीकर, बी. ए. यांच्याशीं सहज बोलण्याच्या ओघांत निघाला, त्या विषयानें माझ्या डोक्याला चालना दिली, त्यावरच माले-करितां नवीन कादंबरीची उभारणी करावी, असें वाटलें व तें मी लगेच श्री. आप्पासाहेबांजवळ बोलूनही गेलों. त्याला श्री. आप्पासाहेबांनीं तात्काळ प्रोत्साहनही दिलें. प्रस्तुत विषयावर त्यांचा नाट्यमान्दिर उभारण्याचा फारा दिवसांचा मानस असल्याचेंही त्यांनीं बोलून दाखविलें. मीं कादंबरी लिहिली तरी प्रसंगविशेषीं श्री. आप्पासाहेब त्या कथेवर नाट्यमंदिर उभारतीलही. तसें त्यांनीं उभारावें, अशी मीं त्यांना अगत्यपूर्वक विनं-तीही केली.

कादंबरीचा प्रांत वेगळा आणि नाटकाचा वेगळा. त्यांतून पौराणिक विषयावर नाटकापेक्षां कादंबरी लिहिणें अधिकच कठीण, असें जों जों विचार करूं लागलों, तों तों वाटूं लागलें व त्यामुळें मन कचरूं लागलें. त्यावेळीं श्री. आप्पासाहेबांनींच मला धीर दिला. माझ्याशीं वेळोवेळीं चर्चाही केली.

नाटकाची कल्पना त्यांची व भांडारकर इन्स्टीटयूटमध्यें काम करीत असतां, त्यांनीं त्याकरितां जी सामग्री जमविली, तीही त्यांचीच. या

दोहोंचा उपयोग मी माझ्या कादंबरीलेखनाकरितां करून घेतला, तेव्हां या पुस्तकाला त्यांचीच प्रस्तावना घ्यावी, म्हणजे त्यांनीं सामग्री कोणती, कशी जमविली होती, त्यांना तो विषय कां आवडला होता, ते आपल्या नाट्यमन्दिराची उभारणी कशी करणार होते व आतां, त्या सामग्रीचा उपयोग मी कादंबरीकरितां कसा करून घेतला आहे, किती घेतला आहे; मूळ कथानकांतून फरक कोणते केले आहेत, ते कसोटीला लागले आहेत कीं नाहीं, हें ते व्यवस्थित दिग्दर्शीत करतील; म्हणजे कल्पना एक असली तरी आपापल्या बुद्धिधर्माप्रमाणें नाट्यकृति, व कादंबरीकृति कशा स्वतंत्र उभारल्या जाणें शक्य आहे, हें आपोआपच कळून येईल.

याकरितां मी त्यांना प्रस्तावना लिहिण्याची विनंती केली. ती त्यांनीं नाकारली, परंतु त्या ऐवजीं त्यांनीं एक पत्र दिलें; त्यांत त्यांनीं सामग्री कोणती, कशी मिळविली होती, हें दिलें आहे. त्या सामग्रीचा उपयोग मी कितपत करून घेतला आहे, हें वाचकांना कादंबरीवाचनानंतर कळून येईल, आणि त्याबद्दल वाचकांना स्वतःचे स्वतःलाच ठरवितां येईल. असो.

प्रस्तुत सुन्दर कथाविषय नाटकाला, कादंबरीला, महाकाव्याला, चलच्चित्रपटालाही सारखाच उपयुक्त आहे, व हिऱ्याला नवा पैलु पाडला कीं, त्याचें तेज अधिकच चमकतें, तसा या कथाविषयाचा प्रकार आहे, हें कादंबरी लिहित असतां मला प्रतिक्षणीं वाटत होतें. मी अल्पमतीप्रमाणें बोबड्या बोलानें मातेची सेवा कादंबरीद्वारा केली आहे. श्री. आप्पासाहेब नाट्यकृति तयार करतील तर हिऱ्याचा तो पैलु खरोखरच उमद्या तऱ्हेचा खास होईल असें मला वाटतें.

श्री. आप्पासाहेबांप्रमाणेंच कादंबरी लिहिली जात असतां माझे जिवलग मित्र श्री. वामन श्रीधर पुरोहित, बी. ए. व श्री. गजानन त्र्यंबक देसाई, बी. ए. यांच्याशीं विचारविनिमय करावयास मिळाला; सर्व मंडळी आपापल्या व्यवसायाच्या अत्यंत महत्त्वाच्या धांदलींत असतांही मजवरील व मजपेक्षांही ‘ माले’वरील प्रेमामुळें त्यांनीं विचारविनिमय करूं दिला, याबद्दल मी त्यांचा केव्हांही ऋणीच आहें.

## प्रस्तावना

मालेंतील आजवरचें माझें लेखन कसेंही वेडेंवांकडे असलें तरी प्रिय वाचकांनीं गोड करून घेतलें आहे, व मला सरस्वतीची सेवा अव्याहत करण्यास प्रोत्साहन दिलें आहे. त्यांना "मातृसेवे"चे बोबडे बोल पहिल्या-प्रमाणेंच आवडोत अशी इच्छा प्रगट करून, उत्सुक वाचकांस प्रास्ताविकाच्या कांटेरीकुंपणाबाहेर सोडून देतों.

सर्वांचा नम्र

**नारायण विनायक कुलकर्णी**

---



—विनता हळूंहळूं सावध होत चालली होती. तिनें सभोंवती पाहिलें व उठण्याचा प्रयत्न केला. उठलीही. पण लगेच तिला मूर्च्छा आली. गरुडानें तिला झट्कन् सांवरून धरलें म्हणून बरें झालें. पण तिला विलक्षण अशक्तता आली होती. पृ. १२५.

॥ श्रीराम ॥

# मा तृ से वा



## उपोद्घात




शव, नारायण, माधव, ए गोविन्द ऽऽऽ"

एका घरांत आंतून कोणीतरी क्षीण आवाजांत वरील प्रमाणें हांका मारीत असल्याचें ऐकावयाला येत होतें. आवाज स्त्रीचा होता. स्वर आर्त होता. त्यांत किंचित् कण्हण्याचाही सूर मिसळत आहे, असें वाटत होतें.

"केशवा, नारायणा, माधवा, अरे गोविन्दा, कुणीच कां रे बाहेर नाहीं? एकालासुद्धां माझ्या हांका ऐकायला येत नाहींत ना? एकालासुद्धां माझी हांक ऐकून, काय आहे तें पहावयाला मजजवळ यावेंसें वाटत नाहीं ना? नशीब माझें! कर्म माझं! तुमच्याकडे काय बोल? माझ्या हाकेला तुम्हीं कशाला ओ द्याल? कशाला कळवळ्यानं तुम्हीं माझ्याजवळ याल? कशाला माझी तुम्हीं पूसतपास कराल? कमनशीबी मी—मी कमनशीबी त्याला तुम्हींतरी काय करणार? अयाईऽ! विष्णू, मधूसूदन, अरे त्रिविक्रम—नका बरं कोणी एकजण देखील उत्तर देऊं? माझ्या जवळ येऊं नका. माझं ऐकूं नका. माझ्याजवळ बसूं नका! कीं माझ्या करितां कांहींएक करूं नका बरं. कांहीं एक करूं नका!"

तें बोलणें पुन्हां थांबलें. आतां नुसतें विव्हळणें आणि कण्हणेंच ऐकावयाला येत होतें. बाहेर ओटीवर कोणीही नव्हतें. सर्वत्र सामसूम होतें. माशा घोंघावत होत्या. ऐन उन्हाची वेळ. या सर्वांच्या एकीकरणानें त्या ठिकाणची भेसूरता भारीच भासत होती. तें कण्हणं, तें विव्हळणं आणि

एकसारख्या आर्त हांका मारणं, यांची त्या भेसूरतेंत आणखी भरच पडत होती.

त्या हांका पुन्हां थांबत पुन्हां ऐकूं येत. बाजूच्या खोल्यांचीं दारें किलकिलीं होतीं. एका खोलीच्या फटींतून बायकांच्या बोलण्याचा, किंचित् हंसण्याचा मधून मधून अस्पष्ट असा आवाज ऐकावयाला येत होता, तर एका खोलींत स्त्री-पुरुषांच्या बोलण्याहंसण्याचा मिश्रध्वनी ऐकावयाला येत होता! दुपारच्या वेळीं घरांतलीं कामें आटोपून शेजारच्या मैत्रिणी जमवून कांहीं गप्पाष्टकें चाललीं होतीं, तर क्वचित् पत्त्यांचे डावही चालले होते. कुणी तर खुशाल झोपेचें सुख अनुभवण्यांत मग्न झाल्या होत्या. हो, त्यांचेंही बरोबरच आहे. घरांतलीं कामंधामं झाल्यावर त्यांना तरी जरा विश्रांति नको का?

" केशवा, नारायणा, माधवा, गोविन्दा—"

आणखी एकदां आंतून हांका आल्या.

" काय बाई त्रास आहे तरी! जरा माणूस दुपारचं कलंडलं तर तें कांहीं खपत नाहीं! एक सारखा आपला हाकांचा सपाटा लावलाय. जसा कांहीं त्यांच्याशिवाय जीवच चाललाय!" एका अंधेर केलेल्या खोलींत कुणीतरी या अंगावरून त्या अंगावर होतांना पुटपुटल्याचा भास झाला.

" अरे, विष्णू, मधुसूदना, त्रिविक्रमा—अजूनसुद्धां कुणींच बाहेर नाहीं का?"

ह्यावेळीं दुसऱ्या खोलींत असें बोलल्यासारखें वाटलें:—

" पहा बरं जरा जाऊन. तुझी आई इतकी हांका मारते आहे ती!

घरांत तर कुणीच नाहीं, आणखी तुझी आई तर सारखीं हांका मारीत आहे. दुपारची वेळ आहे. तिला बरं वाटत नाहीं. घालमेल होत असेल. जरा पाहून तर येशील?"

" कांहीं नको पाह्यला! आमच्या आईला पहिल्यापासून तशीच संवय आहे. इतक्याचं एवढं करायचं. आलीं मुलं बाहेरून म्हणजे जातील. तिकडं लक्ष द्यायचं कांहीं कारण नाहीं!"

# उपोद्घात

" केशवा, येकिं रे ! अरे, माझ्या तोंडाला कोरड पडलीय. जरा पाण्याचा घोंट तर पाजशील मला. " आंतील कण्हणें चालूंच होतें.

आतां दुसऱ्या खोलींत त्या कण्हण्यावर आणि हांका मारण्यावर चर्चा चालूं झाली:—

" बाई ! बाई ! बाई ! अशी म्हातारी खव्याळ आहे. जरा बसलं बोललेलं कांहीं तिला खपत नाहीं. कांहींतरी निमित्त काढून एकसारखा आपला हाकांचा सपाटा लावायचा ! हीं म्हातारीं माणसं मरायला देखील चावून चिकट आणि ओढून बळकट असतात मेलीं !"

" शूः शूः शूः ! काय बोलतां हें ! कशा झाल्यातरी त्या तुमच्या सासूबाई आहेत. तुमच्या पतिराजांची ती 'आई' आहे, अन् त्यांच्याबद्दल तुमचं हें असं बोलणं ? "

" पुरे ! पुरे ! आहे ठाऊक ! घरोघरीं मातीच्याच चुली असतात ! तुम्हीं पण घरीं सासूबाईना कशा वागवतां हें मला माहिती नाहीं वाटतं !— बरं, टाका अगोदर त्या पानावर तुमचं पान ! "

" अहो, ज्यांच्या आया त्यांनीं सांभाळाव्यात. ते आपल्या आईकडे ढुंकून पहात नाहींत. मग आमच्याच मागं हा कां त्रास ? " हातांतलें पत्याचें पान डावांत टाकीत दुसऱ्या बाई म्हणाल्या.

" आतां कसं बोललांत ? " म्हणून सगळया जणी हंसल्या. त्या हास्याचा ध्वनी चांगला बाहेर आला. कदाचित् हांका मारणाऱ्या व्यक्तीच्या कांनींही तो ध्वनि गेला असेल.

असें कळलें कीं त्या हांका मारणाऱ्या बाईचें नांव सरस्वतीबाई. त्यांचं घर मुलांमुलींनीं—सुनांनीं गजबजलेलं आहे. "अष्टपुत्रा सौभाग्यवती" हा ब्राह्मणांचा आशिर्वाद सरस्वतीबाईच्या पूर्णपणें फळाला आलेला होता. शिवाय दोन मुलीही त्यांना परमेश्वरानें दिलेल्या होत्या. दोन्हीं मुलींची लग्नें झालेलीं. बहुतेक मुलांचींही लग्नें झालेलीं. तशा सरस्वतीबाई फारच सुखी होत्या म्हणावयाला हरकत नाहीं. हो, बरोबरच्या सुना घरीं असल्यावर कामधंद्याचा—संसारप्रपंचाचा त्रास त्यांच्या पाठीमागें असायचें काय कारण ?

मुलें पण चांगली शिकली सवरलेली. एक डॉक्टर, एक वकिल, एक सरकारी नोकर, एक शिकत असलेला, एक अशक्त, एक लहान तर एक सगळयांच्या जिवावर काहींही न करतां दोन वेळां खाऊन नुसतांच उनाडक्या करीत असलेला. अशा तऱ्हेचें कौतुक सरस्वतीबाईंच्या वाटयाला आलेलें! त्यांनीं हौसेनें एकेकापेक्षां एक अशीं संध्येतल्यासारखीं केशव, नारायण, माधव, गोविंद, अशीं देवांचींच नांवें ठेवलेलीं. मग त्यांना जगांत सुखी सरस्वतीबाई असं कोण म्हणणार नाहीं? इतकें वैभव सगळयाच स्त्रियांच्या वाटयाला थोडंच येत असतं! त्यांचें हें वैभव ऐकून त्यांच्या कट्टया शत्रूनें सुद्धां त्यांच्या वैभवाचा हेवा करावा. पण—

पण इतकें असून, इतकें प्रत्यक्षाप्रत्यक्ष दिसत असून सरस्वतीबाई खऱ्याच सर्वस्वी सुखी होत्या का? त्यांचं मन शांत—आनंदी—सुखी होतं कां? बाहेर डॉक्टर, वकिल, सरकारी नोकर, व्यापारी, म्हणून मिरविणारे, लौकिक कमविणारे, पैशांत लोळणारे, आपल्या बायकामुलांना डोक्यावर घेऊन उदोउदो करणारे, त्या सरस्वतीबाईंचे लेक खरेच त्यांना सुख देत होते काय? त्यांच्या मनासारखे वागत होते काय? त्यांची सेवाचाकरी करीत होते काय?

याबद्दलची चौकशी करावीशी वाटली, प्रत्यक्ष पहावेसें वाटलें, त्यावेळीं काय आढळलें?

संध्याकाळची वेळ व्हावयाला आली. तसे बुटपाटलोणींत डॉक्टर, डगला, पगडी, उपरण्यांत वकील, टोपी, अबलॉंग कोटांत सरकारी नौकर, तोडांत शिगारेट धरलेले व्यापारी, डोक्यावरच्या केसांचा तिरपा भांग पाडलेले विद्यार्थी, आणि गांवांत टोळभैरवाप्रमाणें भटकणारे पट्ठे, संध्याकाळच्या चहाला पटपटपट टोळधाडीप्रमाणें घरांत जमले. त्यावेळीं ज्यांच्या त्यांच्या बायका स्टो, कपबशा, चहासाखरेचे डबे, पाण्याची भांडीं, यांच्यांत खडबडाट करूं लागल्या. इतका वेळ सौभाग्यवतींशीं गुजगोष्टी करीत बसलेले सरस्वतीबाईंचे जामातही आपल्या मेहुण्यामध्यें गप्पागोष्टी झोडायला आणि त्यांच्या बरोबर चहा फराळावर आडवा हात मारावयाला खोलींतून

बाहेर आले. सरस्वतीबाईंची माहेरपणाला आलेली मुलगी वहिनींच्या चहाच्या भावाला सांगायला, भावांची थट्टा वहिनींच्या जवळ कुजबुजावयाला हंसत हंसत इकडून तिकडे तिकडून इकडे फलकावूं लागली.

सर्वांचे चहापाणी चाललें आहे, गप्पासप्पा चालल्या आहेत, हंसणें खिदळणें चाललें आहे. कुणाचे आज रात्रींच्या नाटकाला जायचें घाटत आहे. कोणी सिनेमाचा शेवटचा प्रोग्राम गांठावा असा विचार करीत आहे! तर कोणी नुसतेंच फिरावयाला जावें म्हणत आहे. एक जण मित्राच्या आमंत्रणाला मान देऊन संध्याकाळच्या फराळाला सकुटुंब जायची तयारी केली पाहिजे म्हणून उद्गारताहेत, तर दुसरा, आपला मित्र आपल्याकडे सहकुटुंब फराळाला येणार आहे, असें कुजबुजत आहे. या प्रमाणें सरस्वतीबाईंची सारी प्रजा—त्यांचा डॉक्टर केशव, नारायण वकिल, माधव कारकून, गोविंद व्यापारी, विद्यार्थी विष्णू, अशक्त मधुसूदन, पुंड त्रिविक्रम—या सर्वांना आपापल्यापरी सुखाच्या आणि चैनींच्या कल्पनेपुढें दुसरें तिसरें कांहींएक दिसत नव्हतें!

आणि बिचारी सरस्वतीबाई! अरेरे! बिचारी कण्हते आहे. विव्हळते आहे. तळमळते आहे. कुणी सुपुत्र आपल्या जवळ येईल, विचारपूस करतील, अशी उराशीं आशा कवटाळून बसली आहे. पण तिच्याकडे लक्ष कुणाचें आहे?

दुपारच्या वेळीं सरस्वतीबाई मुलांना हांका मारीत होत्या, त्या कांहीं केवळ मुलांनींच यावें म्हणून नव्हे. दुपारीं सर्व मुलें आपापल्या उद्योगाला गेलीं आहेत हें त्या जाणत होत्या. पण मुलांना हांका मारण्याचा उद्देश इतकाच कीं, मुलींनीं—सुनांनीं आपल्या जवळ यावें, त्यांनीं 'काय हवं नको' याची चौकशी करावी. संध्याकाळीं मुलें घरीं आल्यावर आपसुखेंच येतील आपल्याजवळ. करतील चौकशी!

पण संध्याकाळीं मुलें घरीं आलीं तरी काय!

एकाही मुलाला आईची आठवण झाली नाहीं. एकाच्याही कानांवर आईचें विव्हळणें गेलें नाहीं. ज्या आईच्या पोटीं मुलांनीं जन्म घेतला,

# मातृसेवा

ज्या आईनें मुलांना लहानाचीं मोठीं केलीं, दुखणीं बहाणीं काढलीं, कटी-खांदीं खेळविलें, वाढवलें. शिकवलें, लग्नें करून दिलीं. संसाराला लावलें. त्या आईचे पांग मुलें कशीं फेडीत आहेत ? तर तिची चौकशी सुद्धां न करतां !

हें पाहून आईच्या अंतःकरणाला काय वाटत असेल ? काय, आईचें अंतःकरण मुलांना शिव्याशाप देत असेल ? त्यांचं अशुभ चिंतीत असेल ? पण तें शक्य कसें आहे ? आईच्या हातचें कटु औषध सुद्धां अमृत होतें, असा आईच्या हाताचा महिमा आहे. ती आई मुलें कशींही वागलीं, कितीही विचारीनातशी झाली, तरी त्यांच्याबद्दल अभद्र कशी बोलेल ? अशुभ कशी चिंतील ? ती केव्हांही मुलांचें कल्याणच चिंतणार ! मंगलच पाहाणार. त्यांतच ती आपल्या आयुष्याचें सार्थक्य समजणार !

पण म्हणून काय मुलांनीं तिच्याकडे पाहूंच नये ? तिची सेवाचाकरी करूंच नये ? तिच्या आशा, इच्छा, महत्त्वाकांक्षा, याबद्दल चुकूनही चौक-शीच करूं नये ? हा कुठच्या गांवचा न्याय ?

आला दिवस जातो. पुन्हां येतो. हा चक्रनेमिक्रम चाललेलाच आहे. त्या बरोबर प्राणीमात्र आपापल्या सुखासमाधानासाठीं आयुष्य वेचतोही. स्वार्थापुरतें पाहणें यांत विशेष तें काय ? त्या पलीकडे पहावयास नको काय ? आपला अर्धाजीव आपल्या आप्तेष्टांच्या ठिकाणीं खेळत असतो. त्या अर्ध्याजीवाची जबाबदारी कोणीं संभाळावयाची ? पण हें कोणीं कोणाला विचारावयाचें ?

सरस्वतीबाईचीं मुलें कर्तीं आहेत. आपापलीं पोटं भरतात. यथाशक्ति आपल्या बायकांना सुखांतही ठेवतात. पण एवढें झालें म्हणजे इतिकर्त-व्यता संपली असें होत नाहीं. मुलांनीं आपल्या विषयीं इतकें इतकें कांहीं करावें अशी सरस्वतीबाईची कांहींच मूकइच्छा नसेल काय ? त्या इच्छेची पूर्तिकरणें त्या मुलांचें कर्तव्य नव्हे काय ? सरस्वतीबाईनीं बोलून किंवा न बोलून दाखविलें तरी तिच्या सुपुत्रांनीं तिच्याकडे आपण होऊन पहाव-याला नको काय ?

# उपोद्घात

शिळोप्याच्या गप्पा ठोकावयाच्या वेळीं सहज आरामखुर्चीवर रेलतां रेलतां आईविषयीं बोलणें, तिच्याबद्दल आस्था दाखविणें, तिच्या करितां अमूक अमूक लवकरच केलें पाहिजे, असें नुसतें बोलणें, पण कृति कांहींच न करणें, हें काय किंवा स्वतःचा लौकिक वाढविण्यासाठीं देशभक्तीची, भूमातेच्या सेवेची कडकडीत पण कोरडीच—कृतिशून्य—व्याख्यानें देणें यांत काय फरक आहे ? सरस्वतीबाईचीं मुलें स्वतःचें सुख पाहातील. स्वार्था-साठीं धक्काबुक्कीही करतील—करतातही. बायकामुलांच्या हौसामौजा पुर-वतील—पुरवितातही. पण त्यावेळीं आईची आठवण येत नाहीं. तिच्या-करितां शरिराला, मनाला, धनाला धक्का लावून घेण्याची तयारी असत नाहीं, याला काय म्हणावयाचें ?

कर्ते चिरंजीव तर आईवरच 'गप्प बैस' म्हणून जेव्हां तेव्हां गुरगुरतात, आणि आपल्या इतरत्र श्रमांचा लांबलचक पाढा तिच्यापुढें वाचून आप-णच उलट "हुश्श" म्हणून तिच्यापुढें बसतात. आणि क्वचित् उलट आईकडूनच आपली चाकरी करून घेतात. घरांतल्या म्हाताऱ्या माणसाची कर्त्या मंडळींना अडगळ वाटते. तीं दृष्टिपुढें नकोशीं होतात. त्यांचा अड-थळा जाणवतो. अशी दुर्दमनीय अवस्था प्राप्त झाल्याचें सरस्वतीबाई-सारख्या माऊलीच्या घरीं पहावयाला मिळतें !

बरें, या सर्व सुपुत्रांच्या मनांत आईकडे दृष्टि वळविण्याची लहर लागली, तर आईकरितां आपण अमूक तमूक करणार, आणि तेंच बरोबर आहे, असें प्रत्येकाचें भिन्न मत पडतें. त्यांत रणें माजतात. हमरीतुमरीवर प्रकरण येतें. सरस्वतीबाईच्या इच्छेला, आशेला, महत्त्वाकांक्षेला कोणीच विचारीत नाहीं. जो तो आपापला मोठेपणा—पगडा पाहतो ! त्याकरितां सर्व धडपड करतो !

तेव्हां अशा स्थितींत मुलांकडून सरस्वतीबाईना हवें आहे तें सौख्य त्यांच्या मुलांच्याकडून मिळावयाचें कसें ? आणि केव्हां ? तिनें त्या सौख्याची आशा तरी कशी करावयाची ?

## मातृसेवा

डॉक्टर, वकील, नोकर, व्यापारी, विद्यार्थी, उडाणटप्पू ठरल्याप्रमाणें संध्याकाळीं भरभरभर बाहेर पडले.

सरस्वतीबाईंची निराशा झाली. त्यांनीं एक दीर्घ निश्वास सोडला. स्वतःच्याच नशिबाला बोल लावला आणि स्वस्थ बसल्या. कर्त्या मुलांला बोलावयाची तर सोयच नव्हती. जेव्हां विचारावें तेव्हां तो वस्सकन् आंगावर येई. अशक्त मुलगा जवळ येण्याचा'बसण्याचा प्रयत्न करी. पण त्यानें आईची काळजी करावयाच्या ऐवजीं आईलाच त्याच्या अशक्तपणा-मुळें त्याची काळजी करावी लागे. खुशालचेंडू तर बोलून चालून खुशाल-चेंडूच ! तो कशाला आईकडे पहातो आहे. "आईला सौख्य लागूंच नये का कधीं मुलांकडून? असाच का देवा माझ्या लेखी लेख खरडला आहेस? मी मुलांना बोलूं नये. मुलांनीं मजकडे पाहूं नये, असं कां? सृष्टीची उत्पत्ति झाल्यापासून आजवर असाच प्रकार चालू आहे का? सृष्टीची रीति अशीच आहे का? आईनं मुलांकडून मिळणाऱ्या सुखाची आशा करावी, आणि तें देण्याचं मुलांच्या मनांत तितक्या तीव्रतेनं कधींच येऊं नये, असाच देवानं प्राणीमात्रांना निसर्ग नियम लावून दिला आहे का?" याप्रमाणें अंथरुणाशीं खिळलेल्या सरस्वतीबाईंच्या डोक्यांत त्यांना न विचा-रतां मुलें बाहेर गेल्यावर एकेक खिन्न विचार येऊं लागले होते. क्षणोक्षणीं सरस्वतीबाईंच्या नेत्रांत अश्रु उभे रहात होते. पण श्वासोच्छ्वास चालला होता. माऊलीचें भवितव्याच्या भयाणतेच्या जाणिवेनें एकसारखें मूक रुदन चाललें होतें. तिची उदास—उदात्त विचारमालिका तिच्या मनाला पुढें खेचीत नेत होती—

"विश्वाच्या पाठीवर केव्हांकाळीं तरी असं झालं असेल का, कीं आईला दुःख झालं असेल, त्या दुःखाची वाच्यता तिनं आपल्या मुलांजवळ मोकळ्या मनानें केली असेल. तिचें तें दुःख मुलांनीं आस्थेनें ऐकून घेतलें असेल. तन्निवारणार्थ कायावाचामनें करून मुलांनीं प्रयत्न केले असतील आणि आईचें दुःख निवारण करून आईला सुखी केलें असेल? आई वाईट असेल, खट्याळ असेल, दोषी असेल, अपराधी असेल. पण तें न पाहतां

## उपोद्घात

मुलांनीं आपलें प्राप्तकर्तव्य पार पाडलें असेल. देवा! असलें उदाहरण एक तरी पूर्वी घडलें असेल का? तसें उदाहरण पाहून मला जरा तरी बरं वाटेल. मी मुलांपासून सुखाची आशा करते ती अगदींच अयोग्य आहे, असं कळलं तर तितकंच मनाला बरं वाटेल. तसं मुलांना कळलं, तर त्यांच्या डोक्यांत तेवढ्यापुरता तरी प्रकाश पडेल. त्यांच्या आयुष्यक्रमाला निराळें वळण लागेल. विश्वांतल्या आजपर्यंतच्या मातांनो, मुलांकडून सौख्याची अपेक्षा करणं वावगं नसतं हें मला सांगाल का? विश्वांतल्या आजवरच्या पुत्रांनो, तुम्हीं तुमच्या मातेकरितां तनमनधन वेंचलें आहे, हें माझ्या बाळांना दाखवाल काय?–"

विचारच विचार सरस्वतीबाईंच्या मनांत थैमान घालीत होते. कित्येकदां तर ते त्यांना असह्य होत होते. त्या विचारांच्या तंद्रेत सरस्वतीबाईंचा डोळा लागला. जें जागेपणीं तेंच स्वप्नसृष्टींत! सरस्वतीबाईंना कसलीं स्वप्नें पडत होतीं?

मुलें नाटकें सिनेमाला गेलीं होतीं. कोणी वाचनालयांतही गेलीं असतील, त्यांना नाटकांत–सिनेमांत, वाचनांत त्यांच्या आईची अपेक्षा असणारे देखावे कुठें दिसले असतील काय?–दिसत असतील काय? सरस्वती-बाईंच्या स्वप्नांचा आणि त्यांच्या मुलांना दिसणाऱ्या देखाव्यांचा ताळमेळ कुठें बसण्यासारखा एकादा प्रसंग असेल काय?

प्रश्नाला उत्तर मिळालें "होय! पुढें पहा, म्हणजे दिसेल!"



## मातृसेवा

# प्रकरण पहिलें

कोणत्या मुहूर्तावर कदूरूनें विनतेला विचारलें होतें? कोणत्या मुहूर्तावर विन-
तेनें कदूरूला उत्तर दिलें होतें? आणि उद्यां काय होणार होतें?
तें उद्यांलाच माहित!

देवदानवांनीं समुद्रमंथन करून अमृतादि चौदा दिव्यतम रत्नें निर्माण केल्याचा तो मंगल काल! त्या कालीं ज्याच्या त्याच्या तोंडीं, जेव्हां तेव्हां—अशनीं शयनीं भोजनीं, निर्माण झालेल्या रत्नांच्या बद्दलचीच सारखी चर्चा चालत होती. लक्ष्मी कशी आहे कशी दिसते, कशी शोभते, तिची अंगकांति किती तेजःपुंज आहे, तिच्या नयनयुगुलांची चमक तेजस्वी तारांनाही कशी फिक्की पाडते, तिची मंजुमधुर वाणी देवऋषी नारदमुनींच्या वीणा झंकाराला कशी लाजविते, तिच्या सभोंवारचें तेजोवलय किती सौम्य सुभग आहे. तिच्या अंगींचा सुगंध दिव्यत्वाच्या अद्भुत प्रांतांत कसा घेऊन जाणारा आहे. ती लक्ष्मी अशी म्हणूनच कशी भगवान् श्रीविष्णूंच्या चरणीं लीन झाली. म्हणूनच तिचा प्रेमादरानें त्यांनीं स्वीकार केला. लक्ष्मी सारखें आद्यरत्न त्याच चरणीं शोभायचें, खुलावयाचें, सार्थक्य पावावयाचें! असें आणि अशा सारखेंच लक्ष्मीबद्दल मनमुक्त घरोघरीं गुणगान चाललेलें.

असाच प्रकार कौस्तुभ रत्नाबद्दल. तशीच स्थिति पारिजातकाबद्दल! जीं रत्नें भगवंतांना आवडलीं त्या रत्नांचें गुणवर्णन, गौरव, मान अष्टौ-प्रहर कोण करणार नाहीं? तीं रत्नें पहावींत, त्यांचें सान्निध्य असावें, त्यांच्या ठिकाणचे गुण कळावेत ते आपल्याला जसेच्या तसे वर्णन करतां यावेत, अशी आकांक्षा कोण बाळगणार नाहीं?

चौदाही रत्नांबद्दल कोणीं बोलावें, काय बोलावें, किती बोलावें, याबद्दल विचार करण्याचें सुद्धां कारण नाहीं. थोर बोलत. लहान बोलत. विद्वान वदत. अविद्वानही यथामति प्रशंसा चालवीत. राजराजेश्वरांच्या तोंडीं रत्नांविषयींचाच विषय असावयाचा, तर गोरगरिबांच्या, भणंगाभिकाऱ्यांच्या, ऋषीमुनींच्या पर्णकुटिकांतूनही त्याच संबंधींचे ध्वनि कानांवर यावयाचें.

## प्रकरण पहिलें

ज्याला जें रत्न त्याच्या प्रकृतीधर्मांप्रमाणें आवडे, तो त्याच रत्नाबद्दल वरचेवर बोले, किंवा कोणी बोलत असेल तर तें त्याचें बोलणें सलक्ष ऐके! लक्ष्मीबद्दल सर्वच मुक्त कंठानें बोलत. कौस्तुभाबद्दलची चर्चा विविक्षित ठिकाणीं चाले. पारिजातकाबद्दलही असेंच होई! सुरेबद्दल फारशी आणि उघड बोलणीं चालतांना ऐकावयाला मिळणें कठीणच पडे. हीन प्रकृति, तामसी लोकांतून सुरेबद्दल तोंडांतल्या तोंडांत कुजबुजतांना, फार झाल्यास क्वचित् ऐकावयाला मिळे इतकेंच. कदाचित् असेंही असेल कीं विष्णूप्रभृति देवांनीं ज्या रत्नांचा सानंद स्वीकार केला, त्या त्या रत्नांची स्तुति गौरवास्पद ठरली असावी आणि म्हणूनच त्यांविषयीं बोलतांना तेवढ्याच रत्नांची अवास्तवही स्तुतिपाठ गात असतील. सुरेचा स्वीकार सुरांनीं केलेला नव्हता. शंखाकडेही अजून कोणीं पाहिलेलें नव्हतें. ऐरावत इंद्रानें आपलासा केल्यानें स्वाभाविकच त्याचें मूल्य ठरलेंच. हालाहलाचें नुसतें नांवही काढावयाला कोणी धजत नव्हतें. बोलून चालून मृत्यूच्या त्या दूताला कोण जवळ करणार? भगवान श्रीशंकरांनीं त्याला जगत्कल्याणाकरितां आपल्या कंठीं ठेवलें, तर त्याचा दाह त्यांनाही असह्य झाला म्हणून त्या दाहाला किंचिन्मात्र तरी उपशम व्हावा म्हणून सुधांशू मस्तकी धारण केला. हालाहलाचा नामनिर्देश करावयालाही चळचळ कापरें भरे तर सुधांशूचें स्वागत तितक्याच प्रेमानें चाले. विशेषत: प्रणयी प्राण्यांचा तो प्रथमपासून अत्यंत आवडता झाला! अमृत तर काय देवांचें प्रिय झालेलें. केवळ त्यांच्याच सेवनास तें पात्र ठरून त्यांनीं निर्माण होतांच आपल्या गोटांत ठेवलेलें. त्याचें वर्णन, त्याची महती, प्रत्येकाची जिव्हां मनमुराद गावयाचीच! अमृताचें नांव निघतांच प्रत्येकाची जिव्हां रसभरित व्हावयाचीच. अमृताचें नांव निघालें, म्हणजे तें पाहिलें नसतांना, चाखलें नसतांना, त्याची रुचि, त्याचा गंध यांची मुळींच माहिती नसतांना प्रत्येक जण अमृत वर्णन आलें कीं नुसता लुब्ध होऊन जाई!

याच लक्ष्मी–अमृतादिकांचें गुणगान एक दिवस भगवान कश्यप महामुनींच्या पवित्र आश्रमांत त्यांच्या महासती भार्या–कद्रु आणि विनता–

त्यांच्या मध्यें बोलण्यावरून बोलणें निघून चाललें होतें. कद्रूनें एका रत्नाचें नांव घ्यावें, विनतेनें त्याचें वर्णन करूं लागावें, विनतेनें दुसऱ्या रत्नाच्या नांवाचा नुसता उच्चार करावा, त्यावर कद्रूनें त्या रत्नाबद्दल बोलूं लागावें, असें चाललें होतें. भगवान् कश्यपमहामुनींचा तो पुण्यपावन आश्रम. तिथलें तें पवित्र वातावरण, त्यांत आनंदानें वास करणाऱ्या त्यांच्या आवडत्या कद्रु–विनता या दोन भार्या आणि त्यांच्यामध्यें समुद्रांतून निघालेल्या रत्नांची वर्णनें. त्या वर्णनाला त्रिजगतीं मोल कुठून येणार ! त्या रत्नांच्या वर्णनानें त्या दोघींना श्रेष्ठपणा येण्याऐवजीं त्या दोघीं त्या रत्नांचें वर्णन करतात म्हणून त्या रत्नांच्या तेजाचीच खुलावट अधिक व्हावयाची, अशी त्या दोघींची योग्यता ! दक्ष प्रजाप्रतींच्या दोघीं कन्या–सतीच्या सख्या बहिणी, आणि संसारांत प्रेमळ सवती, अशा त्या असत. संसारांत खरोखरीच त्या किती सुखी असत ! त्या, त्यांचीं मुलेंबाळें, त्यांचीं गायी-गुरें, त्यांचीं संसारकृत्यें, यांत त्या सर्वदा दंग असत. संसार म्हणजे बायकांचा. त्यांनींच तो करावयाचा. त्यांचीं अपत्यें ही राष्ट्राची संपत्ति. तिचें प्रेमानें लालन पालन पोषण त्यांनीं करावयाचें. मुलांना शिकवावयाचें, वाढवावयाचें, राष्ट्राला उपयुक्त असे करून आपण सतीपद पावावयाचें, हाच खराखुरा स्त्री-धर्म. तो धर्म कद्रु आणि विनतादेवी आस्थेनें, प्रेमानें, हौसेनें, अभिमानानें आणि एकनिष्ठेनें पाळीत असत ! त्या भगवान् कश्यपमहामुनींच्या आश्रमाला भूषणभूत होऊन राहिल्या होत्या. त्या संसारकाजांत अत्यंत दक्ष–रत पाहून भगवान् कश्यप महामुनी निर्वेधपणानें तपश्चर्येंत गुंतले असल्यास आश्चर्य काय ?

हा वेळपावेतों तरी निदान कद्रु आणि विनता जरी सवतीसवती असत तरी पूर्वाश्रमींच्या–बहिणी बहिणींच्या–नात्यानेंच वागत, बोलत, बसत, चालत. कद्रूचा स्वभाव किंचित् कठोर, अहंमन्य, स्वाभिमानी, आणि सत्ताभिलाषी असा असावा, असें वाटे, पण तो व्यक्त होणार कसा ? हा स्वभाव गायी–गुरांत वागतांना, लेकरा–बाळांना वागवितांना कसा दिसणार ? त्याचप्रमाणें विनतेचा स्वभाव विनयसंपन्न, विचारी, धिंमा,

प्रेमळ, सात्वीक अशा तऱ्हेचा आहे, अशी ख्याती होती. दोन सख्या बहिणी पण उपजत त्यांच्या स्वभावांत वरीलप्रमाणें अंतर दिसे. एकाच ब्रह्मदेवानें घडविलेले घट, एकाच मातेच्या उदरांतून निर्माण झालेल्या दोन मुली. पण त्यांचे स्वभाव मात्र भिन्न! हे जगाचेच विशेष त्यांच्यांत दिसून येत. स्वभावभिन्नत्वामुळें दोघी बोलण्याच्या भरांत वर्दळीवर येत, रागावत, भांडाभांडीपर्यंतही पाळी येई. पण कांहीं झालें तरी त्या बहिणी बहिणी. त्यांच्या भांडण्याबोलण्याची मजल कोठपर्यंत जरी गेली, तरी शेवटीं, सलोख्यांत शेवट होई आणि गळ्यांत गळा प्रेमानें घालून घटके-पूर्वी घडलेलें दोघी विसरून जात.

त्या ह्या बहिणी समुद्रामधून निघालेल्या रत्नांबद्दल बोलत होत्या. त्यांच्या प्रस्तुतच्या संवादाचा रागरंग जरा नेहमींहून निराळाच रंगत होता.

" गडे, विनताताई,—"

" काय कद्रुमाई—"

" तुला रत्नांबद्दल काय वाटतं ? "

" रत्नांबद्दल ? म्हणजे ?—"

" रत्नं तुला आवडतात ना ? "

" हें काय विचारणं झालं ताई ? रत्नं कुणाला आवडणार नाहींत ?"

" तुला कोणतीं रत्नं आवडतात तें तर सांगशील ? "

" मला किनई माई, आपलीं सारींच रत्नं आवडतात ! "

" हें काय बोलणं झालं ताई ! असं कसं होईल ? ज्याची त्याची आवडनिवड निराळीच असते. तुला काय निवडच नाहीं वाटतं ? सग-ळींच सारखीं कशीं आवडतील ? "

" खरेंच सांगतें माई, आपलीं सारींच रत्नें मला आवडतात. आणखी मी तुला असेंच उलट विचारतें, माझ्या सारखीच तुझी पण स्थिति आहे कीं नाहीं सांग. तुला आपलीं सारीं रत्नं आवडत नाहींत काय ? "

" मुळींच नाहीं ! "

" मुळींच नाहीं ?–म्हणजे ?–"

" मुळींच नाहीं. मला सगळीं रत्नं मुळींच आवडत नाहींत ! "

" काय म्हणतेस माई, तुला आपलीं सगळीं रत्नं—सगळीं मुलं सारखीच आवडत नाहीं म्हणत्येस ? तूं आपल्या मुलामुलांतही प्रेमाचं अंतर करत्येस ? आईच्या प्रेमांत असा कमीअधिकपणा असणं संभवनीय असतो का ? माई, तूं आपल्या मुलांची आई ना ? तुझाच शेष, तुझाच कर्कोटक, आणि हजार मुलें तुझींच ना ? आणि त्यांच्यावरील प्रेमांत असं अंतर आहे तुझ्याजवळ ? " विनतेनें हंसत हंसतच कद्रूवर भडीमार केला. रत्नांचा अर्थ अनपेक्षित असा भलतांच विनतेनें फिरवून कद्रूला बोलतां बोलतां सहज चकविल्यामुळें, व ते चकविल्याचें शेवटीं लक्षांत आल्यामुळें कद्रू विनतेकडे आश्चर्यातिशयानें थक्क होऊन पाहूं लागली. कुठचें बोलणें कुठें नेलें याबद्दलच क्षणभर कद्रू विचार करीत होती. क्षणांत ती भानावर आली. आपण अशा कशा सहजासहजी चकलों, हेंच तिला कळेना. तिच्या स्वाभिमानी मनाला तशी चूक सहन झाली नाहीं. ती प्रथम आपल्यावरच रागावली. नंतर तिला विनतेचा राग आला. सहज बोलण्याच्या भरांत विनतेनें आपल्याला फसवावें, फजित करावें, म्हणजे काय ? सवतीनें फजीत करणें कोणाला सहन होणार ? कद्रूचा सुरुवातीचा सहज लडिवाळपणा—मोकळेपणा कोठच्या कोठें नाहींसा होऊन त्या ठिकाणीं सरोषतेनें आपलें ठाण मांडलें. कद्रूनें विनतेकडे त्यावेळीं इतका तीव्र दृष्टि-क्षेप टाकला, कीं तें पाहून विनता चमकन् चमकली ! कद्रूला राग आला वाटतं, अशी तिची तीच पुटपुटली. लगेच तो घालविण्याच्या उद्देशानें तिच्या जवळ जाऊन कद्रूला म्हणाली, "माई, रागावलीस होय माझ्या बोल-ण्यानें ? मी उगीचच बोललें म्हणायची ! द्वाड विनोद करायच्या भरीला मी कां पडलें कोण जाणें ! माई, गेला ना तुझा राग ? असा जीव घेणारा विनोद मी पुन्हां कध्धीं कध्धीं करणार नाहीं बरं कां ? "

कद्रू विनतेकडे पुन्हां पाहूं लागली. आतां तिच्या रागाचा झटका नाहींसा झाला होता. विनतेचा द्वाड विनोद तिच्या काळजाला जाऊन भिडला होता, यांत शंकाच नव्हती. पण तो तिनें चतुराईनें वर दिसूं न देण्याची

अटीकाट खटपट चालविली. ती पूर्ववत् हंसून म्हणाली, "ताई, राग कशाचा त्यांत? तूं रत्नं म्हणजे आपलीं मुलंच समजलीस ना?

"होयच मुळीं! प्रत्येक मातेला आपलं मूल म्हणजे रत्नच असतं नी त्याचं मोल जगांतल्या इतर केवढयाही अमूल्य रत्नापेक्षां तिला अधिक असतं! माई, खरं सांग अं? तुला आपलीं मुलं तशीं वाटत नाहीं कां?"

"नाहींत कशीं? मला तर माझ्या मुलांपेक्षां जगांत चांगलं आणि महत्त्वाचं कांहींच वाटत नाहीं!" कद्रू विनतेकडे रोखून पहात म्हणाली. कद्रूचें रोखून पहाणें आणि आपलीं मुलं म्हणण्याऐवजीं माझीं मुलें म्हणणें, हेंही विनतेच्या ध्यानीं आल्यावांचून राहिलें नाहीं. तें ऐकून तिला कसेसेंच झालें. पण काय झालें आणि कसें झालें हें मात्र तिला तितकेसें कळेना! तिनें तो विषय तितकाच सोडून कद्रूला तिच्या मूळ विषयावर आणण्याकरितां म्हटलें, "मग माई, तूं कोणत्या रत्नांबद्दल विचारलंस?"

"समुद्रांतून निघालेल्या रत्नांबद्दल!"

"अस्सं! मग तुला काय लक्ष्मी आवडली?" विनतेनेंच कद्रूला विचारलें.

"इश्श! लक्ष्मींत विशेष काय? आमच्यापेक्षां लक्ष्मींत अधिक काय आहे?" तोऱ्यानें उलट कद्रूनें प्रश्न केला. विनतेला फजित केव्हां करतां येईल असें कद्रूला होऊन गेलें. म्हणून ती पुन्हां म्हणाली, "सांग ना ताई, आपल्यापेक्षां समुद्रांतून निघालेल्या लक्ष्मींत अधिक काय आहे?"

"लक्ष्मींत विशेष काय आहे म्हणून काय विचारतेस माई? लक्ष्मीपुढें आपण कोणत्या झाडाचा पाला? विश्वांतल्या आपल्यासारख्या सर्व स्त्रियांच्या ठिकाणच्या सत्वाची, मांगल्याची, शुभाची, सौन्दर्याची, सद्गुणांची केवळ मूर्ति म्हणजे लक्ष्मी. तिची आपली बरोबरी कशी बरं होईल? आपण त्या आपण आणि लक्ष्मी ती लक्ष्मीच!" विनता उतरली. याहीवेळीं कद्रूवरच खजील होण्याचा प्रसंग आला. ती किंचित् खजील झालीही. पण तितक्यांत उसळून तिनें विचारलें," लक्ष्मी इतकी चांगली हें तूं कशावरून म्हणतेस?"

# मातृसेवा

" भगवान् विष्णूंनीं तिला आपली अर्धांगी केली म्हणून ! " विनता उत्तरली.

" तें जाऊं दे ! श्रीविष्णूंचं नको सांगूस ! त्यांनीं लक्ष्मीचाही स्वीकार केला नी एका हातांत शंखालाही पण जागा दिली. म्हणून काय लक्ष्मीची आणि शंखाची योग्यता सारखीच समजावयाची वाटतं ? "

" शंख झाला तरी तो लक्ष्मीचा बंधूच ना पण ? "

काय असेल तें असो. कद्रूला आज विनतेवर मात कांहीं करतां येईना. ती कशीही बोलली, तिनें कांहींही कल्पना काढली, तरी विनतेच्या सहज उत्तरानें विनतेचीच सरशी होई. विनता सहज उत्तर देई. त्या बोलण्यांत खोंचण्याबोंचण्याचा किंवा स्वतःकडे श्रेष्ठपणा घेण्याचाही हेतु नसे. पण कद्रूला तिची सरशी सहन कशी होणार ? ती जों जों विनतेवर सरशी होण्याकरितां प्रयत्न करूं लागे, तों तों प्रत्येक बोलणें तिच्याच आंगशीं येऊं लागे. आज अगदीं तसेंच झालें. कद्रूची बारीक मोठी कोणतीही गोष्ट असो, विनतेच्या बोलण्यानें ती खोडली जाऊं लागली. तशी कद्रू अधिकाधिक चिढूं लागली. रागावूं लागली. तिचा राग तिला सहन करतां येईनासा होऊं लागला. विनतेचें काय करूं आणि काय करूं नको, असें तिला होऊन जाऊं लागलें. वास्तविक म्हटलें तर सख्या बहिणी बहिणी–शिवाय सवती–अगदीं प्रेमळ सवती ! आजवर त्या तशाच वागत आलेल्या. कोणतीही गोष्ट आनंदाकरितां करावयाच्या–आनंदाकरितां बोलावयाच्या. मध्यें कांहीं झालें तरी आरंभ आनंदांत करावयाचा, पर्यवसानही आनंदांतच होऊं द्यावयाचें, असें त्यांच्या आतांपर्यंतच्या दिनचर्येंत दिसून येई. पण आज तसें होईलसें वाटेना. कदाचित् कांहीं तरी अज्ञात कारणही असेल. पण विनता कशीही बोलली तरी कद्रूला तें लागूं लागलें. विनता मायेनें बोलूं लागली तरी कद्रूला विनतेचें बोलणें मायावीच वाटूं लागलें. काय होत होतें, कद्रूच्या मनःस्थितींत आपल्या बोलण्यानें एकसारखा कोणत्या प्रकारचा फरक पडत चालला आहे, याची तिला कल्पना नव्हती. येण्याचें तसें कारणही नव्हतें.

रत्नांच्या कल्पनेंत, लक्ष्मीच्या श्रेष्ठतेंत, लक्ष्मी–शंखाच्या नात्याच्या बाब-

तींत कारण नसतांना कद्रूला खालीं पहायला लागलें. विनतेनें लावलें अशी कद्रूची कल्पना झाली. तें शल्य तिला बोचूं लागलें. त्याचें परिमार्जन झालें पाहिजे. दोघींच्या संवादांत आपली सरशी झाली पाहिजे–आपल्याला करितां आली पाहिजे, असें कद्रूच्या कल्पनेनें घेतलें. ती क्षणोक्षणीं त्या कल्पनेच्या आधीन होऊं लागली. मनुष्यमात्राचें असेंच आहे. मग तो केवढाही मोठा असो किंवा लहान असो. एकदां ईर्षेला पडला, म्हणजे त्याला स्वतःच्या कल्पनेशिवाय, इच्छेशिवाय दुसरें तिसरें कांहीं दिसतच नाहीं. त्यांतल्यात्यांत बायकांच्या बाबतींत तर हा अनुभव फारच येतो. बायकांना ईर्षेला पडावयाला कितीही क्षुल्लक कारण असलें तरी पुरतें आणि एकदां स्त्रिया ईर्षेला पडल्या म्हणजे प्राण गेला तरी माघार घ्यायच्या नाहींत, असें म्हणतात.

कद्रूच्या मनोवृत्तींत फरक पडूं लागला. मनाची चलबिचल होऊं लागली. मोघम रत्नांच्या चर्चेत “ तुझीं मुलं तुला आवडत नाहींत काय?” असं सवतीनें विचारून थट्टा केली. उपहास केला, त्याबद्दल सवतीचें पुरें उट्टें कसें काढतां येईल याबद्दल तिचें मन विचार करूं लागलें. क्षणभर ती अगदीं तटस्थ बसली. इष्टहेतूच्या सिद्धीकरितां ती एकादा मनासारखा उपाय शोधूं लागली. दुष्ट बुद्धीला आडमार्ग शोधायला फार उशीर लागत नाहीं. त्या प्रमाणें कद्रू एकेक मार्ग शोधूं लागली. ती स्तब्ध राहिली असें विनतेला वाटलें, कद्रूच्या डोक्यांतली पहिली वावटळ शांत झाली. तिलाही त्या कल्पनेनें सुटल्या प्रमाणें झालें. तिनें समाधानाचा श्वास सोडला. ती कद्रूला पुन्हां कांहीं विचारणार तोंच मनाशीं कांहीं एक ठरवून कद्रूनें विचारलें:—

“ ताई—”

“ काय माई !—

“ लक्ष्मी तूं पाहिलीस ? ”

“ लक्ष्मीचं दर्शन देवाइतकंच दुर्लभ असतं ! ”

" बरं तिचा बंधुतरी ? "

" तो काय आपल्या सर्वांच्या परिचयाचाच आहे ! " विनता हंसत उत्तरली. तिनें हंसूं दाबण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. पण तो तिला साधला नाहीं. ' आपण हसलों नसतों. तर बरं झालं असतं. ' असं तिचं तिलाही मागाहून वाटलं. पण पश्चात् बुद्धि काय कामाची ? गोष्ट होऊन गेली होती—व्हावयाची नव्हती ! त्या उत्तराचा व त्या तिच्या हंसण्याचा परिणामही कद्रूवर अधिकच चमत्कारिक झाला. तिनें दांत करकचले. पण विनतेला तें दिसूं दिलें नाहीं. तिनें विनतेचें हंसणें मनावर घेतलें नाहीं; असेंच दाखविलें. पुन्हां तिनें रत्नांचाच विषय चालूं केला. कौस्तुभ, चंद्र, ऐरावत, इत्यादि, रत्नांबद्दल त्या दोघींचें चांगलेंच एकमत झालें. विशेषतः चंद्राबद्दल दोघीजणी किती किती तरी बोलल्या. त्यावेळीं दोघीही इतक्या एकात्म झाल्या कीं, क्षणभरापूर्वींचे सर्व विचारविकार अजीबात दोघीही विसरून गेल्या असाव्यात, असें कोणालाही वाटले असते, नव्हे त्या दोघींना तसें वाटलें. विनतेला तर वाटलेंच वाटलें. पण कद्रूलाही वाटल्याचें दिसलें. मग खरेंखुरें तिच्या अंतःकरणांत काय होतें हें तिचें तिलाच माहित !

चंद्राबद्दलचें जुळलें. कौस्तुभाविषयींही वितंडवाद होण्याची पाळी आली नाहीं. सुरेविषयीं दोघीही बोलल्याच नाहींत. त्यावरून त्या ऐरावताच्या वर्णनावर आल्या. गुणांवरून त्यांचें बोलणें एकेका रत्नांबद्दलच्या रंगावर आलें. जीं रत्नें प्रत्यक्ष पाहिलीं नव्हतीं, त्याबद्दल बोलणें कठीण होतें. पण पाहिलेल्या रत्नांच्या रंगाबद्दल बोलावयाला कांहींच हरकत नव्हती. कद्रूनें अशा सहज गमतीनें पाहिलेल्या रत्नांच्या रंगाबद्दल हंसत हंसत बोलणें काढलें. शंखाबद्दल काढलें. चंद्राबद्दल काढलें आणि ऐरावता बद्दलही बोलणें झालें. कांहींत मतें जुळलीं. कांहींत जुळलीं नाहींत. कित्येकदां साक्षीपुराव्याची जरूरी दोघींना पडूं लागली, तर कित्येकदां आपापल्या नेत्रांच्याच पुराव्यावर भर देऊं लागल्या. रत्नांत उच्चैश्रवा दोघींनींही पाहिलेला होता. पण एकदम दोघींनीं मिळून पाहिला नव्हता. दोघींनाही उच्चैश्रव्याच्या धवलतेबद्दल खात्री होती. तरीही संवादाच्या ओघांत उच्चै-

श्रव्याचा विषय निघालाच. बोलणें अगदीं सहज गंमतीनें म्हणून चाललें होतें. बोलण्याची पाळी विनतेची होती:—

" उच्चैश्रव्याची धवलता अवर्णनीय आहे नाहीं ताई ! "

" उच्चैश्रवा आणि धवल ? मुळींच नाहीं ! " कद्रूला विरोध करण्याची एकदम लहर आली.

" नाहीं तर काय ? तो काय कृष्णवर्ण आहे ? मी पाहिला आहे पण ! माझ्या डोळ्यावर माझा पूर्ण विश्वास आहे ! " विनता ठासून उद्गारली.

" माझाही पण माझ्या डोळ्यावर पूर्ण विश्वास आहे. मी पण तो पाहिला आहे. उच्चैश्रवा दुधाच्या सागरांतून काढलेला नाहीं. सर्वांग धवल असलें तरी त्याची शेपटी कृष्णवर्णाची आहे ! " कद्रूनें चापून सांगितलें.

" मुळींच नाहीं ! "

आला वाद ! दोघींनीं पाहिलेल्या रत्नाच्या रंगाबद्दल हा वाद हां हां म्हणतां उपस्थित झाला. दोघीही ईर्षेस पेटल्या. प्रत्यक्ष पाहिलेल्या पदार्था-बद्दल उगीचच कोण माघार घेईल ? स्वतःवरच स्वतः अविश्वास कोण दाखवील ? आणि आतां खरें कोणाचें ?

" आपण दोघी मिळून जाऊन पाहूं या का ?—" विनतेनें पुन्हां म्हटलें.

" हो ! " चटकन् कद्रू उत्तरली. " पण माझें म्हणणें खरें झालें तर?"

"आणि मी म्हणालें तेंच खरें असलें तर ?" विनतेनें तोच प्रश्न आवे-शाच्या भरांत केला.

" मी माझ्या ताईची दासी होऊन राहीन ! " कद्रूनें आपल्या परी हट्टीपणाचा शेवट केला. " पण ताई, जर कां माझें खरें झालें तर तूंही माझीच शर्थ पाळली पाहिजेस अं ! "

विनता स्तब्ध झाली ! तिच्या सर्वांगांतून चमकन् वीज चमकून गेल्या-सारखें वाटलें. तिला कसेसेंच झालें. तसेंच कद्रूलाही. पण किती वेळ ? निमिषमात्रांत हें सर्व होऊन गेलें !

## मातृसेवा

" ताई गप्प कां ? माझा पण तुला मान्य नाहीं ? " काय वाटून कोण जाणें कद्रूनें पुन्हां प्रश्न केला. यावेळचा तिचा आवाज कसा होता हें सांगतां येणें कठीण आहे. विनतेलाही त्या आवाजांत विशेष वाटलें नाहीं. कद्रू कांहींशी हंसरीच दिसली.

" बरं तर ! " विनतेच्या मुखांतून कसे कोण जाणें शब्द बाहेर पडले ! विनता यावर हें उत्तर देईल असें कद्रूला वाटलें नव्हतें. पण तें उत्तर ऐकून ती मनाशीं कांहींशीं चरकली. पण तिनें तें दिसूं दिलें नाहीं.

उच्चैश्रवा पाहावयाला जायची वेळ दोघींना सोयस्कर होईल अशी निश्चित करण्यांत आली. दोघीही हंसत हंसत उठल्या दोघींच्या अंतःकरणांत मात्र ठोके जोरानें पडायला सुरुवात झाली होती. विनतेला हुरहुर वाटते आहे, असें वाटलें, तर कद्रूच्या मनाची चांगलीच त्रेधा उडाली. दोघींच्या मनाच्या पुढें एकच प्रश्न होता–उद्यां आपल्याला उच्चैश्रवा कसा दिसणार ?

कोणत्या मुहुर्तावर कद्रूनें विनतेला विचारलें होतें ?

कोणत्या मुहुर्तावर विनेतेनें कद्रूला उत्तर दिलें होतें ?

आणि उद्यां काय होणार होतें ? तें उद्यांलाच माहित !



# प्रकरण दुसरें

-सत्तेची लालसा, दुसऱ्याला आज्ञेंत ठेवण्याची हौस, दुसऱ्यावर प्रभुत्व-
-गाजविण्याची अनिवार महत्वकांक्षा, या चीजा ईश्वरानें प्राणीमात्रा-
-जवळ अशा कांहीं निर्माण करून ठेवल्या आहेत कीं त्याबदल-
—विचार करावा तेवढा थोडाच होईल !—

कश्यप महामुनींच्या आश्रमाची बाह्य शोभा जशीच्या तशीच होती. शेजारची सरिता नित्याप्रमाणें झुळझुळ वहात गूढ गाणीं गात होती. झाडांवर, फुलांवर, पानांवर, हिरवळीवर, प्रातःकाल, माध्यान्हकाळ आणि सायंकाळचा सूर्य आपल्या किरणांनीं निरलसतेनें जीवन घालीत होता. गायीगुरें चारापाणी घेत असता हुंबरत होतीं, व त्यायोगानें आश्रमाची पुण्याई द्विगुणित होत आहे, असें प्रतीत करीत होतीं. गाईचीं वासरें स्वच्छंदानें इतस्ततः उड्या मारून आश्रमवासियांना सुखवून अंतरंगींचा निर्मळपणा व्यक्त करीत होतीं.

प्रत्येकाचें नित्यनैमित्तिक यथास्थित चाललें होतें. पण अशा त्या परम-पवित्र आश्रमांत कद्रू आणि विनता यांच्या मनामध्यें रत्नांच्या वर्णनावरून एक तऱ्हेचा 'पण' लागल्या क्षणापासून कसल्या विषारी लाटा उत्पन्न होऊं लागल्या होत्या. त्यामुळें कद्रूच्या दृष्टीला आपला आश्रम कांहीं निराळेंच स्वरूप दाखवूं लागला, तर विनतेच्या नेत्रांनाही तसाच कसला-तरी भास होऊं लागला. आश्रम आणि आश्रमाचा आसमंतात् भाग. त्यांतील स्थिरचर वस्तुसह केवळ आपल्या स्वामित्वाच्या आहेत. एकट्या एक आपण त्या सर्वांच्या स्वामिनी आहोंत, असें घडीघडी कुणीतरी कद्रूच्या कानांत अगदीं विश्वासानें सांगत असल्याचें तिला ऐकावयाला येत होतें, तर विनतेला आश्रमाकडे पाहातांना भलत्याच कल्पना भेवडावीत होत्या. जशी ज्याची दृष्टि असते, ज्यावेळीं जसा ज्याचा मनोव्यापार चाल-लेला असतो, त्याप्रमाणेंच त्याच्या सभोंवारची सृष्टि नटलेली त्याला दिसत असते. कद्रूचें मन एका उन्मादकारी आनंदानें भरत चाललें होतें, तशींच

तिला सभोंवारची सृष्टि दिसत होती. विनतेचें मन कशानें कोण जाणें पण उगीचच्या उगीच भयव्याकुळ झालें होतें, तर तिला आपल्या सभोंवारची सृष्टि आपल्याला खायला उठली आहे, असें वाटूं लागलें होतें.

" पण ! " एकच लहानसा दोन अक्षरांचा शब्द ! पण या एकाच शब्दानें कद्रूच्या आणि विनतेच्या मनांत केवढीं वावटळें उत्पन्न करावयाला प्रारंभ केला. केवढें त्या शब्दाचें सामर्थ्य आहे. उच्चैश्रव्याचा रंग कद्रूच्या म्हणण्याप्रमाणें ठरला तर विनतेनें कद्रूची दासी व्हावयाचें, किंवा विनतेच्या बोलाला सत्याचा पाठिंबा मिळाला तर कद्रूनें तिचें दास्य पत्करावयाचें, असला तो पण ! पाहिला तर किती साधा आहे, किती पोरकट आहे; पण त्यानेंच उग्ररूप धारण केलें तर त्याच्याइतका भीतिप्रदही दुसरा पदार्थ नाहीं. काय ? कुणी तरी कुणाचें तरी दास्य पत्करावयाचें ? शरिरानें, मनानें, इच्छेनें एकानें दुसऱ्याच्या अंकित जावयाचें ? काय ही क्रूर कल्पना ! या कल्पनेला ईश्वराच्या संकेताचा कुठें पाठिंबा आहे काय ? नाहीं. खचित नाहीं ! हे सर्व मानवीमनाचे खेळ आहेत. हाच खेळ खेळावयाची कद्रूला बुद्धी झाली. तिनें प्रसंग साधून डाव टाकला. त्या डावांत विनतेनेंही भाग घेतला. आपल्या डावाचें दान बरोबर पडणार, असें आरंभींच कद्रूला वाटून तिला आसुरी आनंद वाटूं लागला. तर आपण भलत्याच खेळाला उत्तेजन देऊं लागलों, या कल्पनेनें विनतेच्या मनाला बरें वाटेना. सख्या बहिणी, प्रेमळ सवती, पण त्यांच्यामध्यें कोणीतरी कोणाचें तरी दास्य पत्करावयाचें आहे; ही भावना विनतेच्या मनाला धक्के देऊं लागली. भवितव्याच्या पडद्यापलीकडे काय आहे ? हें कोणाला कसें कळणार ? कद्रू सहज म्हणाली. थट्टेथट्टेंतच तें सारें बोलणें झालें, नुसता तो विनोदच झाला, कीं तें बोलणें कद्रू खरेंच धरून चालणार ? असला खेळ नाहीं खेळलों तर ? ईर्षेला नाहीं पडलों तर ? पडूंच नये; ज्या खेळाचा परिणाम सांगतां येत नाहीं, आणि कळला तर वाईट असाच कळतो, त्या खेळावाचून काय अडलें आहे ? दुसऱ्याला आपलें दास्य पत्करायला लावूं नये, आपणही दुसऱ्या कोणाचें दास्य स्वीकारूं नये,

# प्रकरण दुसरें

ईश्वराघरचे सर्व प्राणी सारखेच. कोणी कोणाचे अंकित कां व्हावें ? मानवी मनानें अशी दुष्ट बुद्धि कां धरावी ? आपल्या मनांत तसें कांहीं आलें आहे काय ? खरोखरी असें मनांत येऊन आपण कद्रूच्या खेळाला अनुमति दिली आहे काय ? विनता असे प्रश्न वरचेवर स्वतःचे स्वतःलाच विचारूं लागली. तिचें एक मन म्हणूं लागलें, खेळलों हें चांगलें झालें. आपली बाजू सत्य आहे. चक्षुर्वैसत्यं अशी आहे. आपण उद्यां अशा तऱ्हेनें डाव जिंकल्यावर कद्रू जरी पणाप्रमाणें आपली दासी झाली तरी आपण होऊनच तिला वचनमुक्त करावें, आपण आपलें दास्य तिला पत्करावयाला लावूं नये म्हणजे झालें. आपलें आपण नीट वागावें, ईश्वरी खेळ ओळखून वागल्यावर कसली हरकत आहे ? तर दुसरें मन लगेच म्हणे, " छेः बाई ! झालं हें कांहीं योग्य झालं नाहीं. डोळ्या-वर तरी कुणीं विश्वास ठेवावा ? आपल्या डोळ्यांनीं आपल्याला फसविलें नसेल कशावरून ? किंवा उद्यां फसविणार नाहींत, याला तरी कसला आधार आहे ? जर करतां आपल्या डोळ्यांनीं आपल्याला फसविलें, पणांत आपण हरलों, तर कद्रू आपलें मन आपल्याप्रमाणें थोर करील काय ? आपण होऊन वचन मुक्त करील काय ? कुणी सांगावें, तिच्या मनांत काय असेल तें ! छेः ! कद्रूचें मन कुणालाच कळणार नाहीं ! आणि तिला नंतर आपल्याला तसं थोर मन कर, असं म्हणतांही येणार नाहीं. निमूटपणें प्राप्त परिस्थिति स्वीकारावी लागेल...." विनतेचे विचार असे चालू होते. अगदीं विचार शेवटच्या टोंकाला पोंचत. आपल्याला कद्रूचं दास्य करावं लागेल--लागलं--आपण दासी झालों, अशी विचारांच्या भरांत क्षणमात्र तिची कल्पना होई, आणि बसल्या जागीं तिचें सर्वांग थरारून जाई ! मस्तक सुन्न होई ! ती कावरीबावरी होऊन निमिषमात्र ती इकडे तिकडे पाही. आणि भानावर येई. वस्तुस्थितींत फरक झालेला नाहीं, हे सर्व आपल्या मनाचे खेळ चाललेले आहेत, याची जाणीव होऊन, ती आपल्या दुबळ्या मनाला हंसे. तशीच अकारण खिन्न होई.

असें झालें म्हणजे ते विचारच विसरण्याचा विनता प्रयत्न करी. तसें

वेडेंवाकडें कांहीं व्हावयाचेंच नाहीं मुळीं. परदास्याची पाळी आपल्यावर यावयाची नाहीं, आपण कोणावर आणावयाची नाहीं. पणाचा सहज खेळ इतका विकोपाला जायचा नाहीं; मग त्याची इतकी भीति कां? अशी मनाची ती समजूत घाली. आणि मनांतून सर्व कुकल्पना काढून टाकून ती गृहकृत्याला लागे. कांहीं क्षण ती वरीलप्रमाणें विचारावर आपला ताबा चालवी. पण पुन्हां ते विचार अधिक जोरानें तिला न जुमानतां उसळत. आणि तिची त्रेधा उडवीत.

जोंपर्यंत कुकल्पनेची बाधा मनाला झालेली नसते, तोंपर्यंत सर्व कांहीं ठीक असतें. पण त्या कल्पनेनें एकदां कां ठाणें दिलें म्हणजे त्या मनाचे हाल कोणी पुसूं नयेत. वस्तुस्थितीपेक्षांही त्या कल्पना मनाला सळो कीं पळो करून सोडीत असतात. तसेंच आतां विनतेचें झालें होतें. आपण कसल्या तरी कुकल्पनेला बळी पडलों आहोंत, आपण भलत्या गोष्टीला अनुमति दिली आहे, अतिशय लहान कां होईना आपल्या हातून कांहीं तरी चूक झाली आहे ही जाणीव विनतेला भयंकर जाचूं लागली. ती आज नित्याचेंच कार्य करीत, आपल्याच आश्रमांत वावरत होती; पण तिची मनोभावना निराळी होती. तिच्या नेत्रांना निराळींच दृश्यें दिसत होतीं. समोरच्या सरितेकडे तिनें पाहिलें. आश्रमांतल्या फळाफुलांच्या वृक्ष-लतांना पाणी पाजण्याकरितां किंचित् ओघाला बांध घातलेला होता; तें पाहून विनतेला वाटलें आपण सरितेला दासी केलें आहे, आपल्या अटकेंत ठेवलें आहे. ही कल्पना तिला सहन झाली नाहीं. म्हणून तिनें तिकडून आपली दृष्टि वळविली, तर गाईगुरें अजून दाव्यांला अडकलेलीं तिला दिसलीं. हीं गाईगुरें आपल्या बंधनांत आहेत. आपण त्यांचे सत्ताधारी आहोंत. आपण त्यांना सोडणार तेव्हां तीं चारापाणी घ्यावयाला मुक्त होणार. त्यांनीं चारापाणी घेणें त्यांच्या हातीं नाहीं. तीं मुक्त नाहींत. विनतेला तेंही पाहवेना. म्हणून ती झटकन् तेथून दुसरीकडे गेली. इकडे कांहीं सुन्दर झाडें कुंपणांनीं वेष्टिलेलीं होतीं. अशा सुंदर झाडांना त्या कांटेरी कुंपणाच्या दास्यांत रहावें लागावें ना? असा प्रश्न विनतेच्या

# प्रकरण दुसरें

कानांत कुणी तरी कुजबुजल्यासारखें वाटलें. याप्रमाणें आज विनता पाहील तिकडे बंधनें आढळूं लागलीं. कोणी तरी कोणाच्या दास्यांत अडकल्याचें आढळूं लागलें. तिच्या दृष्टीला दुसरा विषयच दिसेना. सरितेनें, गाईगुरांनीं, या सुंदर वृक्षांनीं, 'दुसऱ्याचें दास्य पत्करूं' असला एकादा 'पण' लावून कसला खेळ खेळला होता काय ? म्हणून त्यांना हें दास्य करावें लागत आहे ! तो सरितेचा बांध काढावा, गाईगुरांना दाव्यापासून मुक्त करावें, व पुन्हां त्यांना कधींच बांधूं नये. झाडांच्या सभोंवारचा कांटेरी कुंपणाचा निर्दय जाच नाहींसा करावा, असें विनतेच्या मनांत एकसारखें येऊं लागलें. ती अशा तऱ्हेच्या अनेक विचारांनीं अगदीं हतबुद्ध झाली. आश्रमांतलें पडेल तें काम कोणीही करावयाचें, असें असे. आज विनता आंगण झाडूं लागली. आंगण झाडतां झाडतांच तिला वाटूं लागलें, कद्रूनें आपल्याला आंगण झाडण्याची आज्ञा केली असून तिच्या आज्ञेनुसार आपण आंगण झाडतों आहोंत. आंगण लवकर झाडून झालें पाहिजे, नाहीं तर कद्रू काय बोलेल त्याचा नियम नाहीं ! विचार येण्याबरोबर विनता गलित गात्र होऊन जागच्या जागींच थबकली. तिच्यानें आंगण झाडूनही होईना !

अशीं तिची व्याकुळवाणी मनाची अवस्था झाली.

एकदां तिच्या मनांतही आलें कीं आपणच जाऊन कद्रूला म्हणावें, "आपण बोललों तें थट्टेनेंच ना ? विनोदानेंच ना ? विनोदानेंच 'पण' लावला आहे ना ? तें खरेंच समजून अशीशीं खेळ खेळायचे नाहींत ना ?" मनांत येतांच हातांतलें काम तसेंच ठेऊन ती तशीच कद्रूकडे जायला निघाली. पण आतां तिचे पायच उचलेनात. ती जागच्याजागींच खिळून राहिली. कद्रूनें आतां आपला शब्द नाहीं ऐकला तर ? आपला केवढा अपमान होईल ! केवढी ती आपली मानहानी ! शिवाय आपण भ्यालोंसेंही दिसणार. त्यामुळें तिला अधिकच अवसान येईल. ती जास्तच हट्ट धरून बसेल. त्यापेक्षां न गेलेलेंच घरें. जें काय व्हायचें असेल तें होईल. नशीबाचा लेख चुकविणार कोण ? आतां हात दाखवून अवलक्षण समजावून घेण्यांत अर्थ काय ? अशा विचारांनीं तिच्या मनावर निराळेंच दडपण पडलें. तिनें

कद्रूचें मन वळविण्याविषयींचा आपला विचार अजीबात सोडून दिला. कांहीं केल्या तिच्या मनाची तळमळ थांबेना. मन अत्यंत अस्वस्थ झालें. उच्चैश्रव्याची नखशिखांत घवलतां तिच्या नेत्रापुढें अढळ होती, तरी तिच्या मनाला चैन पडेना! तिनें डोळे मिटले तरी डोळ्यापुढें कसले तरी चमत्कारिक देखावे दिसूं लागले. डोळे उघडे ठेवले तर—दाव्याला अखड-लेल्या गाईगुरांचे दीनवाणे डोळे, कांटेरी कुंपणांतून फांद्यांनीं, पानांनीं मुद्दाम बाहेर येऊन या कांटेरी जाचांतून आम्हांला स्वतंत्र करा, असे घाडलेले मूकसंदेश, आणि सरीतेचा देखावा, हें तिला दिसे. यांनीं तिचें चित्त अधिक व्याकुळ होई.

विनतेला वाटूं लागलें, भावी संकटांच्या या आपल्याला सूचनाच आहेत. त्या सूचना ऐकल्यावर तिचें चित्त कुठें लागेना, कशांत रमेना, कीं तोंड उघडून आपलें हृदय हलकें करावयाचा तिला स्थान मिळेना!

इकडे विनतेची ही अवस्था, तर तिकडे कद्रू कोणत्या विचारांत दंग होती? कद्रूला आपला आश्रम कसा दिसत होता? जी दृश्यें विनतेला भयदायक दिसली, त्याच दृश्याकडे पाहून कद्रूच्या कल्पना कशा चालूं लागल्या होत्या? एकच आश्रम, तिथलींच सर्व दृश्यें; त्या आश्रमांत वावर-णाऱ्यांच्याच मनाचा सारा खेळ, पण मौज काय पहा!—

सरितेचा बांध कद्रूलाही दिसला, गाईगुरें दावणींत दाव्याला माना अडकवून पडलेली तिलाही दिसली. वृक्षांना कांटेरी कुंपणांनीं आपल्या सक्त पाहाऱ्यांत ठेवल्याचेंही तिला आढळले. पण त्या कोणत्याही दृश्यांनीं कद्रूला भेडसाविलें नाहीं. उलट सरिता जशी आपली अंकित आहे. गाई-गुरें जशीं आपल्या कह्यांत आहेत, वृक्षलतांवर जसा काटेरी कुंपणानें आपला ताबा चालविला आहे, त्याच मालिकेंत उद्यांपासून विनता येणार. विनता उद्यांपासून आपली दासी होणार. आपण तिच्यावर वर्चस्व चाल-विणार, अशीं भरदिवसा, चालतां फिरतां कद्रूला जागृतस्वप्नें पडूं लागलीं होतीं. तिचा आसुरी आनंद वाढीस लागला होता. सरितेच्या खळखळा-टांतलें गाणें कद्रूला आपल्या वैभवाचें यशोगान गाण्याकरितांच आहे,

असा भास होत होता. गाईगुरांची दीनदृष्टि, आपल्या पायांशीं विनम्र-भावानें नम्र झाली आहे, अशी तिची समजूत होती. कांटेरी कुंपणांतून पुढें दिसणाऱ्या झाडांच्या फांद्या, आणि पानें, आपल्याला करभार देण्याकरितांच सज्ज आहेत, अशी तिची खात्री होती. विनतेला आपल्या संबंधांत तसेंच उद्यां करावें लागणार आहे, हा विचार कद्रूला उत्तेजित करीत होता. आश्रमांत इकडून तिकडे तिकडून यकेड हिंडतांना ती अगदीं तोऱ्यांत हिंडत होती. तिचें प्रत्येक पाऊल आपण आश्रमाच्या एकट्या एकच स्वामिनी आहोंत. या जाणीवीनें पडत होतें. आश्रम आणि आसमंतात् भाग आपलें स्वामित्व मान्य करीत आहे. आपल्याला नम्रपणानें अभिवादन करीत आहे. आपल्या श्रेष्ठतेला पाहून अभिमानानें मंदस्मित करीत आहे. सृष्टि हंसते आहे, आनंदीत आहे, हीच कद्रूची ठाम समजूत होती !

तिच्या मनींचा उत्साह संभोंवारच्या सृष्टीवर पसरून तोच कद्रूला प्रतिबिंब रूपानें दिसत होता ! तिचें मन उत्तेजित होतें म्हणून सृष्टीही तिला उत्तेजित दिसत होती. तिला नवा उत्साह देत होती.

कद्रूच्या मनांतून बहिणीचा लडिवाळ भाबडेपणा केव्हांच लुप्त झाला होता. सवतीचा प्रेमळपणा कधींच नष्ट झाला होता. ती कैएक दिवस एका प्रसंगाची वाट पहात होती. तो प्रसंग तिनें आपल्या चातुर्यानें निर्माण केला होता. आपल्या नशीबाच्या परीक्षेकरितां उच्चैश्रव्याच्या दिशाभूल करणाऱ्या वर्णाला धैर्यानें आणि धाडसानें मिळविलें होतें. एकाद्याला रत्नाचें सान्निध्य मानवते, वैभवाला चढविते, नशिबाची उलथापालथ करून टाकते, तर तेंच रत्न दुसऱ्या एकाद्याला, त्यानें त्याचें सान्निध्य मिळविण्याचें धाष्ठर्य केलें एवढ्याच क्षुल्लक अपराधावरून धुळीला मिळवितें ! कद्रूनें किंवा विनतेनें कोणत्याही रत्नाला जवळ केलें नव्हतें. तर त्या दोघींत रत्नाच्या—उच्चैश्रव्याच्या केवळ वर्णावरच वाद पडला होता. व त्या वादावरच प्रकरण चढाला लागलें होतें. रत्नाबद्दलचा नुसता वाद कद्रूला कोणत्या स्थितीला नेतो आहे, आणि विनतेला कोणत्या अवस्थेला पोंचवितो आहे, हें अजून निश्चित व्हावयाचें होतें. विनता गांगरून गेली

होती. कद्रूच्या मनानें आपण डाव जिंकणार असें निश्चित घेतलें होतें. तिच्या मनाच्या उत्साहापेक्षां, व तिच्या स्वतःच्या कारवाई-कुशल कृतीस सज्ज असणाऱ्या मनाच्या पाठींब्याशिवाय दुसरा कोणताच आधार नव्हता!

लक्ष्मीनें जसें विष्णूचें वैभव वाढविलें. वीष व चंद्र या दोन्हीं रत्नांनीं शंकरांच्या सुकीर्तींत जशी भरच घातली, किंवा ऐरावतानें इंद्राच्या स्वर्गाला जशी आणखी शोभा आणिली, त्याप्रमाणेंच उश्चैश्रव्याच्या वर्णाचा नुसता वाद आपले हेतु पूर्ण करणार! असें कद्रूच्या मनानें पक्कें घेतलें होतें. उश्चैश्रव्याच्या वर्णाविषयीं तीही अगदीं पहिल्यापासून साशंक होती. तरी निश्चयानें, ती 'पण' बोलून गेली होती. तो 'पण' तिला शेवटास नेणें—तो आपल्या मताप्रमाणें करून घेणें जरूर वाटत होतें. ती आपल्या मनाची या प्रसंगाकरितां फारा दिवसापासून तयारी करीत होती. केलेला 'पण' खरा कसा व्हावयाचा? खरा कसा करावयाचा? एवढेंच कद्रूच्या मनांत घोळत होतें. आपल्याप्रमाणेंच विनतेच्या मनांत या पणाबद्दल काय घोळत असेल? ती आपल्यासारखा 'पण' व्हावा, म्हणून काय करीत असेल? ती त्याकरितां जे डाव करीत असेल ते आपल्याला समजले पाहिजेत, आपल्याला ते वेळींच हाणून पाडतां आले पाहिजेत आणि आपला डाव खरा झाला पाहिजे. मग एवढ्या करितां काय वाटेल तें करावें लागलें तरी हरकत नाहीं. तें करावयाचें पण आपलें म्हणणें खरें करून दाखवावयाचें. कोणाही महत्वाकांक्षी व्यक्तीला हें असें करावेंच लागतें. सत्याचें असत्य आणि असत्याचें सत्य केल्याखेरीज मनासारखें कसें होणार? तसें केलें नाहीं, तर आपल्या हातांनीं आपल्या पायावर धोंडापाडून घेतल्यासारखें होणार नाहीं काय? उच्चैश्रवा खराच विनतेच्या सांगण्याप्रमाणें केवळ धवल वर्णाचाच असेल, आणि तो तसाच आपण कांहींही हातपाय न हालवितां, कोणत्याही प्रकारची कारवाई न करतां राहूं दिला, तर आपण होऊन विनतेचें दास्य स्वीकारल्याप्रमाणें होणार आहे. हा सर्व खटाटोप, ही सारी धडपड, हा सारा उद्योग, हा 'पण', हीं सर्व काय आपण होऊन विनतेचें दास्य करण्याकरितांच? कद्रूला ती कल्पना देखील सहन होत नव्हती. ती लगेच चव-

ताळे ! दांत करकरीत ती म्हणे, ' तें काय म्हणून ? मी हवें तें करीन !' माझा सारा उद्योग विनतेनें माझें दास्य करावें म्हणून आहे. तिचा तोरा माझ्यापुढें काय म्हणून ? ती मोठी, तिचीं मुलें चांगली. ती माझ्यापेक्षां श्रेष्ठ. तिचीं मुलें माझ्यामुलांपेक्ष चांगलीं. तें काय म्हणून ? हें मी कां ऐकून घ्यावें ? कां सहन करावें ? कां स्वस्थ बसावें ? जें कोणी माझ्यापेक्षां, माझ्या मुलांपेक्षां अधिक श्रेष्ठ असतील, त्यांना माझ्या पायाशीं नमवलेंच पाहिजे. त्यांना आमच्या करितां राबवलेंच पाहिजे. आमच्या करितां झिज-वलेंच पाहिजे. "

या प्रमाणें प्रतीक्षणीं कद्रूचे विचार भडकत चालले. विचार नुसते पेट घेत होते. त्या धगधगणाऱ्या अग्नींत कद्रू आपल्या एकेका सद्विचारांची आहूति टाकीत चालली होती. एकेका सद्गुणाला, सद्वासनेला बळी देत चालली होती. त्या अग्नींत ती नात्याला धगवीत होती. भगिनीप्रेमाला होरपळून टाकीत होती. स्त्रीसुलभ सहृयतेची करप मोठ्या दिमाखानें करीत होती. तिच्यापुढें आतां एकच दिसत होतें, तें हें कीं, विनता आपली दासी आहे. विनता आपली आज्ञा पाळीत आहे. विनतेला वागवूं तसें ती निमूटपणें वागवून घेत आहे ! आपण तिच्या स्वामिनी आहोंत. ही कल्पना आली म्हणजे कद्रूला क्षणकाल आकाश ठेंगणें असल्याचा भास होई !

खरोखर, सत्तेची लालसा, दुसऱ्याला आज्ञेंत ठेवण्याची हौस, दुसऱ्यावर प्रभुत्व गाजविण्याची मनिषा, ह्या चीजा ईश्वरानें प्राणीमात्राजवळ अशा कांहीं निर्माण करून ठेवल्या आहेत, कीं त्याबद्दल जेवढा विचार करावा, तेवढा थोडाच होईल ! त्याच्या तावडींत एकदां कां प्राणिमात्र गेला कीं, त्याची अवस्था काय होईल, तो आपण होऊन काय काय करावयाला तयार होईल, हें सांगण्याची सोय नाहीं. तो वाटेल तें करावयाला तयार होईल. त्याला पापपुण्याचा विचार राहणार नाहीं. आप्तेष्ट त्याच्या दृष्टींत दिसरणार नाहींत, कीं तो कोणाला ओळखणारही नाहीं. फक्त त्याला ' मी आणि माझें ' एवढेंच दिसेल. त्याकरितां तो वाटेल त्या दुष्कृत्याला प्रवृत्त होईल.

# मातृसेवा

अंगदीं हीच अवस्था कद्रूची झालेली होती. तिचें मन एकाच विचारानें भरून गेलें होतें. आपली बहिण आपली दासी होणार. आपली सवत आपण आपली दासी करणार! एरव्हीं केवढी भयंकर वाटणारी ही कल्पना! पण कद्रचें मन सत्तेच्या लालसेनें घेरलें होतें, विनतेला आशंकित करण्याच्या हौसेला बळी पडलें होतें, विनतेवर प्रभुत्व गाजविण्याच्या भरीं भरलें होतें, तेव्हां तिचें अधोगामी मन सद्विचाराला कसें प्रवृत्त होणार? उद्यांचा पण आपण जिंकतों कसा हा एकच विचार तिला विचार करावयाला लावीत होता.

कद्रूचें मन उत्साहानें भरून गेलें होते. बुद्धि तरल झाली होती. कोणतेंही कृत्य आचरावयाला मन सज्ज झालेलें होतें. अशा वेळीं तिला एकापेक्षां एक कल्पना सुचण्यास अवघड काय? आणि सुचल्या तर नवल काय? शिवाय सुविचार सुचावयाला कठीण जात असले तरी कुविचारांची जंत्री एकदा सुरू झाली म्हणजे ती थांबावयाचें कारण नसतें. इतकेंच नव्हे, तर ती एकदां आंवाक्याच्या बाहेर गेली म्हणजे ज्याची त्यालाही आवरण्यास त्रास पडतो. कद्रूला तशा कल्पनावर कल्पना सुचूं लागल्या. त्या कल्पना तिला कोण सुचवित होतें कोण जाणें. जशा कांहीं तिच्या कानांत कोणी अचूक येऊन सांगत होतें. जसजशा त्या कल्पना तिला सुचूं लागल्या, तसतशी कद्रू आपआपल्याशींच पुटपुटूं लागलीः—

"वेडे कद्रू, तूं एवढी भाग्यवान असतांना तूं उद्यां पण कसा जिंकशील, याची तुला काळजी कां वाटावी? लहानपणीं पित्याजवळ आपल्याला कोणताही हट्ट घेऊन तो पुरा करून घेतां येतो. तरुणपणीं पतिदेवाकडून आपल्या इच्छा, मनिषा, आशा, लाजून, रुसून, हंसून, रागावून, सुफलित करून घेतां येतात आणि प्रौढपणीं आपलीं मुलें वांच्छा पुरवावयाला तत्परतेनें आपण होऊन पुढें येतात. शेषकर्कोटकासारखीं हजार मुलें देवानें तुझ्या उदरीं घातलीं असतां, तुला एकाद्या क्षुल्लक गोष्टीबद्दल पंचाईत पडावी, हें आश्चर्य नाहीं का? माझीं मुलें मी सांगेन तें करावयाला तयार होतील. नव्हे झालींच पाहिजेत! ज्या गोष्टींत माझं सौख्य सामावलेलं

आहे, मुलांचं कल्याण साचलेलं दिसतं आहे, तें कार्य करायला माझीं मुलें मागें कां पहातील ? माझीं हजार मुलें आहेत—माझीं तीं हजार रत्नें आहेत. जगांतल्या केवढयाही रत्नापेक्षां मला तीं अधिक प्रिय आहेत ! 'हींच रत्नें तुला आवडत नाहींत काय ?' असा सवतीनें कुत्सित प्रश्न करून माझी कुचेष्टा केली आहे. तीं मला किती आवडतात, त्यांच्याकडून मी केवढं महत्कार्य करून घेतें. हें प्रत्यक्ष माझ्या सवतीला कृतीनें दाखवूनच मी तिचा नक्षा उतरणार आहें. माझीं मुलें मी सांगतांच काय वाटेल ती युक्ति काढतील आणि माझा हेतु पूर्ण करतील. एवढयाचकरितां मुलं असावी लागतात ! "

मुलांची आठवण होतांच आणि त्यांचें साह्य आपल्याला खास होणार हा विचार येतांच कद्रूला केवढा आनंद झाला. तिचा आनंद गगनांत मावेना. हृदय भरून आलें. ती लगेच मुलांना लगबगीनें शोधावयाला गेली. एकेकाला प्रेमानें हांका मारूं लागली. मुलें हांकेसरशीं आपल्याजवळ केव्हां येतील, आपण त्यांना आपल्या मनींचें गुज केव्हां सांगूं असें कद्रूला होऊन गेलें. मुलें आल्यावर त्यांना काय सांगावयाचें, त्यांना कसें पढवावयाचें, सर्वांच्या कल्याणाकरितां, सौख्याकरितां कोणती कारवाई लढवावयाची, याबद्दल तिनें कांहीं एक पक्का निश्चय मनाशीं करून टाकला. आणि तें सर्व सांगण्याकरितां ती मुलांना उतावीळपणानें एकसारख्या हांका मारूं लागली.



# प्रकरण तिसरें

—त्यावेळीं शेषाच्या मनांत काय विचार चालले असतील? हें कोणाला उलगडून सांगतां येईल काय? तो आपल्या आईविषयीं, कर्कोटकादि भ्रातृवर्गाविषयीं सापत्नमाता विनता हिच्या विषयीं, किंवा सापत्न बंधु गरुड-अरुण यांच्या विषयीं विचार करीत असेल कीं त्याच्या विचाराची सृष्टि निराळीच असेल? कोणाला हें सांगतां येणार?—

"आई, हें काय सांगतेस तूं? काय बोलतेस? कोणते शब्द उच्चारतेस?" कद्रूचा जेष्ठ आणि श्रेष्ठ पुत्र शेष आपल्या मातेवर संतापून जाऊन विचारीत होता. आपल्या मातेच्या मनांत असे कांहीं विचार घोळत असतील, आपल्यापुढें ती असलें कांहीं बोलेल, याविषयीं शेषाच्या मनांत चुकूनही कधीं कल्पना आली नव्हती. शेष खवळला. त्याला कद्रूचे विचार मुळींच मान्य झाले नाहींत. आपल्या आईच्या बोलण्यावर आपला वडील बंधु इतकें संतापून बोलेल, असें कद्रूच्या इतर मुलांनाही वाटलें नव्हतें. सर्वच प्रकार अनपेक्षित झाला. आपलें बोलणें मुलाला रुचलें नाहीं, मुळींच रुचलें नाहीं, इतकेंच काय त्यानें तात्काळ आपल्या बोलण्याचा प्रतिकार केला, हें पाहून कद्रूही चकित झाली. क्षणमात्रच कां होईना तिचें मन खट्टू झालें. तिच्या डोळ्यापुढचा मार्ग निमिषमात्र दिसेनासा झाला. शेषाच्या प्रतिकाराच्या भाषणानें कद्रूच्या मनावर निराशेची लहानशी लकेर येऊन झर्रकन् गेली. कद्रूच्या इतर मुलांतही बरीच गडबड उडून गेली. तीं मुलें स्तंभितच झालीं. मातेला दूषण द्यावें, आईच्या आज्ञेची अवहेलना करावी, कीं शेषाच्या शब्दांची छीः थूः करावी, हेंच त्यांना समजेना.

कद्रू कांहीं कच्ची नव्हती. क्षणमात्रानंतर ती पुन्हां भानावर आली. तिचा स्वाभिमान जागृत झाला. तिनें आपले नेत्र विस्फारले. तिनें तितक्याच त्वेषानें शेषाला उलट विचारलें, "मलाच उलट प्रश्न करतोस? माझ्या हेतूची अवहेलना करता काय?"

## प्रकरण तिसरें

" खरोखरच आई, तुझा हेतू अवहेलना करण्यासारखाच आहे. तो
ात्यंत निंद्य आहे ! " शेषानें पहिल्याइतक्याच धीमेपणानें शब्द उच्चारले.

" काय म्हणतोस ? "

" मी एकदां सांगितलें तेंच ?" शेष आणखी पुढें म्हणाला, " आई,
तकें संतापून जाण्याचें तुला कारण काय ? विनतामाईला तूं आपली दासी
रणार ? ती तुझी सख्खी बहिण आहे ना ? ती तुझी प्रेमळ सवत आहे
। ? ती आमचीही माता आहे ना ? मग तिला दासी करण्याची महत्त्वा-
ांक्षा कां ? तिला पारतंत्र्य प्राप्त करून देण्याची तुझी वांच्छा कां ? हा
झा हेतू निंद्य नव्हे काय ? त्याज्य नव्हे काय ? तिरस्करणीय नव्हे काय ?
। तुझ्या हेतुची अवहेलना करावयाला नको काय ?"

" मग काय माझ्यापेक्षां विनतेची प्रतिष्ठा तुम्हांला जास्त आहे ? "

" आम्हांला तुम्हीं दोघीही सारख्याच वंद्य आहांत. पवित्र आहांत !"

" तुमची आई जगाकडून विनतेपुढें यावज्जन्म तुच्छच लेखली जावी
सें तुम्हांला वाटतें ? "

" असें कसें वाटेल ? "

" विनतेच्या दोन मुलांपुढें माझीं हजार मुलें सदैव तेजोहीन दिसावींत;
ंना जगानें जेव्हां तेव्हां आणि जिथें तिथें विनतेच्या मुलांशीं तुलना
रून तुच्छ लेखावें, पाहून नाकें मुरडावींत, आणि हें पाहाण्याचें माझ्या
शीबीं असावें, अशीच माझ्या सर्व मुलांची इच्छा आहे काय ? "

" मुळींच नाहीं ! असली भलतीच कल्पना कोण सहन करील ? "
र्कोटक संतापानें व उतावीळपणानें एकदम मध्येंच म्हणाला. कर्कोट-
ाच्या बोलण्याचा कद्रूला तितकाच आधार मिळाला.

" पण आई, तूं म्हणतेस तें मुळीं दुरापास्तच आहे ! " शेष शांत-
ानें उत्तरला.

" विनतामाता, आम्हांत कधीं भेदभाव ठेवीत नाहीं. आम्हांला कधीं
ें भासतही नाहीं. आम्हीं आणि गरुड, अरुण, सर्वच समानतेनें वागतों,
ळतों. बरोबरीच्या नात्यानें प्रत्येक सौख्याचा उपभोग घेतों असें असतां—"

"हेंच तें. हेंच तें! तुमचें तेवढं बरोबर आणि मी म्हणेन तें सर्व खोटें, असें जें तुम्हांला वाटतें, तें हेंच! विनतेला भेदभाव दाखविण्याचं कारण काय? तिचं तें कार्य परस्पर त्रयस्थ जगच करीत आहे! तुम्हांकडे पाहून विनतेच्याऐवजी जगच परस्पर नाक मुरडीत असतें, याची जाणीव तुम्हांला कुठें आहे? जगाकडे तुमची दृष्टि अजून कुठें पोंचतें आहे? ती तशी पोंचली असती, तर तुम्ही असं कधींच म्हटलं नसतं! आपल्या आईच्या हेतुची हेटाळणी कधींच केली नसतीत्त! ज्या आईनं तुम्हांला वागविलं, वाढविलं, संगोपन केलं, जिची इच्छा सदासर्वकाळ आपल्या मुलांच्या कल्याणाचीच असते, जी त्या कल्याणाकरितांच झटत असते, झुरत असते, कढत असते, त्या आईच्या हेतुचा विपर्यास, तिच्या मुलांनींच करावा? यापेक्षां त्या आईचं दुर्दैव तें कोणतं? त्या मुलांनीं आपल्या आई-वरच रागवावें, यापेक्षां त्या आईच्या अंतःकरणाला शल्यासारखी टोंच-णारी दुसरी गोष्ट ती कोणती?" हें बोलतां बोलतांच कद्रूच्या नेत्रांत अश्रु उभे राहिले. तिचा स्वर गद्गदला!

शेषावर त्याचा कांहीं परिणाम झाला कीं नाहीं, हें सांगतां येणार नाहीं. परंतु कर्कोटकावर मात्र अपेक्षित परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. आईची कल्पना बरोबर आहे. तिचा हेतु स्तुत्य असून तो आपल्या सर्वांच्या कल्याणाचा आहे, ही त्याची तात्काळ समजूत दृढ झाली. त्यानें आपल्या सर्व भावंडाकडे एकदां पाहिलें. कित्येकांत आपापसांतच कांहीं कुजबूज चालली होती. कांहींच्या कुजबुजण्यांत शेषाचें नांव ऐकावयाला येत होते. तर कांहींच्या तोंडून कद्रूविषयीं उद्गार बाहेर पडत होतें. कर्कोट-काला वाटलें, ह्यावेळीं आपण सर्वांचा पुढाकार घेऊन आईच्या म्हणण्याला मान दिला पाहिजे. आई सांगेल तें आपण करावयाला तयार असलें पाहिजे. त्याप्रमाणें कर्कोटकानें पुढें होऊन कद्रूला म्हटलेंहीः—

"आई, मुळींच काळजी करूं नकोस. तूं आम्हांला वाटेल ती आज्ञा कर. आम्ही सर्व ती ऐकावयाला तयार आहोंत!—"

## प्रकरण तिसरें

"आम्हीं सर्व ? मुळींच नाहीं. मी त्यांत भाग घेणार नाहीं आणि माझ्या भावंडांनाही मी परावृत्त केल्याखेरीज राहणार नाहीं. पापी कल्पनांना प्रोत्साहन मी कालत्रयी देणार नाहीं!" शेषानें ठासून सांगितलें. कर्कोटकाचा नाइलाज झाला. तो क्रुद्ध मुद्रेनें शेषाकडे नुसताच पहात राहिला. कर्कोटकाच्या सहानुभूतीच्या बोलण्यानें कद्रूला किंचित् कोठें आधार पोंचत चालला होता, त्यावर शेषाच्या भाषणानें चांगलेंच विरजण पडलें. काय करावें हें कद्रूला सुचेना. आपलें म्हणणें मुलांना कसें मान्य करावयाला लावावयाचें, याबद्दल तिला चांगलाच विचार पडला. कद्रू गप्प बसलेली पाहून ज्या मुलांच्या अपुऱ्या बुद्धि होत्या, त्यांचीही कद्रूप्रमाणेंच अवस्था झाली.

परंतु कांहीं झालें तरी नांवाची ती कद्रू होती. तिनें आपलें गुज आरंभीं गोड प्रेमानें सांगितलें. नंतर तेंच रागावून सांगितलें. शेवटीं स्त्रियांचें अस्सल अस्त्र म्हणजे नेत्रांतले अश्रु, त्याही मार्गाचा तिनें अवलंब केला. त्याचा परिणाम एका शेषाशिवाय बाकीच्या मुलांवर झाल्याचें कद्रूच्या दृष्टोत्पत्तीस आलें. ती मनानें अतिशय चिवट होती. अश्रूंची सतत धार कायम ठेवावयाचीच पण त्याबरोबर भाषाही बदलावयाची असें तिनें मनाशीं ठरविलें.

तिचे हुंदके चालू होते. मधून मधून ती डोळ्याला पदरही लावीत होती. डोळे लालभडक झाले होते. तीच लाली नासाग्रीं आणि उभय कपोलीं पसरलेली होती. कपाळावर मनःस्तापानें घर्मबिंदू उभे राहिले होते. त्याच स्थितींत ती मुलांना उद्देशून बोलूं लागलीः—

"ऐकायचं नसेल माझें तर नका ऐकूं. माझा तुमच्यावर अधिकार आहे असें वाटत होतें. आईनं आपल्यावर आलेलें संकट मुलांना सांगावें; मुलांनीं निवारण करण्यास झटावं असं म्हणतात. शास्त्रंही असंच सांगतात. लौकिकरीति पण तशीच आहे. म्हणून मी तुम्हांला सांगायला गेलें. तुम्हांला नाहीं पसंत पडला त्याला मी तरी काय करूं ? आम्हीं पण लावूं नये, लावला आहे. उद्यां विनता माझी दासी होणार नसेल. माझी भवि-

तव्यता मला तिची दासी करणार असेल, तर त्याला कोण काय करणार ? प्रसंग माझ्यावर आहे. तेव्हां मला कुरुबुरु करून कसं चालेल ? मी माझ्या सवतीची दासी होईन. मी तिची सेवाचाकरी करीन. माझीं मुलं तुम्हीं. म्हणून पर्यायानें तुमच्यावरही तोच प्रसंग आहे. मी विनतेची दासी. तुम्हीं तिच्या दोन मुलांचे दास. निसर्गानें आजकाल तशी अवस्था न बोलतांच दिली आहे. मी हें सर्व पहात असतें, ऐकत असतें, सहन करीत असतें. ती स्थिति पालटण्याचा प्रयत्न करीत असते, संधीची वाट पहात असतें. तशी संधि दैवानें दिली म्हणा किंवा मी प्राप्त केली म्हणा, पण ती संधी आली. निसर्ग आमच्यावर मात करीत आहे, त्या निसर्गालाही कलाटणी देण्याची संधी आली. मी तुम्हांला सावध केलं. माझं मायेचं कर्तव्य होतं तें केलं. मायेला लाज नसते, म्हणून पुन्हां पुन्हां सांगितलं. तुमची इच्छा नाहीं. तुमची इच्छा मी माझ्या सवतीची दासी व्हावं, तुम्हीं आपल्या सावत्र भावांचे दास व्हावें, असं आहे, तिथें कोण काय करणार ? तुम्हीं माझ्याकरितां कांहीं करूं नका, तुमच्याकरितांही कांहीं करूं नका. तुमच्या माझ्या नशीबीं दास्य बडवलेंच असेल, तर टळणार कुठून ? तुम्हांला बुद्धि सुचणार कशी ? होऊं सारेच जणं त्यांचे दास ! छळूं द्या त्यांना आम्हांला ! मग त्याला उद्यांचा ‘ पण ’ तरी हवा आहे कशाला ? ‘ पण ’ जिंकण्याकरितां जर कांहीं प्रयत्न करायचा नाहीं, मुलांनीं कांहीं हातपाय हालवावयाचे नाहींत, तर यशाची आशा तरी करायची कशाला ? अपेश नशीबाला लागलेलंच आहे. तें अपेश आपलें आपल्याला कळल्यानंतर आपण होऊनच सवतीला जाऊन सांगितलं तरी त्यांत बिघडलं कुठें ? जीं माझीं मुलं माझ्या उपयोगी पडत नाहींत, तीं मुलं तरी कसलीं ? आणखी त्यांची मी आई तरी कसली ? ”

कद्रूचा एकेक शब्द तिच्या मुलाच्या हृदयाला बाणासारखा जाऊन जखम करीत होता. एवढा विचारी शेष. पण कद्रूच्या बोलण्याच्या ओघांत तोही डळमळला. त्याचें खंबीर मन कद्रूच्या अश्रूंच्या प्रवाहांत वाहून जाणार कीं काय, असें त्याला स्वतःलाच वाटल्याखेरीज राहिलें नाहीं.

## प्रकरण तिसरें

सत्याला, पावित्र्याला, पुण्याईला सदैव बिलगून असणारं त्याचं मन स्वस्थान सोडणार काय, असा त्यानें स्वतःलाच प्रश्न केला. बाकीच्या मुलांची त्रेधा विचारावयालाच नको होती. कर्कोटकाला मनस्वी संताप आला होता. शेषाला यावेळीं खाऊं कीं गिळूं असें त्याला होऊन गेलें होतें. तो कांहीं तरी शेषाला भयंकर टोंचून बोलण्याच्या विचारांत होता. पण त्याच्या मुखांतून शब्दच फुटणें कठीण झालें होतें.

आपल्या अश्रूंनीं शेषाचें मन द्रवत नाहीं हें पाहिल्यावर कद्रूही कुंठित झाली. त्याच्या खंबीर मनाचा अचंबा वाटूं लागला. खरें म्हटलें तर तिला खरा पाठिंबा शेषाचाच पाहिजे होता. इतरांपेक्षां शेषाचा भरंवसा तिला अधिक वाटत होता. कद्रूच्या हजार मुलांत जें पाणी चमकत नव्हतें तें शेषांत होतें. आणि खरें पाहिलें तर शेष होताही तसाच. तो करारी–विचारी–शांत–खंबीर मनाचा, निधड्या छातीचा, आणि एकादी गोष्ट एकदां करतों म्हटल्यावर स्वतःवर ब्रह्मांड कोसळलें तरी कार्याकरितां पुढें टाकलेलें पाऊल प्राणांतीही परत न घेणारा असा तो एकटा एकच असल्या-मुळें त्यावर कद्रू सर्वस्वी अवलंबून कां राहाणार नाहीं ? विनतेच्या गरुडा-जवळ उभा राहिला असतां त्यांतल्यात्यांत कद्रूच्या मनाला समाधान देणारा तिच्या हजार पुत्रांत शेषच काय तो एक. असें असल्यामुळें 'पण' लावतांना, व लावल्यावरही आपण शेषाच्या सहाय्यानें अमुक अमुक करूंच करूं असा तिला पूर्ण विश्वास वाटत होता. म्हणून तिनें आपलें मनोगत अगोदर मोठ्या प्रेमानें, हौसेनें, आनंदानें शेषाला बोलावून सांगितलें. तिची कल्पना शेषाला आपलें मनोगत कळलें कीं तो हर्षातिरेकानें नाचूं लागेल, आईच्या कल्पकतेबद्दल धन्यवाद गाईल. हें तिला प्रत्यक्ष पहा-वयाचें होतें. त्या अनुपम सौख्याचा आस्वाद तिला घ्यावयाची इच्छा होती. ती त्याकरितां किती उत्कंठिक होती. पण—

शेषानें तिची मनिषा कानीं येतें न येतें तोंच तिला धुडकावून दिलें. कद्रुचें सारे मनोरथ शेषानें एका शब्दाच्या फटकाऱ्यानें मातीला मिळविले !

आपली लाडीगोडी उपयोगी पडली नाहीं. राग वांया गेला. रडण्याच्या कांगावखोरपणाचीही शेषापुढें डाळ शिजली नाहीं, असें पाहिल्यावर कद्रू खरीच चिडली. ती वाटेल त्याच्यावर मनसोक्त तोंड सोडूं लागली. रागाच्या भरांत हव्या त्या शिव्याशाप तिची जीभ उच्चारूं लागली. संतापाच्या आवेशांत आपण कोणाबद्दल काय बोलतों याचें तिला मुळींच भान राहिलें नाहीं. स्वार्थलोलूपांचें असेंच असतें. स्वतःच्या कर्तव्याच्या–सुखाच्या–चैनीच्या आड कोणीही आलेलें त्याला खपत नाहीं. मग आपल्या स्वार्थाच्या आड येणारा बाप असो, भाऊ असो, किंवा पुत्र असो त्याची पर्वा त्या स्वार्थलोलुपाला मुळींच नसते. आड येणाऱ्या कोणाही व्यक्तीवर तो कठोर प्रहार खुशाल करीत सुटतो. तसेंच त्यावेळीं कद्रूचें झालें. आतांपर्यंत मुलांचीं मनें वळविण्यासाठीं साम, दाम, भेद सर्व करून पाहिलें. दंडाचा प्रकार व्हावयाचा होता तो संतापाच्या रूपानें अमलांत आणावयाचा, असें कद्रूनें निश्चित केलें आणि ती बोलूं लागली:—

" काय, एकाचीही वाचा वदत नाहीं ना ? देखतां डोळां मी परतंत्र व्हावं, पारतंत्र्याचं जिणं तुम्हां सगळ्यांनीं आपखुषीनें ओढवून घ्यावं, असंच अजून तुम्हांला वाटतं काय ? अरेरे ! कशाला तुम्हीं जन्माला आलां तरी ? आतांपर्यंत मी पाहिलं. सर्व तऱ्हेनें समजावून दिलं. तुमचं भवितव्य तुमच्या पुढें उभं केलं तरी त्याबद्दल रतीमात्र तुम्हां कोणाला कांहीं वाटत नाहीं. झाली माझ्या मुलांची पारख ! जगानं ती कशाला आणखी निराळी करायला पाहिजे ? जग तुम्हांला पाहून कपाळाला आंठ्या घालतं, नाक मुरडतं, तिरस्कार दाखवितं तेंच बरोबर आहे ? ज्यांना राग नाहीं, त्वेष नाहीं, धाडस नाहीं, ते जिवंत असून नसून मी सारखेच समजतें ! या क्षणापासून तुम्हीं माझीं मुलं नाहींतच असं मानतें. होतीं तीं मेलीं असं समजतें ! आईचं न ऐकणाऱ्या मुलांचं कल्याण कसं होणार ? आईच्या जळजळीत शापानं मुलांचें कधीं चांगलं होत असतं ? मला वाटतं, तुमच्या प्राणांचा बळी घेण्याकरितां सत्रच आरंभिलं तर तुम्हीं निमुटपणें त्यांत जाऊन प्राणार्पण कराल. ज्यांना आईच्या मुखाच्या आशिर्वादाचा पाठिंबा नाहीं, ज्यांच्या

हातून कोणतीही आत्मतेज दाखविणारी कोणतीही कृति कधीं आचरिली नाहीं, त्यांना पटापट प्राणार्पण करावें लागलें तर त्यांत नवल कसलें ? असं कधीं तरी होणार, अशींच मला एकेक स्वप्नं पडूं लागलीं आहेत. आणि प्रत्यक्ष तसं झालं, तरी त्याला कद्रू काय करणार ? तिला काय वाटणार ?..."

कद्रू जरा वेळ थांबली. तिच्या मुखांतून एकसारख्या अग्नीच्या स्फुलिंगाप्रमाणें शब्द बाहेर पडत होते. ते शब्द ऐकणाऱ्याच्या शरीरांचा आणि मनाचा भडका करीतच होते. पण प्रत्यक्ष कद्रूला त्या शब्दांनीं कमी क्लेश होत होते असें थोडेंच आहे ? त्वेषाच्या भरांत ती मुलांना जळजळीत शाप द्यावयाला प्रवृत्त झाली. नव्हे देऊनही गेली. तिच्या मुखांतून प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष शापवाणी निघूनही गेली. ती ऐकून सर्व मुलाच्या अंगांचा थरकांप झाला. आतांच आपल्यावर अशनिपात होतो आहे, असें त्यांना वाटलें.

कद्रूचा राग शांत न होतां, उलट वाढतच चालला होता. ती बसल्या जागेवरून उठली. सर्व मुलांकडे गरगरगर डोळे फिरवून तिनें पाहिलें आणि म्हणाली:—"बस्स पुरे ! यापुढें तुमचा अंत पाहाण्याची मला आवश्यकता नाहीं ! तुम्हीं कांहीं केलें नाहीं, तरी मला त्याची पर्वा नाहीं. ज्या कोणाला आपल्या आईला साह्य द्यायचं असेल, त्यांनीं माझ्याकडे यावं. कुणालाही यायचं नसेल तर त्यालाही माझी हरकत नाहीं. 'पण' मीं लावला आहे आणि तो जिंकण्यासाठीं प्राणांत होईपर्यंत मीच प्रयत्न करीत राहाणार ! उघड्या डोळ्यांनीं मी माझे प्राण कधींही जाऊं देणार नाहीं. उद्यां मी 'पण' जिंकला तर विनता माझी दासी होतेच आहे. तिचीं मुलेंही दास होतील. जे मला साह्य देतील त्यांना सौख्याचा वांटा आपोआप मिळेल. पण मी जर जिंकलें गेलें तर आपणां सर्वांसुद्धां मला सवतीची सेवाचाकरी करावी लागणार आहे, हें मात्र विसरूं नका म्हणजे झालें !" इतकें बजावून बजावून सांगून दणदण हातपाय आपटीत, दांत करकर चावीत डोळे गरगर फिरवीत कद्रू तिथून निघून गेली.

## मातृसेवा

किती वेळ तरी कद्रू गेली त्या दिशेकडे तिची मुलें पहात राहिलीं.

शेष खालीं मान घालून उगाच उभा होता. कद्रूच्या वर्तनाचा त्याच्या मनावर विलक्षण परिणाम झाला होता. झाल्या प्रकाराबद्दल त्याला अत्यंत वाईट वाटत होतें. झालें हें व्हावयाला नको होतें. यांत कोणाचें हित नाहीं, कल्याण नाहीं. अंतीं सर्वस्वनाश आहे, असें त्याला भाविकालचें भेसूर चित्र स्वच्छ दिसत होतें. आईला ही बुद्धि कुठून सुचली? त्या भरीला ती कां पडली? हे प्रश्न त्याला डिंवचूं लागलें होते!

प्रथम कद्रूनें जेव्हां मोठ्या हौसेनें, आनंदानें सर्व मुलांना बोलावून आणिलें, जेव्हां तिनें आपल्या मुलांना कुरवाळून, गोंजारून, एकेक गोष्ट सांगावयाला आरंभ केला होता, त्या वेळीं त्याचा शेवट असा होईल असें कोणालाच वाटलें नव्हतें. कद्रूला तर ती कल्पनाच नव्हती. रोजच्याप्रमाणें आई जेवाखायला हांका मारते आहे, लडीवाळपणानें बोलत बसावयाला बोलावते आहे, अशीच सगळ्यांची समजूत. म्हणून प्रत्येकजण नित्याप्रमाणें कोणी आईच्या अंकावर लोळूं लागला. कोणी तिच्या पाठीशीं बिलगूं लागला. कोणी हाताला धरून अगोदर खायला दे म्हणून हट्टानें उठवूं लागला. असें मायलेकरांच्या निर्मळ प्रेमाचें तें पहिलें दृश्य अत्यंत गोड नितांत सुंदर, अनुपम मधूर, असें होतें. त्याच दृश्याला शेवटीं अशी विद्रूपता प्राप्त झाली! क्षणाक्षणाला सृष्टि आपलें स्वरूप पालटतें त्या प्रमाणेंच हें झालें. तेथें असलेल्या एकाही व्यक्तीच्या मनांत या वेळीं आनंद, उत्साह किंवा सौख्य यांचा लवलेश उरला नव्हता. प्रत्येकाच्या मनांत निरनिराळ्या विचाराविकारांचें नुसतें काहूर माजून राहिलें होतें. मध्यें थोडा स्तिमिततेचा काळ गेला. आतां पुष्कळजण भानावर आले. आपण कोठें आहोंत, कशा परिस्थितींत आहोंत, क्षणापूर्वी झालें आहे काय, याची कांहीं थोड्यांना जाणीव आली. कर्कोटकानें आपलें मन सांवरलें. आतां त्याचें लक्ष भूमीकडे पहात स्तब्ध असलेल्या शेषाकडे गेलें. त्याच्या संतापानें फिरून उसळी घेतली आणि तो चवताळून शेषाकडे आरडत ओरडत गेला. त्यांचे भाऊही त्याच्याप्रमाणेंच किंचाळत शेषासभोंवार जमा झाले.

## प्रकरण तिसरें

पुन्हां गलबल्याला प्रारंभ झाला. सर्वानुमतें ठरलें कीं, आईला दुःख दिलें शेषानें. आईला रडायला लावलें शेषानें आणि आपणां सर्वांना आईचे शिव्याशाप घ्यावे लागले ते या शेषामुळेंच! मग त्यांना चेव आल्याखेरीज कसा राहणार? मग ते आपल्या बंधुत्वाचें नातें कसें शिल्लक ठेवणार?

"काय हें केलंस? तुझ्यामुळें हें सर्व झालें? बोल कां केलेंस?" खवळून जाऊन कर्कोटकानें शेषाला विचारलें.

शेषानें एकदां मान वर करून कर्कोटकाकडे पाहिलें. उत्तर मुळींच दिलें नाहीं.

"कां? उत्तर कां नाहीं? आतां बोलत कां नाहींस?" पुन्हां पहिल्या इतक्याच रागानें कर्कोटकानें प्रश्न केला.

"काय बोलूं?"

"काय बोलूं? आईला दुःखाच्या डागण्या कां दिल्यास? आईचे शिव्याशाप कां घेतलेस? आम्हांलाही घ्यावयाला लावलेंस?"

"तो सारा भवितव्यतेचा खेळ आहे!"

"म्हणजे तूं कांहींच केलं नाहींस वाटतं! अरे वाः रे वाः! आम्हीं तुला विचारी समजतों. विद्वान् समजतों. ज्ञानी मानतों. म्हणूनच अखेरपर्यंत स्तब्ध राहिलों."

"तें फार चांगलं केलंत!" शांतपणानें शेष म्हणाला.

"झालं हें चांगलं झालं असं तुझं म्हणणं! वाः!" शेषाच्या शांतपणानें कर्कोटक अधिक खवळला. "तूं आम्हांला एकच सांग, आईला तूं साह्य देणार कां नाहीं?" तरीही शेष कांहींच बोलला नाहीं.

"काय? आईला तूं श्रेष्ठ मानीत नाहींस?"

"हें सांगण्याची आवश्यकता काय?"

"आईच्या शिव्या तुझ्यामुळेंच आम्हांला मिळाल्या. त्या आम्हीं काय म्हणून घ्याव्यात?" कोणी एका भावानें मध्येंच, टांचा उंच करून, मान वर करून ओरडून विचारलें.

" आईच्या शिव्या मुलांना ओव्यासारख्या असतात. त्या कधीं त्यांना शापत नाहींत ! "

" तें तुझें ब्रह्मज्ञान नको आहे आतां आम्हांला ! " कर्कोटक लगट करीत कर्कश आवाजांत बोलूं लागला. " आईच्या शिव्याशापानें आम्हीं दग्ध होऊं अशी आम्हांला धास्ती वाटूं लागली आहे. तेव्हां ती सांगेल त्याप्रमाणें आम्हांला वागलेंच पाहिजे आणि तुलाही वागलेंच पाहिजे. बोल, काय करणार ? "

" कर्कोटका, आईच्या नुसत्या शिव्यांनीं खरोखरच कांहीं होणार नसलं तरी, ज्याकरितां वैतागून आईनें शिव्याशाप दिले आहेत, तें कृत्य आपण करावयाचा अवकाश, कीं त्याचा परिणाम मात्र आपण सर्व दग्ध होण्यांत होणार, यांत मुळींच शंका नाहीं !"

" तर काय आईसुद्धां सर्वांनीं परावलंबी–दास–व्हावयाचें ? "

" पण आज तरी तशी स्थिति नाहीं कुठें ? विनतामाता आणि गरुड–अरुण यांनीं आपल्या गुणांनीं, तेजानें, वागणुकीनें आम्हांला अंकित करून टाकलेलेच आहे. विनतामातेच्या वाणींत असं अमृत आहे, गरुडाच्या आणि अरुणाच्या सहवासांत अशी अनुपमेय माधुरी आहे, त्याचें वर्णन मीं कशाला करूं ? त्याचा अनुभव तुम्हांला नाहीं असं नाहीं. त्या त्यांच्या देवतुल्य गुणांनीं त्यांनीं आम्हांला जन्मतःच विकत घेतलेलं आहे. मग आम्हीं आणखी त्यांच्या अंकित तें काय निराळें व्हावयाचें ? "

" पण तेंच आपल्या आईला नको आहे. तेंच शल्य आईला बोंचत आहे. आहे या स्थितिची आईला खंती वाटते. आपल्याला लाज वाटा-यला पाहिजे. ज्यांनीं आम्हांला गुणांनीं अंकित करून ठेवलें आहे, त्यांना कसेंही करून, शक्तीनें, युक्तीनें आपलें अंकित करावयाचें, हा आईचा मनोदय. त्यांत वाईट काय आहे ? त्यांतच श्रेष्ठतेचं लक्षण सामावलं आहे. म्हणून आईचं म्हणणं बरोबर आहे. आणि ती म्हणते तसं झालंच पाहिजे. गुणांचा आणि तेजाचा टेंभा आमच्यापुढें कोणी मिरवायला नको आहे. अशा घमेंडखोरांचा नक्षा आई म्हणते त्याप्रमाणें करून उतरलाच पाहिजे. "

## प्रकरण तिसरें

कर्कोटक आणि त्याच्याबरोबर आणखी कित्येकजण एकच गलगा करून बोलत होते. त्यांच्यांत यावेळीं एक प्रकारची उन्मदावस्था आली होती. गरुड अरुण आपल्यापेक्षां श्रेष्ठ आहेत. मनोमन आपल्यालासुद्धां हें पटलें आहे. याची जाणीव त्यांना होती. पण अशांच्या तरी आपण अंकित कां असावें ? त्यांना आपण अंकित कां ठेऊं नये ? त्यांतच खरा पुरुषार्थ आहे, अशा कल्पनेचा उदय कद्रूच्या पुन्हां पुन्हां बोलण्यानें त्यांच्यांत झाला होता. तेव्हां शेषाचें बोलणें त्यांना पटावें कसें ? केवळ आईकरितांच नव्हे, तर स्वतःच्या भावी सौख्याकरितां आपण आईला साह्य दिलें पाहिजे, अशी हळूहळू इतर मंडळींची कल्पना निश्चित होऊं लागली होती.

कर्कोटकानें कांहीं एक मनाशीं निश्चय केला आणि तो बोलूं लागला:— " वडिल बंधु या नात्यानं आम्हीं आतांपर्यंत तुला मानीत आलों. तुझं ऐकत आलों. पण इतउत्तर आम्हीं तुला मानणार नाहीं. तुला विचारावयाचं कारण नाहीं. तूं सावत्र आईच्या आणि सावत्र भावांच्या अंकित राहावयाला तयार असशील, त्यांची सेवाचाकरी करण्यांत भूषण मानीत असशील. पण आम्हांला तसं मानण्याचं आणि करण्याचं मुळींच प्रयोजन नाहीं. तूं तुझें सौख्य पहा किंवा नको पाहूं. तूं त्यांना दास्य करावयाला लाव किंवा नको लावूं. तुझ्याशीं आम्हीं संबंध ठेऊं इच्छित नाहीं. अल्प श्रमानं मिळणाऱ्या सौख्याला आम्हीं लाथाडणार नाहीं. तो मूर्खपणा आम्हीं करणार नाहीं. आपल्यापेक्षांही श्रेष्ठ असतील त्यांना आपलं दास्य करावयाला लावायचं ही कल्पना महत्त्वाकांक्षेशिवाय सुचत नसते. आणि ज्याला अशी महत्त्वाकांक्षा नाहीं तो मनुष्य तरी कसला ? तूं आपला मार्ग पहा. आम्हीं आमचा मार्ग चोखाळतों. आईचा आनंद आणि स्वतःचं सौख्य या पलीकडे पाहाण्याची आम्हांला आवश्यकताच नाहीं ! नसत्या भीतीला आम्हीं आतां भीक घालणार नाहीं. किंवा काल्पनिक भावी चिरंतन सुखाच्या लालसेनं आज चालून येणाऱ्या सौख्याला दूरही आम्हीं झुगारून देणार नाहीं ! "

इतकें बोलून तो स्तब्ध राहिला. शेषाकडून कांहीं उत्तर मिळतें कीं काय हें पाहण्याकरितां त्याकडे तीव्र दृष्टिक्षेप केला. शेषाच्या मुद्रेवर कोणतांच विकार कर्कोटकाला दिसून आला नाहीं त्यामुळें तशाही स्थितींत कर्कोटकाला खर्जील झाल्यासारखें झालें. पण त्यानें तिकडे तितकें लक्ष पुरविलें नाहीं. त्याचें मन आतां निराळ्याच विचारांनीं भरून गेलें होतें. शेष बोलत नाहीं असें पाहून कर्कोटकानें आपल्या इतर बंधुवर्गाकडे दृष्टि वळविली. त्यांना उद्देशून तो म्हणाला, "बंधूनों, शेष आपल्यांत मिसळत नाहीं. त्याला मातृसेवा आणि स्वसुख नको आहे. त्याला इथेंच बसूं द्या. आपण आपल्या मातेची सेवा करूं आणि मिळणाऱ्या सुखाचा स्वीकार करूं चला! म्हणजे आपल्याला आईचे शिव्याशाप वाघण्याची मुळींच भीति राहणार नाहीं! शेषदादा, तुमचा आमचा ऋणानुबंध इथेंच सरता झाला असें समजूं या. त्याबरोबर हेंही लक्षांत ठेवा, उद्यां आईनं पण जिंकल्यावर आम्हीं सर्व ज्या ज्या श्रेष्ठ सुखाचा अनुभव घेऊं, त्यांत आयता भाऊबंदकीचा भाग घ्यावयाला येऊं नका म्हणजे झालं!" कर्कोटक इतकें बोलून विकट हंसला. इतरांतही तसाच हास्याचा ध्वनि उत्पन्न झाला.

शेष अधिकच खिन्न झाला.

"जाऊं ना आम्हीं?" निघून जातांना कर्कोटकानें मुद्दाम खवचटपणानें शेषाला विचारलें.

शेष पुटपुटला, "हें विचारण्याचं तरी कारण काय आतां?"

"चला रे चला. स्वतंत्र कोठें तरी बसून आईला उद्यां साह्य काय करावयाचं? कसं करायचं आईचा 'पण' सिद्धिला जाण्याकरितां कोणकोणत्या युक्त्या प्रयुक्त्या योजावयाच्या, याबद्दल शांतपणानं विचार करावयाला लागूं या!" कर्कोटकानें आपल्या इतर भावांना उद्देशून म्हटलें, आणि तो चालावयाला लागला.

तो चालावयाला लागला, तसा त्याच्या मागून एकेक जाऊं लागले. जातांना एकदां शेषाकडे पहावें, पुढें जाणाऱ्या कर्कोटकाकडे पहावें आणि चालूं लागावें असें प्रत्येकाचें चालूं होतें!

## प्रकरण चवथें

असें होतां होतां अल्पावकाशांतच एकामागून एक सर्वजण चालते झाले. एकटा शेष तेथें राहिला!

शेषानें पुन्हां एकदां मान वर करून पाहिलें. त्याला कोणीही तेथें दिसलें नाहीं. त्यानें 'भीषण भवितव्यता!' असें कांहींसें पुटपुटून कपाळाला हात लावला!

त्यावेळीं शेषाच्या मनांत काय विचार चालले असतील, हें कोणाला उलगडून सांगतां येईल काय? तो आपल्या आईविषयीं, कर्कोटकादि भावांविषयीं, विनतेविषयीं, गरूड–अरुणाविषयीं विचार करीत असेल कीं, त्याच्या विचाराची सृष्टि निराळीच असेल?–कोणाला हें सांगतां येणार?



*

# प्रकरण चवथें

-- दुर्दैव पाठीमागून लगट करून येत असतें पण तें आपल्या पावलांची चाहुल ज्याच्यावर त्याला झडप घालावयाची असते त्याला मुळींच लागूं देत नसतें असे म्हणतात त्या पैकीं तर प्रकार नव्हता ?

रात्र संपून पंचपंच उषःकाल प्राप्त झाला. अंधःकाराच्या साम्राज्यांत नष्ट झालेलें विश्ववैभव हळूं हळूं ठिकाणच्या ठिकाणीं दृग्गोचर होऊं लागलें. शीतल मंद वायु प्राणिमात्रास हलकेच मधुर स्पर्श करून जाग आणून 'उठा, जागे व्हा, प्रातःकर्मे उरका. उगवत्या ईश्वराला भक्ति· भावानें वंदन करा आणि जीवनकलहांतल्या आपल्यावरील भूमिकेचें यथा-तथ्य कार्य करावयाला लागा ' असें सुचविण्याकरितां चहूंकडे हिंडूं लागला. ऋषीमुनीजन नित्याच्या वेळींच उठून सरितेच्या पवित्र जलांत स्नान करून शुचिर्भूत होऊन संध्यादि कर्मांत केव्हांच गढून गेले होते. वेदमन्त्रादिकांचे ध्वनि कानावर पडून मनाला अत्युच्च सुखाच्या मार्गाची दिशा आपल्याला समजत आहे असें वाटत होतें. त्या दिव्य उच्चतम ध्वनीला नवजीवन प्राप्त झालेल्या द्विजकुलांचा मन्त्रोच्चाराइतकाच गूढ, आल्हादकारी किल-बिलाट सांथ देत होता !

पूर्वा हंसूं लागली. विश्व उजळूं लागलें. हंसूं लागलें. प्रकाशाचा एकेक किरण रात्रीं आकाशांत स्वैर संचारणाऱ्या तारकांची त्रेधा उडवून देऊं लागला. त्या बिचाऱ्या लाजून, भिऊन आकाशाच्या निळ्या पडद्याआड पटपट दडूं लागल्या. प्रतिक्षणीं रजनीराज्ञीचें साम्राज्य सरलें. सूर्यप्रभेनें तिचें साम्राज्य हिरावून घेतलें. तिला 'पणा'त जिंकलें आणि आपली सेवाचाकरी करावयाला आपल्या अंतर्गृहांत तिची रवानगी करून दिली, असें भासूं लागलें.

रजनीराज्ञी आणि सूर्यप्रभा यांनीं कसला पण लावला होता काय ? विश्वांत नवचैतन्य संचरलें. भगवान् सहस्ररश्मी उदयाचलीं आले. विश्वानें विनम्रभावानें त्याचें सुस्वागत केलें. ऋषीमुनींनीं भक्तिनें त्याला अर्घ्यें दिलीं.

## प्रकरण चवथें

कुलस्त्रियांनींही सडासंमार्जन करून, पवित्र जलाचे कलश भरून आणून स्नानें आटोपून गृहकार्याला लागण्यापूर्वी तुळशीला, देवदेवतांना, उगवत्या नारायणाला नमस्कार केले.

ह्याच नित्यक्रम भगवान् कश्यपमहामुनींच्या आश्रमांत आजही चालू होता. योग्य वेळीं विनता जागृत झाली. कद्रूही अंथरुणांतून बाहेर आली होती. आश्रमाच्या आंतबाहेरची झाडलोट, सडासंमार्जन, गाईचें दूध काढणें, इत्यादि गोष्टी, ठरलेल्या मंडळींनीं बिनचूक करायला सुरुवात केली.

कद्रूचें मन आज विशेष उत्तेजित होतें. तिला रात्रीं धड निद्रा तरी लागली होती कीं नाहीं कोण जाणे! ती आज हातचीं कामें इतक्या भर-भर, इतकीं व्यवस्थीत करीत होती कीं, त्याबद्दल तिचें तिलाच मधून मधून आश्चर्य वाटत होतें. आजचा सूर्यनारायण तिला नवा वाटला. तुळशीमातेला व सूर्यनारायणाला नमस्कार करतांना, तिची क्षणमात्र दृष्टि स्थिर झाली. सूर्यकिरणांनीं अमोल रंगाच्या स्नानानें तिला नटविलें आहे असें तिला वाटलें. सूर्यनारायणानें आज तुझ्या आयुष्यांतला क्रांतीचा दिवस आहे, असें हंसत सांगितल्याचा कद्रूला स्पष्ट भास झाला. कद्रूचें सर्वांग रोमांचित झालें! तिनें पुन्हां नमस्कार केला. कद्रूला प्रत्येक वस्तु-जात निरानिराळ्या स्वरूपांत—निराळ्या मनोधर्माची दिसूं लागली होती.

आपलीं सर्व गृहकृत्यें आटोपतात केव्हां आणि विनतेसह आपण समुद्रकाठीं उच्चैश्रव्याला पहावयास जातो केव्हां असें कद्रूला होऊन गेलें होतें. त्यांत उगवत्या नारायणानें हंसून तिला तिच्या वैभवाची ग्वाही दिलेली. मग तिच्या उसळत्या उल्हासाच्या उर्मीला पारावार कुठून राहा-णार? तिला भरंवशानें वाटत होतें, आज आपला राजयोग आहे. तिचें पाहणें, तिचें बोलणें, तिचें चालणें त्या कल्पनेला अनुसरून होत होतें. ती आपल्याशींच अर्धस्फुट हंसे. पुन्हां गंभीर होई. आपलें खरें अंतरंग पट-कन् कोणाला ओळखूं नये, मोठ्यांचें अंतरंग असे झटकन् कोणाला कळतां उपयोगाचे नसतें. हृदयांत कितीही कठोरता असली, एकाद्याला नम-विण्याची, त्याचे हालहाल करण्याची, त्याला रसातळाला पोंचविण्याची

कितीही अनावर इच्छा झालेली असली, तर बाहेर त्याचा मागमूसही कोणाला लागतां कामा नये. बाहेरचा देखावा सदा अकृत्रिम. सारखें हंसतमुख, वाणीच्या ठिकाणीं अमृत–मधुरता, वर्तनांत नितांत शालीनता, दाखवितां आली पाहिजे. दुसऱ्यावर जे सत्ता चालवितात, त्यांच्याकडून उत्तमोत्तम म्हणून आपलें करावयाचें तें करतात, त्यांचें हें असेंच असतें. असे कद्रूच्या कल्पनादासी आतांपासूनच तिला पटवूं लागल्या. त्या बरोबर तिला आपली दिनचर्या चालवितांना जड जावूं लागलें. संवयींत कधींच नसलेल्या गोष्टी संवयींत आहेत असें दाखवावयाचें म्हणजे तें अत्यंत कठीण असतें. आपली कुठें केव्हां फजीती होतें कीं काय, इच्छा नसतांना आपलें वर्तन वागण्याच्या नवखेपणामुळें कुठें चुकून आपलें खरें अंतरंग अकालींच इतरांना कळून चुकतें कीं काय, अशी एकसारखी कद्रूला भीति वाटत होती. आणि म्हणून ती अतिशय जपून, विचार पूर्वक प्रत्येक हालचाल करीत होती. तिनें आज ज्या वैभवाची आकांक्षा धरिली होती, आणि कां कोण जाणें तिला तें आज प्राप्त होणार हें भरंवशानें वाटत होतें, त्याकरितां तिनें ईश्वराराधना कितपत केली होती, ईश्वराच्या वरदहस्तावर ती कितपत भरवसून होती, हें कांहीं सांगतां येण्यासारखें नव्हतें. परंतु दैवाला तिनें चांगलेंच वेठीला धरलें होतें. त्यामुळें जिथें तिथें, ज्या त्या ठिकाणीं, ज्याच्या त्याच्याकडून तिला ऐकावयाला मिळत होतें, "तुझा विजय होणार. तूं सवतीशीं लावलेला 'पण' जिंकणार! सरळ मार्गानें जिंकशील, वांकड्या मार्गानें जिंकशील, विश्वासानें किंवा कपटानें जिंकशील, पण जिंकशील." असा दैवानें तिला हात दिल्यावर काय हो!

कद्रू झपझप कामें उरकण्यांत गढली होती. इतक्यांत कर्कोटकादि तिच्या कांहीं मुलांनीं भीतभीत तिच्याजवळ येऊन तिला साष्टांग प्रणिपात केला. आई आपल्याला काय बोलते! आपला प्रणिपात तरी स्वीकारते कीं नाहीं, कीं तशीच लाथेनें झुगारून देते, याविषयीं त्यांच्या पोटांत भीति होती. कद्रूच्या मनांत कालच्या कोणत्याही गोष्टी आतां–या वेळीं

मुलींच शिल्लक राहिल्या नव्हत्या. आपल्यापुढें साष्टांग प्रणिपात करणाऱ्या आपल्या मुलांकडे तिची दृष्टि गेली. तिच्या मुखावर वत्सलतेचें हास्य चमकलें. प्रेमळ स्वरांत त्यांना उठा म्हणून सांगितलें. आईचा स्वर कालच्या रागाचा नाहीं, असें कळतांच कर्कोटक प्रभृतींना अतिशय आनंद झाला. त्यांची भीति कोठच्या कोठें पळाली. ते ताडकन् उठून समोर उभे राहिले. त्यांनीं कद्रूपुढें हात जोडले आणि उत्तेजक स्वरानें म्हणाले—

" आईची आज्ञा ऐकावयाला आम्हीं आलों आहोंत ? "

कद्रूनें त्यांना त्यांचा प्रश्न ऐकून एकवार आपादमस्तक न्याहाळलें.

" आईनें आम्हांला कोणतीही आज्ञा करावी, तिचें प्रतिपालन करण्यास आम्हीं कधींही मागें घेणार नाहीं ! " पुन्हां कर्कोटक बोलला.

" शेष कुठें आहे ?" डोळे किंचित् आकुंचित करून, कपाळाला आंठया घालून, भिंवया चढवून किंचित् तिरस्कारानें तिनें विचारलें.

" त्याला एकट्यालाच आम्हीं सोडून दिलं. एकटाच कुठें तरी भटकतो आहे. " तिच्या प्रश्नाला उत्तर मिळालें.

" गरुडाची किंवा अरुणाची आणि तुम्हांपैकीं कोणाची गांठ पडली होती काय ? "

कद्रूनें दुसरा प्रश्न टाकला. प्रश्न अत्यंत धूर्तपणानें विचारला होता. त्या प्रश्नांतली खोंच कर्कोटकाच्या ध्यानांत यावयाला उशीर लागला नाहीं. त्यानें नकारार्थी मान हलवीत चटकन् सांगितलें. " छेः छेः कालपासून आम्हीं त्याला किंवा तो आम्हांला भेटलोंच नाहीं. त्यानें आम्हांला एक दोन वेळां शोधल्याचें कळलें पण आम्हीं त्याच्या दृष्टीस पडण्याचेंच टाळलें. रात्रीं रात्रभर आम्हीं सर्वजण विचारच करीत बसलों होतों. अशा महत्त्वाच्या वेळेला त्याला कशाला आणखी भेटा म्हटलें. त्यानें गांठलें कीं संपलेंच. बोलतां यायचें नाहीं, विचारविनिमय करतां यायचा नाहीं कीं कांहीं नाहीं. म्हणून विचार केला आणि त्या दोघांना अजीबात टाळलें. "

" तें योग्य झालं ! " कद्रू संतोष व्यक्त करीत अर्धवट पुटपुटली.

" बरं, आई, काय आज्ञा करणार ती करतेस ना ? म्हणजे त्याप्रमाणें

आम्हांला वागायला बरें. आम्हीं रात्रभर विचार केला, तरी आम्हांला कांहींच युक्ति सुचली नाहीं. नाहीं तर आमची मनीषा होती कीं आपणच आपल्या शहाणपणानं कार्यसिद्धी करावयाची आणि आईचे धन्यवाद घ्यावयाचे. पण तें जुळेनाच!"

"तें शेषानें खात्रीनें केलें असतें!" कद्रू मनाशींच म्हणाली. नंतर कर्कोटकाला उद्देशून ती म्हणाली, "बरं, गरुडाची आणि शेषाची तरी भेट झाली काय?"

"तें कांहीं कळलें नाहीं. पण तसा संभव नव्हता. आणि समजा त्या दोघांची भेट झाली असली तरी काय होणार आहे? शेष त्याला कांहीं एक सांगणार नाहीं. त्याला तें सांगतांच येणार नाहीं. शिवाय सांगण्याचें प्रयोजन तरी काय? त्यांतून सांगितलें असलें तरी गरुड आपलें काय करणार? तो आपल्या आईला परावृत करूं शकत नाहीं. आई त्याचें ऐकणार नाहीं. जें काय व्हायचं तें होतंच आहे." कर्कोटक म्हणाला.

"खरं आहे तुझं म्हणणं. तूं म्हणतोस तसंच असेल. कांहीं झालें, तरी आमचं आतां कांहीं वांकडं कुणाच्या हातून व्हायचं नाहीं. तुम्हीं कोणी शेषाच्या वेड्या नादीं लागला नाहींत, हें फार चांगलं झालं. माझी पण तीच कल्पना होती. म्हणून मी निश्चिंत होतें. मीं करतें आहें, हें कांहीं माझ्या एकटीकरितांच कांहीं करीत नाहीं. त्यांत तुमच्या वैभवाचा भाग आहेच आहे. पण असं वैभव मिळवितांना खरं खोटं पहायचं नसतें. न्यायनीति जाणायची नसते. पापपुण्याचा हिशेब ठेवावयाचा नसतो. आपण सुखी होतांना जगांत दुसऱ्यांना दुःख होईल तेव्हां काय करावं, याचा आपण विचार करावयाचा नसतो; असा विचार करणारांना इच्छित सौख्याचा लाभ कधींच प्राप्त होत नसतो, हें अगोदर ध्यानांत ठेवा आणि मग माझी आज्ञा ऐकावयाला तयार आहांत, असं सांगा!"

कद्रूनें हें कांहीं हंसत, कांहीं गंभीर, कांहीं विनोदी अशा स्वरांत मुद्दाम म्हटलें. मुलें आपल्याकडे आली खरी, पण त्यांची तयारी तरी कितपत खंबीरीची आहे, हें पहाणें कद्रूला आवश्यक वाटलें. "खऱ्याचं

खोटं, खोट्याचं खरं करायचं असलं, उघड्या डोळ्यांनीं पापाचरण आचरावयाचं असलं तर त्याला तुमची तयारी आहे काय?"

"होय! आहे. स्वार्थाच्या सुखाची एकदां चटक लागली म्हणजे पापपुण्य पाहण्याची प्राण्याला गरजच राहात नाहीं. त्यांत आईची आज्ञा. त्यांतल्यात्यांत आणखी आमच्या स्वतःच्या सुखाची लालसा. तेव्हां आमच्यापुढं तो प्रश्नच उपस्थित होत नाहीं. तसा प्रश्न शेषासमोर आला, तो बाजूला निसटला. आम्हांला ऐहिक ऐश्वर्य मनसोक्त उपभोगायचं आहे. तेव्हां अशा स्थितींत आम्हांला शेषाचे विचार कसे मान्य होणार? त्याला तसाच सोडून देऊन आम्हीं सर्व एक झालों. विचार केला. तुला येऊन मिळालों. आतां आई जें सांगेल तें कर्तव्य, आई उपदेशील तो धर्म, आई म्हणेल ती आमची न्यायनीति! सत्याचं असत्य वा असत्याचं सत्य करावयाला सांगितलंस तरी तें करण्यांत आम्हीं अनमान मुळींच करणार नाहीं." कर्कोटक बोलत असतां त्याला अनुकूल असे त्याचे इतर बंधूही मान डोलवीत होते. सर्वांची संमति कर्कोटकाच्या भाषणाला होती. कद्रूला तें पाहून 'हायसें' झालें. आतां तिला दुप्पट उत्साह आला. तिनें आपल्या मुलांना जवळ घेऊन प्रेमानें कुरवाळलें. "नाहीं तरी मी पुढें 'पण' जिंकण्याकरितां काय करावं, याविषयीं चिंतेंतच होतें. काय करावं याविषयीं माझा कोणताच निश्चय कायम झाला नव्हता आणि कसं करावं हेंही सुचत नव्हतं. आतां तुम्हीं माझ्या साह्याला धावलांत. मी आतां हवं तें करीन." कद्रू विचार करीत बोलूं लागली. "आमच्यामध्यें 'पण' काय लागला आहे, हें तुम्हांला मी सांगितलेंच आहे. वस्तुस्थिति काय आहे हेंही तुम्हांला माहित आहे. तेव्हां आतां असं करावयाला पाहिजे...." कद्रू हलकें हलकें बोलूं लागली. बोलतांना चोहोंकडे पहात–दबकत थाबतएकेक शब्द सावकाश उच्चारूं लागली. आपलें गुप्त भाषण कोणी चोरून ऐकत तर नाहीं ना? आपलं रहस्य अगोदरच षट्कर्णी होऊन तें ऐनवेळीं निष्फळ व्हावयाचें आणि 'पण' स्वतःवरच यावयाचा असें नाहीं ना व्हावयाचें, अशी शंका तिला प्रत्येक शब्दोच्चाराच्या वेळीं सतावीत होती.

तिनें हळूंहळूं बोलतां बोलतां कांहीं कांहीं शब्द कर्कोटकाच्या कानांतच सांगितले. त्या वेळचं अस्पष्ट पुटपुटणेंही ऐकावयाला येणं दुरापास्त झालें.

कद्रूनें काय सांगावयाचें तें सांगितलें. मान्य असल्याचें त्यानें मानेनेंच सुचविलें. त्या सर्वांनीं फिरून आईला साष्टांग नमन केलें आणि आईच्या आज्ञेचें प्रत्येक अक्षर पाळण्याकरितां तिचा निरोप घेऊन ते तेथून चालते झाले. त्यांना त्वरा कराल तितकी थोडीच म्हणून कद्रूनें सांगितलें. रहस्याचा स्फोट चुकूनही होऊं देऊं नका. तसें झाल्यास माझ्याइतकी कोणी वाईट नाहीं, असें खडखडीत तिनें बजावण्यास कमी केलें नाहीं.

कर्कोटक आपल्या बंधूसहवर्तमान निघून गेल्यावर कद्रू आपलीं कामें उरकण्याच्या धांदलीला लागली. कामधाम संपवून आपण होऊनच विनतेकडे बोलवावयाला जावयाचें असें तिनें मनाशीं ठरविलें.

कद्रूची इकडे ही कडेकोट तयारी चालली असतांना विनतेकडे काय हवाल होती ?

रात्रीं निद्रेच्या स्वाधीन होईपर्यंत विनतेच्या मनांत कद्रूशीं झालेल्या संभाषणाबद्दल थोडी थोडी चुटपुट होती. तिनें शांत मनानें आणि प्रसन्न चित्तानें आपल्या मुलांना खाऊंजेऊं घातलें. बाहेरून येतांच त्यांची दृष्ट काढून दृष्टीचा अंगारा त्यांना लावला. त्यांचे बाहेरचे बालपराक्रम आनंदानें ऐकले. बोलतां बोलतां चार उपदेशाच्या गोष्टी अमृताहून गोड वाणीनें सांगितल्या. त्यांचीं अंथरुणें घालून देऊन त्यांना निद्रा येईपर्यंत गोड सुरांत ईश्वरभक्तीचीं सुंदर गाणीं गाईलीं. मुलांना सुखाची निद्रा लागल्यानंतर पतिचरण–स्मरण ईश्वराराधना यांत मनाला तल्लीन केलें. समजून न समजून, कळून न कळून झालेल्या अपराधाबद्दल ईश्वराजवळ निर्मलमनानें विनतेनें क्षमायाचना केली आणि शांतचित्त करून ती निद्रेच्या स्वाधीन झाली.

निद्रेमध्यें तिला स्वप्नें पडलीं काय ? स्वप्नांत तिला आपली भावी भेसुरता भेडसावीत होती कीं काय ? कद्रूची क्रूरता पाठीस हात धुवून लागली

होती कीं काय ? कीं नित्याप्रमाणें विनतेला सुखनिद्राच मिळत होती हें सांगतां येणें कठीण होतें. संवयीप्रमाणें उष:कालीं जेव्हां तिनें आपलें अंथरूण सोडलें, त्यावेळीं काल काय काय झालें होतें हें ती जवळ जवळ अगदीं विसरूनच गेली होती असें तिच्याकडे पाहाणारास वाटलें असतें. ती उठली. तिनें मुलांना उठविलें. प्रातर्विधी सारून ईश्वराधनेला त्यांना लावलें. तींही लागली. तिनें स्नान केलें. देवाला, तुळशीला, भगवान् सूर्यनारायणाला नमस्कार करावयाला तीही आली.

तिची दिनचर्या चालू असतां ती एकाद्या दिव्य देवतेप्रमाणें शोभत होती. तिच्याकडे पाहातांच नम्रतेनें मान आपोआप खालीं होत होती. दिव्यतेज तिच्या मुखावर सांडत होतें. मूर्तिमंत संतुष्टता तिच्या ठायीं वास करीत असल्याचें प्रतीत होत होतें ! धन्य सती ! धन्य माता ! म्हणून उलट देवदेवतांनीं तिचे गुणानुवाद गावेत अशी तिची योग्यता ! ती देवदर्शनाला गेली, ती तुळशीला वंदन करूं लागली, ती सूर्याला नमस्कार करूं लागली, तर त्यावेळीं त्रयस्थ दृष्टीला तीं दृश्यें कांहीं निराळींच दिसत. देवदेवता उलट विनतेला नमन करीत आहेत, तुळशीमाता विनतेला वंदन करावयाला अधीर झालेली दिसत आहे; ज्या सतीच्या उदरीं गरुडासारखा तेज:पुंज, ईश्वरांश असलेला आणि अरुणासारखा आपलें सारथ्य करण्यांत प्रविण असलेला, अशीं विश्वमोलाचीं रत्नें निर्माण झालीं आहेत, त्या सतीला भगवान् सूर्यनारायणच आदरातिथ्यानें हात जोडून अभिवादन करीत आहे, अशीं दृश्यें विनतेची योग्यता माहिती असणाऱ्या दृष्टीला दिसत असत !

पण विनता आज सूर्यनारायणाला नमस्कार करावयाला आली असतां, तिच्या प्रशांत चित्ताची चलबिचल झाली ! श्रीसविता विनतेचा नमस्कार घ्यावयाला उत्सुक नव्हता काय ? तिला अभिवादन करण्याची त्याची आज तयारी नव्हती काय ? विनतेला काय दिसलें ?

सूर्यनारायणाच्या आड एक कृष्णमेघखंड आलेला होता. त्यानें त्याचे दोन भाग केलेले दृष्टीला पडत होते. त्याची त्या कृष्णमेघानें जणुं काय

मुस्कटदाबीच केली होती. सूर्यनारायणाच्या मनांतून सतीला अभिवादन करून कांहीं तरी सांगायचें होतें, सुचवावयाचें होतें, असें दिसलें. पण त्याची मुस्कटदाबी झालेली. त्याचे सतीला अभिवादन करणारे किरणही कांहीं मेघखंडांनीं लपविलेले. त्याला तो काय करणार ? तें दृश्य दृष्टीला पडलें; विनतामातेच्या हृदयांत चर्र झालें ! ' हें काय ? अशी दुर्दिनाला सुरुवात कां बरें ? श्रीसविता असा अगतिक झालेला कां ? असा केवील-वाणा कां ? ' असे प्रश्न तिच्या मनांत उभे राहिले. ती विषण्ण झाली. कालचा दिवस पुन्हां तिला आठवला. कद्रूच्या भाषणाचें स्मरण झालें. कद्रू समोर दिसूं लागली. तिचें चित्त अत्यंत व्याकूळ झालें.

सृष्टि प्रतिक्षणीं नवें रूप घेत असते. नवे खेळ खेळत असते.

कद्रू नमस्कार करावयाला आली त्यावेळीं एकही मेघ सूर्याजवळ नव्हता! विनता नमस्कार करावयाला आली त्यावेळीं तिला सूर्याचा चमत्कार तसा दिसला !

विनता व्याकुळ झाली खरी, पण करणार काय ? खिन्नमनानें ती नित्यो-गाला लागली. कार्यांत निमग्न असतां होतां होईतों ती मनाची व्यग्रता दूर करण्याचा एकसारखा प्रयत्न मात्र करीत होती !

दोघींचीं गृहकृत्यें आटोपलीं. गरुडाचें आणि अरुणाचें जेवणखाण आटोपलें. आईची आज्ञा घेऊन ते बाहेर पडले.

थोडया वेळानें नटली थटलेली कद्रू घाईघाईनें विनतेकडे आली. येतांच म्हणाली " चल, चल माई--आपल्याला जायचं नाहीं का ? "

" कुठें ? " वर मान करून विनतेनें उलट विचारलें. ती ईश्वरचिंत-नांत निमग्न होती. क्षणभर कद्रू कुठें चल म्हणते याचा तिला उमजच पडला नाहीं.

" वाः ! विसरलीस वाटतं ? आपण उच्चैश्रवा पहायला जाणार आहोंत ना आज ? "

" होय ! "

" मग चलूं यां ना ? "

## प्रकरण चवथें

" पण नाहीं गेलं तर ? "

" कां ? भ्यालीस वाटतं ! "

" भ्यायचं कशाला ? "

" 'पणा'ला ! "

" पण हातचं कंकण कसं आहे, हें पहायला आरशाचा 'पण' पाहिजेच कशाला ? "

" तेंच पाहू या ना पण प्रत्यक्ष जाऊन ! "

" जशी तुझी इच्छा ! "

" बहिणीचं दास्य करावं लागेल याबद्दल वाईट वाटतं कीं काय ? "

विनतेनें नुसतेंच कद्रूकडे पाहिलें.

" मी माझ्या बहिणीची दासी झालें तर मला नाहीं बाई वाईट वाटायचं. मी अगदीं आनंदानं सेवाचाकरी करीन ! हो ' पण ' जर एकदां लावला, तर त्याबद्दल कुरबुर कशाला करायची ? " कद्रूच पुन्हां बोलली. हें बोलत असतां कद्रू विनतेकडे एकसारखें टक लावून पहात होती. अंतर्भेदी दृष्टीनें ती कांहीं तरी शोधण्याचा प्रयत्न करीत होती. प्राणी आपल्यावरून जगाची पारख करीत असतो. तसेंच कद्रूचें वर्तन होतें. विनतेनें आपल्यासारखाच कांहीं डाव केला आहे काय ? तिनेंही आपल्या मुलांना कांहीं आपल्यासारखेंच सांगितलें आहे काय ? याचें ती शोधन करीत होती. पण विनतेच्या मुखावरून कांहींच ठाव लागला नाहीं. आरंभीं जरी तिनें आढेवेढे घेतले तरी ती कद्रूबरोबर जायला निघाली. कद्रू खूप नटली थटली होती तशी ती नटण्याथटण्याच्या भरीस पडली नाहीं. जशी होती तशीच ती तिच्याबरोबर निघाली.

दोघी निघाल्या. त्यांच्याबरोबर दुसरें कोणीही नव्हतें. दोघी नशीबाची परीक्षाच पहावयाला चालल्या होत्या. पाऊल पुढें पडत होतें, तसें कद्रूला मनांत वाटत होतें पावलापावलानें आपण ' पण ' जिंकीत आहोंत.

विनतेच्या मनांत काय चाललें होतें कोण जाणे !

कद्रूच्या पाठीमागून पावलांचा आवाज ऐकावयाला येत होता. तिची

मुलें, तिची सद्दी, तिचें नशीब तिच्या साह्याला येत होतें कीं काय? कद्रूचा विश्वास तर तसाच होता!

विनतेच्या पाठीमागून कोणीही येत नव्हतें. तिला पाठीमागून कोणाचाही आवाज ऐकावयाला येत नव्हता!

दुर्दैव पाठीमागून लगट करीत येत असतें. पण तें आपल्या पावलांची चाहूल ज्यांच्यावर त्याला झडप घालावयाची असते त्याला लागूं देत नसतें, असें म्हणतात, त्यापैकीं तर हा प्रकार नव्हता?

दोघीही मागें मुळींच पहात नव्हत्या. त्या बाह्यत: बोलत—हंसत—विनोद करीत चालल्या होत्या.

रत्नाकराच्या हेलावणाऱ्या विराट लाटांचें तांडव दोघींच्याही कर्णपथावर हलकें हलकें येऊं लागलें. तशीं दोघींचींही हृदयें धडधडूं लागलीं.

रत्नाकर आपल्या पूर्णैश्वर्यानें नटला होता! अमृतादि चौदा अमोल रत्नें त्यानें आपल्या जवळचीं विश्वावर उधळून विश्वाला भूषविल्यापासून रत्नाकराच्या आनंदाला पारावार राहिला नव्हता! अष्टौप्रहर त्याचें हंसणें खिदळणें आणि नर्तन चालूं होतें. त्यानें दिलेल्या रत्नांची पूर्ण खैरात अजून व्हावयाची होती. कांहीं ज्याचीं त्यांनीं नेलीं होतीं. ऐरावत, उच्चैश्रवा, सुरा, शारंग वगैरे वगैरे अजून जागच्या जागेलाच होतीं. रत्नाकरानें तीं रत्नें अशा सुन्दर, व्यवस्थित आणि सुरक्षित ठिकाणीं ठेविलीं होतीं, तीं पहाणाराला दुरून पाहतां यावींत, पण कोणी लुबाडण्याच्या, अफरातफर करण्याच्या इच्छेनें तेथें घिरट्या घालूं म्हणेल तर त्याच्या हातीं तीं चट्‌दिशीं येतील अशा सुगम ठिकाणीं तीं नव्हतीं. कांठावर कुणालाही तीं दिसावींत, अशा ठिकाणीं मात्र तीं रत्नें ठेवण्यांत आलीं होतीं. रत्नाकरानें आपल्या रत्नांचें सुशोभित असें प्रदर्शनच जणुं काय थाटलें होतें! मध्यें रत्नें मांडून रत्नाकर त्यांच्या सभोंवतीं नृत्य करीत राहिला होता! तो देखावाच दिव्य होता. रत्नांची प्रभा रत्नाकराच्या उसळणाऱ्या लाटांवर फांकली होती. तर त्याच किरणांचें परिवर्तन रत्नांवर होऊन रत्नांना आगळी शोभा आणीत होतें!

# प्रकरण चवथें

पहावयाला येणारा प्रत्येक जण तेथें देहभान, मनोव्यापार विसरून गेल्याखेरीज कसा राहाणार ? पहाणाराला प्रहर क्षणासारखा, दिवस प्रहरासारखा, मास दिवसाप्रमाणें, तर वर्ष महिन्याप्रमाणें आणि युग वर्षाप्रमाणें वाटल्यास त्यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहींच नव्हतें. प्रत्येक रत्नाची कांतीच तशी होती ! ही स्थिती अजून शिल्लक असलेल्या रत्नांबद्दलची होती. लक्ष्मीला नीटशी कोणीं न्याहाळली नव्हती, तर अमृताचा देवांनीं कोणाला पत्ताहि लागूं दिला नव्हता ! तीं तीं रत्नें अजून जागच्या जागींच असतीं, तर त्याकडे पाहतांना प्रेक्षकांचें काय झालें असतें याची कल्पना करणेंही कठीण आहे !

रत्नाकरानें मांडलेलें रत्नांचें प्रदर्शन पाहाण्यास एकसारखे लोक येतच होते. येत, पहात–किती तरी वेळ पहात–आणि इतकें करून अतृप्त मनानेंच परतत !

तें प्रदर्शन पाहण्यासाठीं, विशेषतः उच्चैश्रव्याला पहाण्यासाठीं विनता व कद्रू आल्या त्या वेळीं भगवान् सहस्ररश्मी पूर्णतेजानें तळपत होता. त्याच्या प्रकाशांत सागराचीं आणि रत्नांच्या प्रदर्शनांची शोभा अनुपमेय दिसत होती ! सूर्याची इच्छा उच्चैश्रव्याचा रंग स्वच्छ दिसावा, तो दाखविण्यांत आपल्याकडून चुकूनही कसूर होऊं नये म्हणून त्यानें त्या वेळीं एकही मेघखंड सन्निध येऊं दिला नव्हता ! प्रकाशाचा नुसता झगझगाट करून टाकला होता !

उच्चैश्रव्याला दोघींनींही एकदमच अगदीं हातांत हात घालून पाहिलें. विनतेची दृष्टि मध्यान्हींच्या प्रखर उन्हानें दिपली कीं काय कोण जाणें. तिच्या डोळ्यांना अंधेरी आली. सूर्यनारायण तिच्यावर उपकार करावयाला गेला, पण तिला तो अपकारच झाला. 'आपण उगाच पणाच्या भरीस पडलों' या अंतरीच्या टोंचणीनें त्याच वेळीं उग्ररूप धारण केलें, त्यामुळें तिची दृष्टि चळली !

तिला स्पष्ट कीं अस्पष्ट कोण जाणे उच्चैश्रवा आपादमस्तक धवलवर्णाचा न दिसतां त्याची शेपटी किंचित् काळसर दिसली. कद्रूलाही तेंच

स्पष्ट दिसलें. तिनें उच्चैश्रव्याकडे तीक्ष्ण दृष्टि रोखली होती. उच्चैश्रव्याच्या शेपटीच्या भागाकडे आपलीं मुलें उच्चैश्रव्याला जवळून पाहाण्याच्या मिषानें जमावानें उभीं राहिलीं आहेत, असें दिसलें. त्यांना बाजूला सारल्यावर उच्चैश्रवा दुधानें न्हाल्याप्रमाणें रोमरोमांत धुवट आहे हें तिला पटलें. पण तें सत्य तिला उघडें करावयाचें होते थोडेंच? उच्चैश्रव्याची शेपटी काळसर दिसतांच, विनतेचा हात आपल्या हातांत होता तो तिनें जोरानें दाबला आणि मोठ्यानें विचारलें "पहा! पहा! माई, पहा, उच्चैश्रव्याची शेपटी काळी आहे. तो केवळ धवल नाहीं!"

"होय!" विनतेनें खोल आवाजांत उत्तर दिलें!

"मी 'पण' जिंकला! तूं माझी दासी झालीस!" कद्रू आनंदातिरेकानें ओरडली!

"होय!" विनतेकडून उत्तर मिळालें!

कद्रू तेथून झटकन् परत फिरली.

विनता कद्रूची दासी झाली. सज्जन शब्दाला कधीं बाध आणित नसतात! विनतेनें कपाळाला हात लावला! आपले सारे ग्रह उलटले आहेत, आजचा दुर्दीन खरा! दुसऱ्याकडे काय बोल? असे विचार तिच्या मनांत येत होते कीं काय कोण जाणे!

विनता जागच्याजागींच खिळली होती.

कद्रू विनतेचा हात सोडून केव्हांच परतली होती. रत्नाकराच्या पर्वतप्राय प्रचंड लाटा खडकावर आदळून भीषण कल्लोळ करीत होत्या.

विनतेच्या मनःसाम्राज्यांत तिच्या भीषण भवितव्यतेनें असाच कल्लोळ माजवून दिला होता! बधिर झालेल्या सतीच्या मतीला "माझें पुढें काय?" असें भवितव्यतेला विचारण्याचें भान कुठें होतें?



*

# प्रकरण पांचवें

-स्वतःकडे शहाणपणा घेऊन शहाण्यालाच मूर्खांच्या कोटींत कसें घाला-
वयाचें हें कद्रूला करतलामलवत् होतें !-

महत्वाकांक्षी कद्रूचें सत्तायुग चालू होऊन कांहीं काळ लोटला होता तरीही अद्यापपावेतों कद्रूच्या किंवा तिच्या मुलांच्या बाह्याचरणांत पूर्वीपेक्षां निराळा फरक दिसूं लागला नव्हता. 'तूं माझी दासी झाली आहेस, तुला आतां आपली पायरी ओळखूनच वागावयाला पाहिजे' अशा तऱ्हेचे शब्दांनीं, वागणुकीनें किंवा पर्यायानेंही कद्रूनें जाणविलेंही नव्हतें. तिचाच कित्ता तिच्या मुलांनींही आपल्या दिनचर्येंत उचलला होता.

आश्रमांतील नित्य नैमित्तिकें जशीं चालावयाचीं तशींच चाललेलीं होतीं. कार्याचा आटोप व्हावा म्हणून वेगवेगळीं कार्यें ज्याला त्याला विभागून दिलेलीं होतीं तीं अद्यापही तशीच चालू होतीं. हें असें आतां कां चालावें ? असा प्रश्न कद्रूच्या मुलांच्या डोक्यांत अनेकवार उसळी मारून येई. ते आपल्या आईला अधीरतेनें विचारीतही. त्याचें समाधानकारक उत्तर ती कित्येक वेळां देई किंवा देतही नसे. नुसतेंच हंसे. त्या तिच्या हंसण्याचा अर्थ तिच्या मुलांना कळणें कठीण जाई ! पण क्षेत्र आपल्या ताब्यांत आलें तरी त्याचा उपभोग घ्यावयाला कांहीं काळ घालवावा लागतो; कांहीं काळ तसाच जातो. तरच त्यांत मनासारखें धान्य पिकविण्याची खात्री असते. किंवा एखाद्या उंदराला पकडल्यानंतर त्याला चटकन् चटकावणें, किंवा त्याला खेळवीत, त्याचे हाल हाल करीत, व आपल्या जिवाची तेणेकरून करमणुक करीत सावकाश केव्हांही चटकावलें, तर त्या मांजराला त्याबद्दल दोष कोण देणार ? गोष्ट हातची असते. केव्हांही केली तरी चालते. अशा-सारखी कांहींशी स्थिती कद्रूची व तिच्या मुलांची झाली असल्यास नवल नाहीं. कदाचित् मुग्ध हंसण्यानें कद्रू आपल्या मुलांना तेंच समजावून देत असेल. त्याखेरीज तिच्या मुग्ध हंसण्याचा दुसरा अर्थ कोणता असणार ?

याशिवाय तिला थोडा लौकिकही पाहाणें अगत्याचें होतें. तशी ती धूर्त होती. हातीं आलेली सत्ता वापरावयाची तर खरीच, अगदीं मनमुक्त वापरावयाची, उपभोगावयाची, पण ती पूर्ण पचनीं पाडून, अगोदर नाहीं. जगानें व जगाबरोबर ज्याच्यावर सत्ता गाजवावयाची त्यानेंही असें म्हटलें पाहिजे कीं सत्ता गाजविण्यास योग्य असल्यामुळेंच सत्ता गाजवीत आहेत, व सत्ता गाजविणारी मंडळी असावीत तर अशीच असावीत असें आपल्या-विषयीं लोकांचे उद्गार निघावेत.

त्या अनुकूल कालाची मार्गप्रतीक्षा कद्रू सावध चित्तानें व उघड्या डोळानें करीत राहिली होती.

विनता मात्र त्या दिवसापासून अधिकच गंभीर, अधिकच विचारमग्न, अधिकच चिंताक्रांत दिसूं लागली. ती बोलणाराशीं बोले. हंसणाराशीं हंसे. पण तें सारें बळेंच आहे, ओढूनताणून आहे, हृदयांत कांहीं तरी जखम झाली आहे, हें तिच्याकडे तितकेंच सूक्ष्म रीतीनें पहाणाऱ्याच्या लक्षांत येण्यास वेळ लागत नसे. ती आपली मन:स्थिति कोणालाही जाणवूं देण्याच्या भरीस पडत नसे किंवा उघडी करण्याचा मोह उत्पन्न होऊं देत नसे. जें काम व्हावयाचें तें आंतल्याआंत. अंतरांतल्या अंतरांत ! बाहेर नाहीं. बाहेर जसा कांहीं प्रशांत सागर पसरलेला. विनता आपल्या कष्टी हृदयाची हालचाल आपल्या मुलांना चुकूनही समजूं देत नव्हती. त्यांच्या स्वतंत्र, स्वच्छंदी, आनंदी, प्रफुल्ल मनाला असल्या दु:खाच्या कल्पनेची झळ कां लागूं द्या ? आपल्याबरोबर आपल्या अपत्यांना कशाला दु:खांत पिचत ठेवा. आपल्या जीवांत जीव आहे, आपल्याला त्या यातना सहन करण्याची शक्ति आहे, तोंवर आपलें आपणच काय तें पाहून घेऊं. अपत्यांना कां त्या यातना ? ही तिची मुलाशीं वागतांना वृत्ति असे. मुलांच्या देखत विनता कधीं रंजीस असलेली, कुढते आहे, झुरते आहे, हृदयाच्या जख-मेच्या यातना आंतल्या आंत दाबून टाकते आहे, अशी कधींही दिसा-वयाची नाहीं. मुलाशीं हंसत, खेळत, प्रेमानें जेऊं खाऊं घालीत, उपदेश करीत किंवा प्रसंगीं धाकाचा एकादा शब्दही बोलत अशी असावयाची !

## प्रकरण पांचवें

ज्या क्षणीं पणाप्रमाणें विनता कद्रूची दासी झाली, त्या क्षणापासून विनतेनें आपण होऊनच कद्रूशीं वागण्याची, वर्तनाची दिशा बदलली होती. वागतांना मनाला वेदना होत. मन उलटण्याचा प्रयत्न करी. कसला पण आणि कसलें काय? आपण तें मनाला लावून घ्यावयाचें नाहीं. दासीपण स्वीकारावयाचें नाहीं. कसलीही आपल्याला कमकुवत करणारी बाधा जडूं द्यावयाची नाहीं, असें अधूनमधून तिचें सतेज मन तिला विचार करावयाला लावी. पण तें कांहीं क्षणच! फिरून तिचे विचार पूर्वस्थळावर येत.

विनता लहान मोठें कोणतेंही काम आपलें आपणच करी. दुसऱ्याकडे कधींही सोंपवावयाची नाहीं, हा तिचा मुळचाच स्वभाव. पण कद्रूचें आतां तसें नव्हतें. ती वेळ, काळ, स्थळ, मन वगैरे पाहून हलकेंच आपली सत्ता वापरूं लागे. एकादे वेळीं अगदीं लाडीकपणा दाखवून, बळेंबळेंच कौतुकाचा आव आणून, "गडे माई माझं तें हें तेवढं काम करतेस का? मला बाई भारी आतां कंटाळा आला आहे म्हणून सांगतें हो. करतेस कां?" असें सांगावयाचें व आपलें काम विनतेवर लादावयाचें. दुसऱ्या प्रसंगीं "माई, कसं बाई सांगू तुला. सांगायचं अगदीं जिवावर आलं आहे. पण काय करूं, सांगितल्याशिवाय सोय नाहीं. मी एक घरांतलं आडकाम काढलं आहे. पण तें करायचं तर हातचं काम तसंच राहणार. तेव्हां हलक्याशा हातानें तुझ्या कामाबरोबर माझंही तें काम करून टाकीनास. होईल तुला थोडासा त्रास. घे माझ्याकरितां तेवढा! घेशीलना? हो. घेच. काय झालं तेवढं बहिणीकरितां केलं म्हणून? मी अगदींच कांहीं विसरणार नाहीं. मी पण तुझीं काम प्रसंग पडला तर करायला धांवेन, एवढं ध्यानांत ठेव." असं अगदीं मिठास बोलून विनतेला काम करावयाला लावायचं. पुन्हां केव्हां मनांत लहर आली कीं, "काम झपझप, स्वच्छ, मनासारखीं करावींत, तर आमच्या माईनंच! कशी बाई माई, तुला कामाची उरकशक्ति साधली आहे, ती तुझी तुलाच माहित! माई, हें काम माझ्यापेक्षां तूंच चांगलं करतेस. तेव्हां हें माझं असलं तरी तें मी

तुलाच करायला लावणार ! तूंच कर ! इतकंच नव्हे, पण मी माझं हें काम आतां रोज तुझ्याचकडून करून घेणार अं ! आपलं आजपासूनच तें काम तूं करायला लाग कशी ! " असें म्हणायचें व आपलें काम विनतेच्या डोक्यावर लादावयाचें.

कद्रूनें कोणतेंही काम, केव्हांही, कसेंही कसल्याही शब्दांत—मधुर भाषेंत किंवा कठोर आवाजांत—सांगितलें तरी तें निमूटपणें करावयाचें, टाळावयाचें नाहीं, नकार द्यावयाचा नाहीं किंवा तिचें काम करण्याबद्दल असंतोष व्यक्त करावयाचा नाहीं, असें विनतेचें मनाशीं ठाम ठरूनच गेलेलें होतें. कद्रूनें लाडिकपणानें सांगितलें, हट्ट धरून सांगितलें अगर आज्ञा म्हणून सांगितलें, तरी आपल्याला तें केलेंच पाहिजे, कारण आपण कद्रूच्या दासी आहोंत हें ती मनाआड केव्हांही टाकीत नसे.

एकेक गोष्ट पचनीं पडत चालली आहे. तक्रारीखेरीज सांगितलेली गोष्ट ऐकण्यांत येत आहे, असें पाहून कद्रू पायरीपायरीनें पुढें चालत होती. प्रत्यक्ष सत्ता जाणवूं तर द्यावयाची नाहीं व काम तर करून घ्यावयाचें ही कला कद्रूला चांगलीच अवगत होती. त्या कलेचा उपयोग झाला. आपल्या मनासारखें झालें. विनतेनें सांगितलेलें काम बिनबोभाट ऐकलें म्हणजे कद्रूला मनांतल्या मनांत मनस्वी आनंद होई. तो आनंद आपल्या मुलांशिवाय इतरत्र व्यक्त करावयाला ठिकाण कुठचें ! रात्रीं सगळीं सभोंवती जमल्यावर, आज असें असें झालें, मी अशी युक्ति करून पाहिली, विनता निमूटपणें माझ्या युक्तीला बळी पडली वगैरे मोठया उल्हासानें ती आपल्या मुलांना सांगे. मुलें आईचें ऐकून घेऊन फिदीफिदी हंसत ! आपल्या आईनें केवढें शतकृत्य केलें असें त्यांना वाटे. ते आणखी विचारीत. उद्या दुसरी मौज काय करावयाची असें विचारीत. तीही आपली नवी दुष्ट युक्ति योजून ठेवली असल्यास सांगे. पुन्हां त्यावर सगळेच मोठमोठयानें हंसत !

त्या कुजबुजीचा, त्या हंसण्याचा, त्या कुटिल कल्पनांचा, त्या दुष्ट वागण्याचा शेषाला अत्यंत त्रास होत असे. तो ऐकून घेऊन अत्यंत भडकत

असे. त्याला तें मुळींच सहन व्हावयाचें नाहीं. तो प्रथमपासूनच उदास ! त्यांत आतां तो आईचा व सगळ्या भावांचा नावडता झालेला. त्यामुळें तो कोणांत मिसळत नसे. त्याला आपल्यांत कोणी मिसळूनही घेत नसत ! दिवसेंदिवस त्याची उदासीनता वाढत चालली. आईविषयीं व भावाविषयीं अत्यंत वैताग उत्पन्न झाला. आईची भाषा व आपल्या भावांची त्याला 'होसहो' ची एक प्रकारची सांथ ! त्यामुळें त्याचा अतिरेक होऊन एक दिवस तो कोणालाच न विचारतां, न सांगतां आश्रम सोडून, कोठेंतरी तपश्चर्येकरितां म्हणून एकदम चालता झाला. तो आपल्यांत दिसेना, तेव्हां कोठें गेला, कां गेला, याबद्दल कोणीही त्याची चौकशी केली नाहीं कीं तो कोठें गेला असेल त्याला परत आणावें असेंही कोणाच्या मनांत आलें नाहीं. सर्वांचाच नावडता तो. त्याबद्दल एवढी कळकळ कोण दाखविणार ?

तो गेल्यावर कर्कोटकादिकांना एक प्रकारें मोकळें वाटूं लागलें. ते मोकळ्या अंगानें, अधिक प्रौढपणानें, विशेष प्रतिष्ठितपणानें हिंडूं फिरूं लागले ! कद्रू विनतेशीं वागण्यांत एकेक पाऊल पुढेंच टाकीत होती, पण मुलांना मात्र तसें उघड वागण्यास मुळींच सवलत देत नव्हती. मध्येंच एकाद्या मुलाला "आम्हीं असें करूं का ? तसें वागूं का ? अमूक केलें म्हणून काय झालें ?" असें विचारण्याची लहर लागे. पण कद्रू त्याला चटकन् मोडून काढी आणि अजून तुम्हांला स्वैर वागावयाला अवकाश आहे असें बजावी. सांगितलेलीं कामें निमूट होताहेत हें पाहिल्यानंतर कद्रू आतां मुद्दाम कांहीं कामें करावयाचीं तशींच ठेवूं लागली आणि आपण न सांगतांच विनतेनें तीं कामें केलीं पाहिजेत अशी अपेक्षा बाळगूं लागली. विनतेच्या लक्षांत आलें तर ती तींही कामें उरकी. पण नाहीं आलें तर अर्थात् तीं तशींच पडत. तें पाहून कद्रूला राग येऊं लागे. मग कशावरून तरी बोलणें काढून ती स्पष्ट असेंही म्हणे कीं:—

"कां? तेवढीं कामें केलीं असतीं तर बिघडलं असतं वाटतं कांहीं ? कां पदरीं कसला कमीपणा आला असता ? प्रत्येक काम कांहीं अगदीं मीच येऊन सांगितलें पाहिजे असें नाहीं कांहीं. लक्षांत आलं नव्हतं म्हटलं तर तसंही कांहीं

नाहीं. काल परवां तीं कामं मी न सांगतां झालींच होतीं. तेव्हां आजही व्हाय-
ला हरकत नव्हती. पण तसं कसं होणार ? प्रत्येक काम मीच सांगितलं पाहिजे.
जगभर झालें पाहिजे ना, ही कामं सांगून करून घेते. माझा वाईटपणा जगाच्या
चवाठ्यावर आणायची हौस आहे ना ? मग आपण होऊन काम करायची
बुद्धि कुठून होणार ? मी काय म्हणतें कीं ज्याचं त्यानं आपापलं ओळखावं
आणखी मुकाट्यानें वागायला लागावं. त्यांत आपला चांगूलपणा राहतो.
दुसऱ्यावर वाईटपणा येत नाहीं. पण हें असें वागायला मनांतच असावं
लागतं. एरवीं होत नाहीं. "

अशासारखीं शेलकीं बोलणीं कद्रूनें आरंभिलीं तरी त्यावरही विनता
सहसा तोंड उघडीत नसे. मनांत म्हणे कीं झालं आहे राणीचं राज्य सुरू.
आपल्याला कामाचं जूं मानेवर घेतलंच पाहिजे. तक्रार कोणावर करायची ?
आणि ती कामाला लागे. एकादे वेळीं अतीच झालें, फारच घालूनपाडून
कद्रू बोलूं लागली, तर ती " अग पण ताई, मी करीत नाहीं, माझें तें
काम नव्हे, असं केव्हां म्हटलं आहे का ? " असा प्रश्न विचारण्याचा ती
प्रयत्न करी. पण जहांबाज कद्रू तिला थोडीच बोलूं देणार ? ती त्या
बोलण्यावरही आपलें बोलणें ठेऊन देई-" असलं साळसूद बोलणं मला
ठाऊक आहे. मलाही पण तसं बोलतां येतं. त्यांत काय अर्थ आहे ! असं
कांहीं तरी बोलणं, वाईट तोंड करून दाखविलं म्हणजे कांहीं होत नाहीं
बरं का ? अंगावर पडलेलं सारं करावंच लागतं. तरी मी बोलत नाहीं.
जाऊं दे म्हणतें. आज नाहीं उद्यां ज्याच्या त्याच्या लक्षांत येईल आणखी
वागतील म्हणून मी बोलत नाहीं. पण तुम्हीं तर बोलायची अशी पाळी
आणतांच ! मी किती गरीब असलें, सगळ्यांना संभाळून घेणारी असले,
तरी प्रसंग पडला म्हणजे मी नाहीं असं बोलायला कमी करायची ! मग
मला कुणी कांहीं म्हटलं तरी त्याची मला पर्वा नाहीं ! "

अशा तऱ्हेनें दुसऱ्याला रडूं कोसळेल इतकें अकारण बोलावयाचं.
पुन्हां रडूं तर द्यावयाचं. बोलतां बोलतां पाणी डोळ्यांत दिसलंच, तर
लगेच सांवरून घेऊन, बोलणं फिरवून पार मोकळं व्हावयाचं, किंवा रडूं

## प्रकरण पांचवें

नाहीं आलं विनतेनें आपलं, कठोर मन शेवटपर्यंत तसंच टिकवलं तर तिच्या डोळ्यांत पाणी आलं आहे असं कल्पून तिला म्हणायचं, "हें काय माई, इतकं वाईट वाटून घ्यायला काय झालं ? असे अगदीं डोळ्यांत अश्रू का उभे राहिले ? मी तेवढ्याकरितां का तुला बोलले ? मी आहे आपली फटकळ. मनांत येतं तें चट्दिशीं बोलून मोकळी होतें. पुन्हां माझ्या मनांत कांहीं त्यांतलं रहात नाहीं. तूं मात्र अगदीं माझं अक्षरन् अक्षर जिवाला लावून घेतेस आणखी असं तोंड वाईट करून डोळ्यांत पाणी आणतेस ? तेव्हां काय म्हणावं तुला ? माझा स्वभाव जसा काय तुला माहिती नाहीं वाटतं ? मग असं रडायला काय झालं ? म्हणजे असं वागून मला–दुष्ट–निर्दय–कठोर असं ठरवायचं आहे वाटतं मनांतून ? माई, माझं तुझ्यावर किती प्रेम आहे, माझ्या अंतःकरणांत काय काय भावना आहेत, मी तुला किती मानते, याची तुला कल्पनासुद्धां कधीं यायची नाहीं. माझं अंतः-करण चिरून जर तुला मला दाखवतां आलं असतं, म्हणजे तुला खरं काय तें दिसलं असतं !–" अशासारखें कांहींच्या कांहींच बोलून, बोलतां बोलतां आपल्या डोळ्यांत पाणी आणून आणि विनतेच्या गळीं पडून हुंदके द्याव-यालासुद्धां कद्रू कमी करावयाची नाहीं. स्वतःकरून स्वतःच कसें निस्तरा-वयाचें, स्वतःकडे शहाणपणा घेऊन शहाण्याला मूर्खाच्या कोटींत कसें काढावयाचें, हेंही कद्रूला करतलमलवत् होतें. हा प्रयोग कद्रूला आरंभीं आरंभीं वरचेवर करावा लागत असे.

असल्या प्रकारांनाही विनतेचें खंबीर मन दाद देईना. तिची दिनचर्या अबाधित चालू असे. आपल्या दुष्ट–कुत्सित–बोलण्याचा परिणाम विनता आपल्या मनावर करून घेत नाहीं, हें पाहिलें म्हणजे कद्रूला कसेसेंच वाटूं लागे. विनतेला वाईट वाटावें, तिच्या डोळ्यांत वारंवार अश्रू उभे राहिलेले आपण पहावेत, आपल्याकडे दीनपणानें–क्षमायाचनेच्या दृष्टीनें तिनें पहावें, असें हलकें हलकें कद्रूला वाटूं लागलें, त्याशिवाय तिला चैन पडेनासें झालें. प्रसंगीं ती विनतेला डिवचूं खोचूं लागली. एकादे वेळीं असें होई; पाणी आणावयाचें झालें तर, लवकर उरकावें म्हणून, दोघींना भरपूर पाणी

मिळावें म्हणून विनता एकदमच दोन दोन पाण्याचे घडे भरून आणीत असे. एक डोकीवर, एक कमरेवर, किंवा एक कमरेवर एक हातांत. अशा तऱ्हेनें ती येतांना पहावयाचें. मुद्दाम पुढें व्हायचें आणि मोठा कळवळा दाखवून म्हणावयाचें, " हें काय माई, किती अवघडीत दोन दोन घडे एकदम आणते आहेस ती ! एकेक आणलास तर तुला कोणी बोलणार का आहे ? झाला थोडा उशीर तर होईल. पण असं काय तें अगोचर करायचं ! एकादे वेळीं अशानं आजारी नाहींस कां पडणार ? त्यापेक्षां गरुडाला हांका मारावी; त्याच्याजवळ एकादा घडा द्यावा म्हणजे काम उरकतं. त्रास होत नाहीं ! " अशा तऱ्हेनें बोलून आपण प्रथम जखम करावयाची आणि त्यांत पुन्हां दुसऱ्याच्या काळजाला हात घालून त्या जखमेंत मीठ भरावयाचें. असा दुष्टपणा कद्रू हटकून आणि हौसेनें करी ! अशा वेळीं मात्र विनतेला मनावर ताबा ठेवणें अत्यंत कठीण जाई. ती गडबडून जाई ! तिचे हातपाय थरथर कांपत. हातांतला घडा निसटून खालीं पडतो कीं काय असें तिला वाटे व तिचे अश्रु तिला अनावर होत ! 'आपण वाटेल ते कष्ट करावयाला तयार असतां, हवे तसे शरीर झिजवीत असतां, हिनें आपल्या सोन्यासारख्या मुलांना त्या कष्टाला जुंप म्हणून खुशाल हंसत हंसत आणि कळवळा दाखवून सांगावं. आपल्या मुलांचं सौख्य तिला पाहवूं नये. हें कोणत्या मातृहृदयाला सहन होणार ?' असले विषारी वाग्बाण मात्र विनतेच्या हृदयांत खोल खोल जात आणि तेथें भडका उडवून देत ! पण तीही कांहीं झालें तरी मनाची मानी, अंतःकरणाची अथांग अशी असल्यामुळें दुःखाचे सारे कढ आंतल्या आंत अटोकाट प्रयत्न करून दाबून टाकी. वर त्याचा लवलेशही दाखवूं देत नसे. कद्रू तिच्याकडे रोंख लावी. तिची निराशाच होई. निराशा झाली म्हणजे तिच्या तळपायाची आग मस्तकाला जाई. ती हातपाय आपटी. दांत ओंठ चावी आणि आपल्याशींच "बरं आहे, पाहून घेईन. एवढ्यानें काय झालं आहे. पुन्हां प्रसंग आणीन " अशा अर्थाचें पुटपुटून तिथून तडक दुसरीकडे कुठें तरी चालती होई !

## प्रकरण पांचवें

विनता आपलें प्राप्त कर्तव्य शांतपणानें करीत राही!

इकडे कद्रू असें वागूं लागली, तर तिचीं मुलें स्वस्थ किती दिवस बसणार? प्रथम प्रथम त्यांनीं आपल्या आईचें ऐकलें. ती स्वस्थ रहा म्हणून सांगे ते स्वस्थ रहात. पण आतां त्यांना तें बरें वाटेना. आईला न विचारतांच प्रताप गाजवावयाला लागावयाचें, असें त्यांना वाटूं लागलें. कर्कोटकादिक एकत्र जमून विचार करूं लागले. सर्वांची सारखी वळवळ चालूं झाली. परंतु पराक्रम गाजवावयाचा म्हणजे काय? कोणावर? आणि कसा? हे प्रश्न प्रत्येकासमोर उभे होतेच!

मुलांनीं पराक्रम करावयाचा—गाजवावयाचा म्हणजे गरुडासमोर आणि अरुणासमोर! पण तें व्हावयाचें कसें? दोघांचीही नांवें काढलीं तरी इकडे सर्वांची गाळण उडावयाची, अंगाला दरदरून घाम यावयाचा, बोबडी वळावयाची, तेथें पराक्रम कसा गाजवावयाचा? त्यांतून आईची परवानगी नाहीं म्हणून त्यांचा अगदीं नाइलाज झाल्यासारखा झाला! किती वेळ तरी त्यांना कांहींच सुचेना. एकमेकांच्या डोक्याला डोकीं लावून बसले. ह्याला वाटे, तो कांहीं तरी क्लृप्ती योजील, त्याला वाटे, दुसरा कोणी युक्ति काढणार आहे. असे प्रत्येकाला दुसऱ्याबद्दल वाटत होते. प्रत्येक जण मोकळाच. याप्रमाणें पुष्कळ वेळ न बोलतांच गेल्यावर एकदम चारपांच जण ओरडलेः "निघाली कां कांहीं युक्ति?"

सगळ्यांचा एकत्र प्रश्न आल्यामुळें युक्ति कोणीच काढली नाहीं, हें सिद्धच झालें. तेव्हां कोण कोणाला उत्तर देणार? प्रत्येकानें प्रत्येकाकडे एकेकदां पाहिले व सर्वजण स्वस्थ बसले. असा कांहीं काळ गेला.

"कांहीं तरी करून अरुणाची खोडी काढूं या!" एकानें विलक्षण गंभीर मुद्रा करून म्हटलें.

"कांहीं तरी करावयाचें म्हणजे काय करावयाचें?" दुसऱ्यानें तितक्याच गंभीरपणानें पृच्छा केली.

"आणि अरुणाची खोडी काढून उपयोग काय?" तिसऱ्यानें विचारलें.

“ हो, तेंही खरेंच ! ” चवथा उद्गारला.

“ कां ? त्या पांगळ्याची फजीती झाली तर थोडं आपल्याला हंसूं तर येईल ! ” पांचवा म्हणाला.

“ छट् ! त्यांत कांहीं अर्थ नाहीं ! ” आणखी एकजण म्हणाला.

“ खोडीच काढायची झाली, तर ती गरुडाचीच निघाली पाहिजे. गरुडाचीच काढतां आली पाहिजे. तर मौज.” सातवा इकडे तिकडे पहात म्हणाला.

इतक्यांत—ही चांडाळचौकडी जेथें डोक्याला डोकीं लावून बसली होती, त्याच्या सभोंवती वृक्षलतांची खूप गर्दी होती, त्या वृक्षलतांतून मंडळींना कंकणरव ऐकावयाला आला ! मंडळी एकदम चमकून उठली. त्यांना वाटलें कद्रू तेथें एकदम आली व तिनें आपले बेत ऐकले. पहातात तों कोणी नाहीं.

कसला तरी भास झाला. आपण उगाच घाबरलों. असें म्हणून मंडळींत हंशा पिकला. शांतता झाली, पुन्हां मंडळी विचार करूं लागली:–

“ गरुडाचीच खोडी काढतां आली पाहिजे !” ज्यानें प्रथम वाक्य उच्चारलें होतें, तोच धीर येऊन पुन्हां म्हणाला.

“ अरे बापरे ! गरुडाची आणि खोडी ? आपल्याला कालत्रयी तें जमायचं नाहीं ! ” मध्येंच गडबडून एकजण म्हणाला.

“ त्याशिवाय आपल्या पराक्रमाला वाव नाहीं !”

“ हें अगदीं खरें !”

“ पण गरुडाची खोडी काढतां येणं दुरापास्त आहे !”

“ त्याच्या डोळ्याला डोळा भिडवण्याची आमची शक्ति नाहीं. ”

“ त्याच्यापुढें त्या हेतूनें नुसतें उभें राहणें अशक्य आहे !”

“ हेंही खरें आहे !”

वृक्षलतांच्या आडून याच वेळीं एक मंजुळ हास्यध्वनि आला !

मंडळी पुन्हां दचकली. आपली हंसून कोणी थट्टा केली, उपहास केला कीं काय, असें सर्वांना वाटलें ! वळून पाहातां क्षणींच एकाला कुणातरी

स्त्रीच्या वस्त्राचा लालभडक पदर दिसलासा भासला. पण निरखून पाहातांना तो भ्रम आहे. एका वृक्षाच्या पिकलेल्या लाल रंगाच्या पानापानांचा तो देखावा आहे असें दिसलें. मंडळी याही वेळीं खजील झाली.

आतां मंडळी कंटाळली. कोणाचेंच डोकें चालेना. इतका वेळ कर्कोटक अगदीं स्तब्ध होता. तो मंडळी बोलत असतां एकही शब्द बोलला नाहीं. नुसतें सर्वांचें ऐकून घेत होता. आतां मंडळी त्याच्याकडे वळली आणि म्हणाली.

" कर्कोटका, आम्हीं थकलों बुवा ! आतां तूंच कांहीं तरी युक्ति काढ !"

" आम्हांला पराक्रम गाजवायची तर इच्छा आहे—"

" पण युक्ति मनासारखी मिळत नाहीं—"

" त्यामुळें नाइलाज आहे—"

" तेव्हां आम्हीं तुला शरण आलों आहोंत—"

" म्हणून कांहींहीं कर. पण युक्ति काढ !—"

" आणि गरुडावरही पराक्रम गाजवूं असें कर !"

" बस्स ! कर्कोटका, हें एवढें होऊं देच !"

कर्कोटक त्या सर्व भावांची धांदल पाहून खूप मोठ्यानें हंसला.

तसा वृक्षलतांच्या आडून फिरून हास्यध्वनि आला. मंडळींनीं फिरून चोहोंकडे पाहिलें. कोणी दिसलें नाहीं. जागचें कोणी उठून जरा इकडे तिकडे एकाद्यानें शोधलें असतें, तर कदाचित् कोण होतें, याची चौकशी लागली असती. पण कोणी एकानेंही जागचे उठण्याचे श्रम घेतले नाहींत. वृक्षलतांच्या आडून वाळलेल्या पाचोळ्यावर कुणाचे तरी पाय वाजत असावेत. प्रत्येक पावलाचा आवाज दूरदूर जातोसा वाटला. मंडळी कान देऊन ऐकत होती. आवाज ऐकूं येईनासा झाल्यावर कोणी तरी म्हटलें:—

" कोणी तरी आपलें बोलणें आडून ऐकत होतं खास !"

" यांत शंकाच नाहीं !"

" पण कोण असावं ?—"

" कदाचित् गरुडच असेल !—"

"अरे बापरे! आणि त्यानें आपले आडून सारे बेत ऐकले की काय?"

"होय रे होय!"

"मग आली कंबक्ति!"

"अरे पण अजून आपण बेत केले आहेत कुठें?—"

"पण बेत करीत होतों!"

"युक्ति योजीत होतों–योजिली नव्हती!"

"खरेंच तो गरुड असावा का?–"

"कर्कोटका! कोण असावं रे ते?"

"तुम्हां सर्वांचा तो मूर्खपणा–बावळटपणा होता!" कर्कोटक उत्तरला.

"म्हणजे काय?"

"अशा वेळीं आमची थट्टा करतोस काय?"

"अरे, तो नुसता भास होता!" कर्कोटक म्हणाला. "गरुड तर खास नव्हता. हास्य ऐकलें, कंकणध्वनि ऐकला, हें खरें. पण त्यावरून तो गरुड कांहीं ठरत नाहीं! त्याच्या हातांत कांहीं कांकणें भरलेलीं नाहींत किंवा तो लुगडें नेसलेला पण नाहीं. मघाशीं कुणाला तरी बाईच्या लुगड्याचा लाल पदर दिसला होता ना? मग फार झालं तर ती एकादी बाई असेल झालं. पण गरुड खास नव्हे!"

"तुझाच तर्क बरोबर आहे!–गरुड नव्हताच तो! आतां खात्री झाली माझी" धीर करून एकजण म्हणाला.

"मी म्हणत नव्हतों. गरुड नव्हेच तो! तो असा आड उभा राहून काय म्हणून ऐकेल?" दुसरा एक अवसान धरून बोलूं लागला.

"बरें, जाऊं द्या तें! गरुडानें आपले बेत ऐकले नाहींत इतकें ठरलें. आतां त्यावर वाद कशाला. हं, बोल कर्कोटका, तुझी युक्ति!" तिसरा म्हणाला.

"माझ्यावर तुमचा पूर्ण विश्वास आहे?" कर्कोटकानें विचारलें.

"अर्थात्!" त्याचे सर्व बांधव एकदम ओरडले.

"मग कांहीं हरकत नाहीं!" कर्कोटक म्हणाला. "मी तुमच्याकरितां एक सुन्दर युक्ति योजिली आहे."

## प्रकरण पांचवें

"ठीक आहे. आटप लवकर. सांग तर!" पुन्हां सर्वजण ओरडले.

"अं हं!" त्या सर्वांना थांबवून कर्कोटक म्हणाला. "आतां कांहीं एक सांगणार नाहीं. आज रात्रीं सांगेन किंवा उद्या प्रातःकाळीं सांगेन. लगेच तुमच्या पराक्रमाला आरंभ होईल!"

सर्वांनीं कर्कोटकाच्या तोंडाकडे टक लावली!

"समजलें? खात्री असूं द्या उद्यां तुमच्या पराक्रमाला आरंभ होणार? तुम्हीं माझ्या युक्तिनें अरुणावरच नव्हे तर प्रत्यक्ष गरुडावरही आपला पराक्रम गाजवूं लागणार!" कर्कोटक गंभीरपणानें सांगत होता.

"कांहीं हरकत नाहीं. उद्यां तर उद्यां" असें म्हणत मंडळी तेथून उठली. कर्कोटकही उठला! कर्कोटकाला आपल्या बंधूंची थट्टा करण्याची लहर लागली, "उद्यांच्या उद्यां काय होईल तें खरें. पण काय रे, मघांचें आपलं बोलणं गरुडानेंच ऐकलें असलें—आडून ऐकलें—आपल्या सर्वांना असं एकत्र त्यानं पाहिलं तर—"

"तर—"

असें म्हणत आहेत तों खरोखरच प्रत्यक्ष गरुड त्यांच्याकडे त्यांना शोधीत येत असलेला त्या सर्वांनीं एकदम पाहिला!

गरुडाला पाहातांच सर्वांची स्थिती त्या वेळीं काय झाली असेल? त्यांच्या डोळ्यापुढें काय दिसलें असेल? त्यांच्या अंगाला चळकांप कसा भरला असेल?— याची नुसती कल्पनाच करीत राहिलें पाहिजे!



# प्रकरण सहावें.

सत्ताधाऱ्यांना सुखी करणार ! सत्ताधाऱ्यांनीं आपली सत्ता कशी उप-
भोगावी, आपल्या हाताखालच्या लोकांवर सत्तेचे प्रताप कसे गाजवावेत
हें मी शिकवीन. तें मला चांगलें शिकवतां येईल ! "–

"दृष्टे चोरस्य चन्द्रिका" अशाप्रमाणें गरुडाला पाहतांच कर्कोटकादि कद्रूच्या सर्व प्रजेची अवस्था झाली होती. कर्कोटकानें बाहेर कांहीं दाखविलें नव्हतें परंतु मनाशीं तो चरकलाच होता. गरुडानें आपलें बोलणें ऐकलें तर नसेल ? आपले गुप्त बेत त्याला समजले तर नसतील ? आणि तसें जर झालें असेल; तर गरुड काय करील ? काय बोलेल ? कसा वागवील ? असें कद्रूच्या मुलांना वाटत होतें. गरुडाला चुकवावें कीं काय, तो समोरून येत आहे, तर आपण दुसऱ्याच मार्गानें तिसऱ्याच ठिकाणीं त्याच्याकडे लक्षच नव्हतें असें दाखवून जावें काय ? असेंही कांहीं जणांच्या मनांत आल्याशिवाय राहिलें नाहीं. त्याप्रमाणें तात्काळ त्यांनीं तसें केलेंही असतें, परंतु विचार येऊन त्याला अनुसरून कृति व्हावयाच्या अगोदरच गरुड सर्वांच्यासमोर येऊन उभा राहिलाही !

गरुडाकडे वर मान करून पाहाण्याची शक्ति कोणांत होती ? गरुड संतापला आहे, रागावला आहे, आपली कंबक्ति काढण्यासाठीं हातांच्या मुठी त्वेषानें वळतो आहे कीं आणखी कांहीं यापेक्षां भयंकर त्याच्या मनाची स्थिति झाली आहे, हें गरुडापुढें खालीं मान घातलेल्या सर्वांना कळावें कसें ? गरुड जवळ आला. कर्कोटकाच्या पाठीवर हात मारून हंसत हंसत त्यानें जेव्हां "काय रे, सारे जण इकडेच काय करतां ? कसला खेळ खेळत होता ? आम्हांला कां तुमच्या खेळांतून वगळता ? चला आपण सारेच जण खेळ खेळूं ! आणि आपला शेष कुठें दिसत नाहीं तो ?" असें जेव्हां म्हटलेलें सर्वांनीं ऐकलें, तेव्हां त्यांची खात्री झाली कीं आपण गरुडाला निष्कारण भ्यालों. त्या भिण्यांत कांहीं अर्थ नव्हता ! आपले बेत गरुडाला कळले नाहींत कीं आपण एकत्र कां जमलों होतों, त्याबद्दल

त्याला शंकाही आली नाहीं. आणि मग त्या सर्वांच्या जीवांत जीव आला. प्रसंग गरुडाशीं असल्यामुळें तो आपली कशी कंबाक्ति काढील याबद्दल प्रत्येकाला सूर्यप्रकाशासारखी खात्री होती! पण तो प्रसंग आपल्या सुदैवानें टळला, ही जेव्हां सर्वांची खात्री झाली, तेव्हां त्यांची भीती वगैरे सर्व चट्सारीं नाहींतशी होऊन त्यांनीं गरुडाकडे धीर करून वर पाहिलें तों खरोखरच तो हंसत होता. त्याच्याकडे पाहिल्यावर त्याच्या डोक्यांत कोणत्याही विचारविकारांचें वावटळ उठलें नव्हतें असें स्पष्ट दिसलें. मग कर्कोटकादि एकेक जण त्याच्याशीं बोलावयाला लागला. एकानें सांगितलें 'आम्हीं खेळणार नाहीं.' दुसरा म्हणाला 'आम्हीं खेळतही नव्हतों'. तिसऱ्यानें माहिती दिली कीं त्यांच्या मातुःश्रींनीं कांहीं काम सांगितलें होतें तें करावयाला सर्वजण जुटीनें निघाले होते.

सर्वांचीं उत्तरें ऐकून गरुडालाही बरें वाटलें. उत्तरें खोटीं वाटण्याचें किंवा त्यांच्याविषयीं कसलीही शंका येण्याचें कारण गरुडाला दिसलें नव्हतें. त्यामुळें ते आपापलीं कामें ठरल्याप्रमाणें करीत आहेत, आईच्या आज्ञेप्रमाणें तत्परता दाखवीत आहेत, हें पाहून गरुडाला उलट अभिमानच वाटला. त्यानें पुन्हां कित्येकांच्या पाठीवर आनंदानें थापट्या मारल्या "काय काम करावयाचें असेल तें जरूर पार पाडून या. मग आपण सारेजण आखाड्याकडे जाऊं. मीही कांहीं कामालाच निघालों होतों·निघालों आहे तें उरकून मी तिकडे जातों. मी अगोदर तेथें आहेच, पण माझ्या अगोदर तुम्ही आखाड्याकडे गेलाच तर माझी मार्गप्रतीक्षा करीत रहा, तेथून हलूं नका" इत्यादि सांगितलें व तोही कोणत्याशा महत्वाच्या कामाला जसा आला तसाच निघून गेल्यावर सर्व सर्पबंधूंना सुटल्यासारखें वाटलें. त्यांनीं त्या तऱ्हेचा एक दीर्घ श्वास सोडला.

गरुड एका दिशेनें कामाला गेला, त्यानंतर ही मंडळीही बोलत बोलत निघाली. आतां एक एक फुशारकी मारूं लागले. गरुडाला कसें फसविलें, त्याला कोणत्याही प्रकारचा सुगावा कसा लागूं दिला नाहीं, आपण सर्व त्याच्यापेक्षां अधिक शहाणे कसे आहोंत, याविषयीं एकेक जण अहमहमकीनें

बोलूं लागला. एक जण बोले. सारे जण हंसत. गरुडाची, अरुणाची आणि मधून विनतेचीही थट्टा–कुचेष्टा करीत, पुन्हां खो, खो, खो असा हास्यध्वनी त्यांच्यांत उठे !

आतांही तसेंच झालें. गरुडाची पाठ वळतांच त्याची कुचेष्टा करण्याची, अरुणाच्या पांगळेपणाला हसण्याची पुष्कळांना लहर आली. त्याप्रमाणें त्यांनीं त्या आपल्या पवित्र (!) कार्यास आरंभही केला. बोलत बोलत मंडळी बरीच दूरवर गेली होती. मंडळी हंसण्याखिदळण्याच्या पूर्णपणें रंगांत आली होती. त्यांत एकानें किंचित् गंभीर होऊन, कांहींसें हंसत, कांहींसें काढून घेण्याच्या बुद्धीनें कर्कोटकाला मध्येंच एकदम म्हटलें "कर्कोटका, गरुडावर प्रताप गाजवायला काय युक्ती करणार आहेस–ती युक्ति सांग तरी आम्हांला तुझी !"

"आम्हीं कांहीं ती लगेच षट्कर्णी करणार नाहीं !"

"किंवा तिचा आम्हीं कांहीं दुरुपयोगही करणार नाहीं !"

"अगर तुझी युक्ति ऐकून आम्हींच ती काढली, असेंही म्हणणार नाहीं !"

"मग सांग तर ! आतांच सांग. युक्ति सांगायला रात्र कशाला पाहिजे ? किंवा उद्यांची सकाळ तरी कशाला पाहिजे ?"

"संध्याकाळीं तूंच सांगणार. उद्यां तूंच सांगणार आणखी आतांही तूंच सांगणार—"

"आणि कोणत्याही वेळीं आम्हींच ऐकणार !—"

"मग सांगायला काय हरकत आहे ? तर आतांच सांग–नव्हे, तूं सांगितलेंच पाहिजे."

अशा प्रकारें कर्कोटकाच्या पाठीमागें सर्वचजण लागले. सर्वजण कर्कोटक काय युक्ति सांगतो आणि ती करून पाहून गरुडाचें वर्चस्व आपण केव्हां झुगारून देतो असें प्रत्येकाला होऊन गेलें होतें.

कर्कोटकानें सर्वांच्या प्रश्नांच्या माऱ्याला "आतां नाहीं" असें एकच नकारात्मक उत्तर दिलें. त्यामुळें सर्वांचीं मनें खट्टु झालीं. सरळ सांगत नाहीं तर त्याला आतां चिडवूं या असें कांहीं जणांना वाटलें व त्यांनीं तसा

प्रयत्नही आरंभिला. एक जण म्हणाला "कर्कोटक आपल्याला उगीच झुलवितो आहे. त्याला युक्ति अजून कांहीं सुचलीच नाहीं, तर तो आपल्याला काय सांगणार आहे?"

"हेंच खरें असेल. म्हणूनच तो आढेवेढे घेतो आहे"

"आम्हांला यावेळीं दुसरा कोणीही तशी युक्ति सांगेल तरीही चालेल."

कर्कोटक पुढें चालला होता आणि मागाहून सर्व त्याचे बांधव चालले होते. चालतांना त्यांच्यामध्यें वरील भाषा चालली होती. कर्कोटकानें एकदां उत्तर दिल्यावर पुन्हां कांहींही तो बोलत नव्हता. दुसरे 'कोणीही युक्ति सांगितली तरी पाहिजे आहे आम्हीं त्याचें ऐकूं. त्याचे आभार मानूं. आम्हीं त्याला फार फार मोठा मान देऊं,' वगैरे वगैरे बडबड करीत होते. अशी बडबड चालू असतां मागाहून चालणाऱ्यापैकीं चारदोन एक-दम एके ठिकाणीं थबकले.

एका बाजूला उभी असलेली एक अत्यंत रूपवती युवति त्यांच्या दृष्टीस पडली. ती या मंडळीकडे पाहून मृदू हास्य करीत होती. तिचा मुखचंद्र, तिचा नट्टापट्टा इत्यादि सर्व इतकें कांहीं अलौकिक होतें कीं, तें पाहिल्यावर पुढें पाऊल टाकण्याचें भान कोणालाही होणें अशक्यप्रायच होतें. अगो-दर स्त्री. त्यांत नितांत सुंदर, ती आपण होऊन आपल्याकडे हंसत मुखानें पाहातें आहे, आपल्याशीं संभाषण करण्याची इच्छा दर्शवीत आहे, असें पाहून कोण देहभानावर राहील? कोण वेडा झाल्याशिवाय राहील? स्वतःला कोण भाग्यशाली समजणार नाहीं? ती तरुण सुंदरी अशाचपैकीं एक होती. तिच्याकडे ज्यांची दृष्टि गेली, त्यांच्याकडे ती अशी कांहीं मोहक-पणानें हंसून पहात होती, कीं तिचा परामर्ष घेतल्याखेरीज त्यांना गत्यंतरच नव्हतें! तिच्याकडे सारेजण 'ऑ' करून पहात राहिले. त्यांना कांहीं क्षण बोलावयाचेंही सुचेना. ते भांबावले आहेत, आपल्या सौंदर्याची मोहिनी त्यांच्यावर पूर्णपणें पडली आहे, आपल्याशीं दोन शब्द बोलल्याखेरीज ते पुढें जात नाहींत, असें त्या सुंदर स्त्रीनें तात्काळ ओळखलें. तिला तेंच पाहिजे होतें. तिला ही मंडळी उभी राहिलेली पाहून अत्यंत आनंद झाला!

## मातृसेवा

पुढची मंडळी हलके हलके पुढें चालली होती. मागाहून येणारी मंडळी थबकलेल्या मंडळींत येऊन लवकरच मिसळली. सर्वांनीं जवळ जवळ त्या सुंदरीला अर्धवट गराडा घातल्यासारखेंच केलें. त्यांना तें दृश्य अभिनव होतें. त्यांचें डोळे तिच्या रूपावर खिळून राहिले. तिच्या अंगाचा एक प्रकारचा सुगंध येतो आहेसा वाटे म्हणून घ्राणेंद्रियें तिकडे ओढूं लागलीं. कान तिच्या तोंडाचे शब्द ऐकावयाला उतावळे झाले. ती बाई त्या आश्रमाच्या आसमंतात् भागीं यापूर्वीं कधींही दिसली नव्हती. ती कोण? कोठून आली? राहाते कुठें? इकडे भटकण्यांत तिचा हेतु काय? असें विचारावें, असें आतां एकेकाच्या मनांत येऊं लागलें. पण बोलावयाचें कोणी? कसें व काय? ही पंचाईतच आली. कोणी तरी आतां पुढें होणार किंवा तीच बोलूं लागणार तोंच पुढें गेलेल्या कर्कोटकादिकांनीं सहज मागें वळून पाहिलें तों त्यांना मागील दृश्य दिसलें. त्यांनाही तो विलक्षण चमत्कार वाटला म्हणून ते तेथून परतले. कर्कोटक परतल्याचें जेव्हां त्या स्त्रीनें पाहिलें तेव्हां तिला विशेष आनंद झालासें दिसलें. बोलावयाचें झालें तर त्याच्याशींच किंवा बोलावें तर त्यानेंच आपल्याशीं अगोदर बोलावें, असें तिला वाटत असावें, असें दिसलें.

कर्कोटक परत आला. त्या स्त्रीच्या स्वरूपसौंदर्याकडे पाहून तोही विस्मित झाला. तो जवळ आलेला पाहतांच ती अत्यंत लाजली, तिनें एक लज्जेचा मधुर मुरका मारला. त्याबरोबर कर्कोटकाला काय वाटलें असेल तें त्याचें त्यासच माहीत! तो तर घायाळ झालाच. पण तें त्या स्त्रीचें लज्जायुक्त मुरकणें असें कांहीं विलक्षण होतें कीं, तेथें असणाऱ्या प्रत्येकाला वाटलें कीं, ती आपणांसच पाहून इतकें भावयुक्त लाजली. प्रत्येकाला अस्मान ठेंगणें वाटूं लागलें. स्त्रियांच्या प्रेमळ कटाक्षाचा हा प्रभावच आहे!

त्या रूपवतीची पूसतपास करणें आपलें कर्तव्य वाटून कर्कोटक पुढें झाला व त्यानें नम्रतापूर्वक पृच्छा केली—"आपण कोण? कुठल्या? कुणाकडे आलांत? आपण राहाणाऱ्या कुठल्या? कोणाच्या?" त्याच्या प्रश्नाला उत्तरें तात्काळ, चोख आणि निर्भीड मिळालीं. "मी एक स्त्री आहे.

सागरीचें राहणें आहे. या आश्रमांत आश्रयाच्या उद्देशानें आलें आहे. रत्नाकराची मी एक कन्या आहे. ”

“ आपण इकडेच कशा आलांत? येथें आश्रय मिळेल असें कसें वाटलें ? पूर्वी कांहीं माहिती होती कीं काय?” कर्कोटकानें पुन्हां प्रश्न केला.

‘ आपलें इकडे यावेसें वाटलें. आश्रय मिळणार हा भरंवसा वाटला. मला असें वाटलें कीं इथल्या मंडळींनीं मला पाहिलें आहे, मीही इथल्या मंडळींना पाहिलें आहे. आणि खरेंच म्हटलें तर मी त्याच भरंवशावर इथें आलें. ”

“ कुठें एकमेकांना पाहिलें ?”

“ आपण मला वाटतें उच्चैश्रवा पहावयाला रत्नाकरांकडे आला होता ! त्यावेळीं मी आपणां सर्वांना पाहिलें. मी तिथेंच त्यावेळीं होतें. म्हणून वाटलें कीं मीही त्या वेळीं आपल्या दृष्टीस पडलें असेन. तसेंच एकंदरींत त्या वेळच्या आपापसांतील बोलण्याचालण्यावरून मी मनाशीं ठरविलें कीं आपण या मंडळीकडे तपास करीत गेलों तर आपल्याला आश्रय खात्रीनें मिळेल. आपण नुकतेंच सत्ताधारी झालां आहांत. कोणाही सत्ताधाऱ्यांच्या आश्रयालाच राहण्याची आवड, हौस, इच्छा आणि महत्त्वाकांक्षा मला आहे म्हणूनच मी इकडे आपण होऊन आलें आहे.” हें बोलत असतांना ती असें कांहीं हावभाव करीत होती कीं, कर्कोटकसुद्धां सारेजण नुसते गुंगून गेले. ही एवढी अफाट बाई कोण ? ती इतकी धीट कशी ? पूर्वी कधींही परिचय नसतां असें निर्भीडपणें बोलते कशी, आश्रय मागते कशी, वगैरेबद्दलचा विचार करण्याचें कोणालाच भान नव्हतें.

“ सत्ताधाऱ्याच्या आश्रयाला राहून तुम्ही करणार काय ? तुमचा उपयोग काय ? ” कर्कोटकानें मुद्दाम विचारलें.

“ सत्ताधाऱ्यांना सुखी करणार ! त्यांनीं सत्ता कशी उपभोगावी, आपल्या हाताखालच्या लोकांवर सत्तेचे प्रताप कसें गाजवावें, हें मी शिकवीन. तें मला चांगले शिकवितां येतील. ”

“ खरेंच ? ” एकदम किती जण तरी ओरडले.

" होय ! " ती पुन्हां मंजुळ स्वरांत म्हणाली.

" मग कांहीं हरकत नाहीं. आम्हीं आमच्या आश्रयाला तुम्हांला खुशाल ठेऊन घेऊं. आम्हीं आतां सत्ताधारी झालों आहोंत. गरुडावर आणि अरुणावर आम्हांला सत्ता गाजवावयाची आहे—"

" तें मी सारें मघाशींच वृक्षवेलींच्या आडून ऐकलें आहे. " ती स्त्री मध्येंच म्हणाली. " त्यावेळींच पुढे येऊन त्यांच्यावर कशी सत्ता गाज-वयाची तें सांगणार होतें पण म्हटलं त्यावेळीं नको. अगोदर आपल्या आश्रयाची सोय लागली पाहिजे. "

" मग चला, आमच्या आश्रमांत. आमच्या आईची गांठ घालून देऊं. तिला सांगूं. खुशाल रहा. आमची आई खुशाल तुम्हांला ठेवून घेईल. "

" अं हं ! " हंसत हंसत ती म्हणाली. " तेवढं मात्र करूं नका. मी कोणाही स्त्रीजवळ राहणार नाहीं. स्त्रिया माझा द्वेष करतील. मला कोणा-चेंही वर्चस्व सहन होणार नाहीं. मी दिवसाढवळ्या वावरणार नाहीं. एकां-तांत असल्याखेरीज मी कोणाला कसली युक्ति सुचविणार नाहीं, कीं सत्ता गाजवावयाला सहाय्यही करणार नाहीं ! "

" सारेंच विलक्षण ! " कर्कोटक उद्गारला.

" हें आहे खरें ! " तीच पुढें म्हणाली. " मी तुमच्याबरोबर आश्र-याला राहिल्यानंतर केव्हांही, कुठेंही, कशीही येईन. मला त्यांत आनंदच वाटेल. पण ते आपणां कोणाला मानवणार नाहीं. लोक निंदा करतील. नीट दृष्टीनें पाहणार नाहींत. म्हणून मीच होऊन आपल्या सर्वांच्या सुखा-करितां सांगतें कीं माझ्यासह दिवसाढवळ्या कुठें फिरण्याचें मनांतच आणूं नका ! मी शक्य तितकें रात्रीं भेटत जाईन. सत्ता दुसऱ्यावर कशी गाजवा-वयाची—त्यांत किती सुख असतें, हें अनुभवाला आणून देत जाईन म्हणजे झालं माझं काम ? पटेल तर राहीन. मी समुद्रकन्या आहे. मी श्रेष्ठ आहे. मी होऊन आपणांकडे आलें आहे तेव्हां—"

" पण तूं गरुडाकडे कां गेली नाहींस ? तो आमच्यापेक्षां पराक्रमी—देखणा—शहाणा अशी त्याची ख्याती आहे. " कर्कोटकानें तिला विचारलें.

## प्रकरण सहावें

" गरुडानें मला आश्रयच दिला नसतां. तो कितीही पराक्रमी—देखणा —शहाणा असला तरी तो आतां स्वतंत्र नाहीं. तुमचा दास आहे. दासांवरून तितकेसें माझें प्रेमच जडत नाहीं. मला सत्ताधारीच प्रिय असतात, हें मी अगोदरच सांगितलें आहे. "

याप्रमाणें ती स्त्री अस्खलित बोलत होती. कर्कोटकादि सारे जण ऐकत होते. तिचें प्रत्येक अक्षर त्यांना पटत होतें. तिच्या सान्निध्याची आवश्यकता तिच्या साऱ्या अटींसुद्धां मान्य करणें अगत्याचें आहे, हें त्याच्यासुद्धां सर्वांना ठाम वाटूं लागलें. ती त्यांना फार मोठी वाटूं लागली. कोणाला आपल्यावर प्रेम करणारी स्त्री मोठी वाटणार नाहीं ? आवडणार नाहीं ?

त्या स्त्रीनें याप्रमाणें कर्कोटकादि साऱ्या मंडळींना पूर्णपणें भारलें. आपलेसें केलें. ती सर्वांनाच सारखी प्रिय वाटूं लागली. प्रत्येकाला वाटूं लागलें कीं दुसऱ्यापेक्षां आपल्यावरच तिचें अधिक—निस्सीम—अखण्ड असें प्रेम आहे. त्या सर्वांनीं तिच्या प्रेमळ अटी उभयतांच्या हिताच्या म्हणून मान्य केल्या. आश्रयाचें अभिवचन कर्कोटकानें पुढाकार घेऊन तिला दिलें.

तिची रहावयाची सोय, तिची भेट घेऊन तिचा सल्ला वगैरे घेण्याच्या वेळां वगैरे लवकरच निश्चित करावयाचें ठरवून ती प्रथम भेट तेथेंच आटोपती घेतली. एका दृष्टिपाताच्या आंतच वृक्षलताच्या आड ती दिसेनाशी झाली. कर्कोटक व त्याचे बंधूही चालूं लागले.

त्यांच्या बोलण्याचा विषय आतां बदलला होता. त्यांच्या दृष्टीचा, विचारांचा विषय पूर्णपणें निराळा झाला होता. हा एक अनपेक्षित असा चमत्कारच घडून आला होता. त्या चमत्काराचाच विचार जो तो आपापल्याशीं करीत होता. एक रूपवती स्त्री येथें येते काय ? आपण तिची चौकशी करतो काय ? ती आपला आश्रय मागते काय ? आपण तो तिला देतो काय ! आणि त्याबद्दल ती आपल्याला उपयोगी पडण्याचें कबूल करते काय ! साराच विलक्षण प्रकार ! इतकें असून तिच्याबद्दल उघडपणें बोलण्याची चोरी ! आईजवळ ती यावयाला तयार नाहीं! हें त्याहूनही विलक्षण !

तिनें जातां जातां संध्याकाळीं पुन्हां भेट व्हावी, असें अर्धवट म्हटलें. सर्वांना त्या संध्याकाळचीच डोक्यांत ओढ लागली. संध्याकाळ लवकर होईल काय ? संध्याकाळीं सर्व कामें बाजूला ठेवून तिला भेटलेंच पाहिजे, असें प्रत्येकाच्या मनांत संकल्प होऊं लागले.

उघडपणें तिच्याविषयीं 'बोलतांना ज्याअर्थीं ती रत्नाकराकडे उच्चै-श्रव्याजवळ होती, त्याअर्थीं ती म्हणजेही एक रत्नच असलें पाहिजे. असें रत्न आपल्यापाशीं आपण होऊन आपल्याकडे चालत आलें आहे, तेव्हां आपण केवढे भाग्यवान् आहोंत' असा ध्वनि सर्वांच्या मुखीं येऊं लागला. रत्न आपलेंसें झालें. आपण रत्नाला आवडलों ही कल्पना किती हृदयंगम आहे ? प्रत्येकाला असेंच वाटत होतें. झालें. एक दिवस, दोन दिवस, आठ दिवस–असे दिवसामागून दिवस जाऊं लागले. त्या दिव्य स्त्रीशीं परिचय, सहवास, प्रणय, प्रीती वगैरे वगैरे क्रमानें क्रमानें दृढ होत चाललीं. दर दिवशीं तिच्या अल्प सहवासाचें मंडळींना नवलपूर्ण सौख्य मिळूं लागलें. ती प्रत्येकाला सोयीसवडीप्रमाणें स्वतंत्र अशी भेटे तर पुष्कळ वेळां सर्व तीच्यासभोंवतीं जमून गप्पागोष्टी करीत, थट्टा–विनोद करीत, तिच्या सहवासांत पूर्णपणानें रंगून जात. उद्यां काय करावयाचें; गरुडाशीं, अरुणाशीं, विनतेशीं कसें वागावयाचें; त्यांना कसें वागवावयाचें, याविषयीं निश्चित विचार करीत, त्या स्त्रीला विचारीत, तीही आपल्या बुद्धिप्रमाणें सांगे. पण तो दिवस संपला, रात्र गेली म्हणजे त्या कोणाच्या हातून रात्रीं ठरविल्याप्रमाणें कांहींही होत नसे. आपला रोजचा क्रम फार तर चालू राही. पण दिवसेंदिवस त्यांतही खण्ड पडूं लागला. आश्रमांतल्या व्यव-स्थेंत अव्यवस्था माजूं लागली. आपलें जबरदस्त मोहजाल टाकणाऱ्या स्त्रीला त्यांनीं आश्रय दिलेला आहे, हें मात्र अजून इतर कोणालाही कळलें नव्हतें !

जसजसा त्या स्त्रीचा पगडा मंडळीवर बसूं लागला, तसतसें असें होऊं लागलें कीं त्या मंडळींत बेपर्वा वाढत चालली. मनाची भीति नाहींशी होत चालली. किती वेळेला ते आईचें ऐकतनासे झाले, तर उलट गरु-

डाला वगैरे गुरकावयाला कांहीं कठीण नाहीं, असें त्यांना भासूं लागलें. हाच त्या दिव्य स्त्रीच्या सहवासाचा प्रभाव !

एक दिवस असें झालें. आश्रमांतल्या नेमून दिलेल्या कामांत कांहीं मंडळींच्याकडून बरीच अव्यवस्था झाली. नव्हे त्या मंडळींनीं ती मुद्दाम अव्यवस्था होऊं दिली होती. आपण करावयाचें तें कामच त्यांनीं केलें नव्हतें. एक दिवस–दोन दिवस–तीन दिवस कामच केलें नाहीं. मनांतला हेतु हा कीं आपण काम नाहीं केलें तर गरुड करील. त्यानें तें न सांगतां करावें. गरुडाला ती अव्यवस्था दिसली. दुर्लक्ष झालें असेल, कामाचा उरक पडला नसेल, काम करणारी मंडळी आजारी असतील, असें प्रथम प्रथम गरुडाला वाटलें. पण कसें कोण जाणें हें हेतुपुरस्सर चाललें आहे, असें त्याला एक दिवस वाटलें. कामाच्या ठिकाणीं येऊन, पाहून, हंसून ती मंडळी परत जात असतांना गरुडानें पाहिलें. त्या सर्व कामांवर गरुडाची स्वाभाविक देखरेख असेच. त्याचा सर्वांना वचकही तसाच असे. चुकवाचुकवीचा प्रकार गरुडाच्या ध्यानीं आल्यावर, त्याच्या प्रत्यक्ष दृष्टीला पडल्यावर तो थोडाच स्वस्थ राहणार ? त्यानें झट्‌दिशीं जाऊन आपल्या त्या बांधवांना पकडलें. त्यांच्या कानाला धरलें. सहज चारदोन श्रीमुखांत भडकविल्या आणि विचारलें, “ हीं आश्रमांत अव्यवस्था कां ? हीं कोणी कामें करावयाचीं ? अशी चुकवाचुकवी कां ? ”

कोण त्यावेळीं त्याच्यापुढें बोलणार ? सर्वजण चळचळचळ कापूं लागले. गरुडानें समोर उभें राहून राहिलेलीं कामें त्याच मंडळीकडून करून घेतलीं आणि त्यांना सोडून दिलें. पुन्हां असें करूं नका असें बजावून सांगितलें !

अशा प्रकारें कर्कोटकानें व त्या स्त्रीनें आपल्या संगनमतानें एक सहज क्लृप्ति सुचविली. तिचा उपयोग करून पाहिला. पण ती सफल न होतां, उलट श्रीमुखांत घ्याव्या लागल्या. त्याचा प्रतिकार करतां आला नाहीं. असें प्रत्ययाला आलें. पण एवढाच आधार घेऊन तीं सर्व मुलें आपल्याला निष्कारण गरुडानें मार दिला, अशी तक्रार घेऊन आपल्या आईकडे गेलीं. तिनें ही गोष्ट मनावर घेऊन त्याबद्दल योग्य तो विचार केला

पाहिजे, गरुडाचें पारिपत्य झालें पाहिजे, अशी इच्छा त्या मुलांनीं कद्रू-जवळ प्रगट केली !

कद्रूच्या ध्यानीं आपल्या मुलांचा सर्व पराक्रम आला. मुलांनीं एक अक्कलहुशारीनें प्रयत्न करून पाहिला, याबद्दल मनाशीं तिला मुलांबद्दल कौतुक वाटल्याखेरीज राहिलें नाहीं. परंतु उघड ती तसें फारसें बोलली नाहीं. उलट "मला न विचारतां तुम्हीं असे वागलांत कां ? म्हणून तुम्हांला तसें प्रायश्चित मिळालें. मला विचारलें असतें तर मी तुम्हांला असें असें वागा, असें सांगितलें असतें. मी तुम्हांला तसें लवकरच सांगणारही होतें. पण तुम्हीं वागण्याची घाई केलीत. त्याला मी काय करणार ?" असेंच ती म्हणाली.

या कद्रूच्या बोलण्यानें तिच्या मुलांनीं तोंडें फारच वाईट केलीं. आई असें बोलेल असें त्यांना वाटलें नव्हतें ती आपली बाजू घेईल अशी त्यांची साहजीकच कल्पना होती. परंतु प्रारंभीच त्यांची ती कल्पना कद्रूनें फोल ठरविली. मग त्यांना कां वाईट वाटणार नाहीं ?

मुलांना वाईट वाटल्याचें पाहून कद्रूलाही वाईट वाटलें. मुलांना तिनें पुन्हां जवळ घेतलें, कुरवाळलें, त्यांची समजूत घातली आणि त्यांना सांगितलें, "कांहीं वाईट वाटून घेऊं नका, तुम्हीं एक संधी उत्पन्न केलीत. फार चांगलें झाले. या अशा संधीचीच मी वाट पहात होतें. मी या संधीचा उपयोग करून घेतल्याखेरीज आतां रहात नाहीं. माझ्या मुलांना तुझ्या मुलांनीं असा त्रास कां द्यावा ? त्यांच्या श्रीमुखांत देऊन त्यांचा अपमान कां करावा ? त्यांना तसा अधिकार का आहे ? तूं त्यांना स्पष्ट समजावून कां दिलें नाहींस ? समजावून कां देत नाहींस ? तुझ्या मुलांनीं केलेल्या अपराधाबद्दल माझ्या मुलांची क्षमा कां मागूं नये, असें मी विनतेला विचारल्यावांचून रहात नाहीं. तुमची तिच्या मुलांकडून क्षमा मागायला लावतें. त्याची काळजी आतां तुम्हीं मुळींच करूं नका !"

आईच्या या आश्वासनानें मुलांना केवढा आनंद वाटला ? केवढा आधार आला ! त्यांनीं त्या रात्रीं त्या दिव्य स्त्रीच्या सहवासांत असतां तिलाही ही

वार्ता मोठ्या अभिमानानें सांगितली. आलेल्या संधीचा आई उपयोग करून घेणार आहे, आई योग्य संधीचीच वाट पहात होती, असें त्या मंडळींच्याकडून त्या स्त्रीनें ऐकलें तेव्हां ती संधि आपणच कशी आणून दिली, आपणच कशी सल्ला दिली, आपणच त्या संधीची कल्पित कशी सुचविली हें त्या स्त्रीनेंही त्या वेळीं अभिमानानें त्या मंडळींच्या माथीं मारलेंच ! तें तिचें म्हणणें मंडळींनीं पण एकमतानें मान्यही केलें. कद्रूनें मुलांना त्यावेळीं मात्र बजावून ठेविलें कीं, मी पुन्हां सांगेपर्यंत भलत्या भानगडींत पडूं नका ! आपल्या वागण्यांत कांहींही फरक करूं नका !

त्या प्रकाराला चारदोन दिवस होऊन गेले. आश्रमांतली व्यवस्था त्या कालांत पूर्वीप्रमाणेंच चालली.

पण पुन्हां आणखी एक प्रसंग उद्भवला. कद्रूचें सांगणें कद्रूच्या ठिकाणीं राहिलें. फिरून त्या दिव्य स्त्रीच्या सांगातीं थट्टा विनोद चालला असतां कर्कोटकाला त्या स्त्रीनें उद्यां तुम्हीं असें असें गरुडाशीं वागण्याचें धाष्टर्य करा म्हणजे काय चमत्कार होतो तो पहा. तुम्हीं त्याला जेथपर्यंत भीत आहांत तेथपर्यंत तुम्हांला तो भिववीत राहणारच ! त्याची भीति झुगारून द्या. त्यालाच भिवविण्याचें शौर्य दाखवा म्हणजे पारडें कसें बदलतें तें दिसेल. तुम्हीं तसें शौर्य दाखवावें, अशी माझी इच्छा आहे. तसें आपलें शौर्य पाहण्याची मला फार हौस आहे. मला पराक्रमी पुरुष आवडतात. सत्ताधारी पुरुषांच्या संगतींत मला सौख्याचा लाभ होतो. म्हणून म्हणतें आपण आपलें शौर्य मला दाखवा. गरुडा–अरुणांवर आपण सत्ता गाजवायला लागल्याचें माझ्या नेत्रांनीं मला पाहूंद्या. गाजवणार ना शौर्य ? दाखवणार ना आपला पराक्रम ? आपल्या सत्तेचं सौख्य मला पहावयाला मिळणार ना ? मिळणार ना ?" अशा गोड गोड मोहक भाषणाला कोणता प्राणी मान तुकविणार नाहीं ? कोण शौर्य गाजवायला सज्ज होणार नाहीं ? त्या सुन्दरीच्या शब्दांनीं कर्कोटकाला चांगलेंच प्रोत्साहन मिळालें. त्यानें त्याच क्षणीं गरुडाला आपल्या आंगचें पाणी तिच्या प्रेमाच्या जोरावर दाखविण्याचें अभिवचन त्याच क्षणीं तिला दिलें. दुसरा दिवस आला.

सर्वांचीं सर्व कामें झालीं. गरुडाची कुरापत काढावयाची त्याला आपलें पाणी दाखवावयाचें असें निश्चित ठरलेंच होतें. तें कसें हेंही कर्कोटकानें मनाशीं ठरविलें.

नेहमीं असें असें कीं, आश्रमांतलीं नित्याचीं कामें धामें झाल्यानंतर, आखाड्यांत प्रहरभर सर्वांनीं जमावयाचें. शरीरसंवर्धनाकरितां, कंटकपणाकरितां आखाड्यांत खूप शरीराला श्रम द्यावयाचे. ह्यांत गरुडाचा नेहमींचा पुढाकार असावयाचा. त्याच्या नेतृत्वाखालीं तें सर्व चालावयाचें. गरुड अशी शरीरमेहेनत करीच. तो योग तो अत्युत्तम प्रकारें चालवी व आपल्या बांधवांनाही तो चालविण्यास भाग पाडी. त्यामुळें गरुडाचा वचक सर्वांवर स्वाभाविक असे. आखाड्यांत गरुड बोलावील त्यावेळीं, बोलावील त्यानें आलेंच पाहिजे असें ठरूनच गेलेलें असे. ती गरुडाची आज्ञा कोणी अमान्य करावयाची नाहीं. गरुड स्वतःच्या योगसाधनाकरितांही बांधवांना पुष्कळवेळां बोलावी, व सर्वजण येत. हें झाल्यावर मग जो तो आपापल्या उद्योगाला, विश्रांतीला वगैरे जाई. आखाड्यांत आपण नेहमींपेक्षां अगोदर जावयाचें व आपणच गरुडाला बोलवावयाचें किंवा आपण नेहमींपेक्षां उशीरा जावयाचें व गरुडाचें ऐकावयाचें नाहीं, गरुडाला आपली लहर संभाळावयाला लावावयाची, असें कर्कोटकानें निश्चित केलें होतें. कसेंही केलें तरी आपला इच्छित हेतु पार पडणारच! आपलें तेज गरुडाला दिसणार! गरुड दिपून जाणार! आपलें शौर्य त्या रूपवतीला दिसणार आणि आपली सत्ता जाहीर होणार! हें ठरलेलेंच असें कर्कोटकाला सुखस्वप्न अगोदरपासूनच पडूं लागलें!

आणि निश्चिय केल्याप्रमाणें कर्कोटकानें त्या दिवशीं खरोखरच केलें. त्या प्रसंगीं त्या रूपवती स्त्रीनें कर्कोटकादिकांचा पराक्रम पहावयाला यावयाचें मुद्दाम ठरविलें होतें. ती त्या शौर्याच्या मूर्तीवरून प्रेमाचीं पुष्पें उधळणार होती. वेळ आली, गरुड आखाड्यांत कितीवेळ तरी एकटाच होता. त्यानें आपल्या बांधवांची फार वाट पाहिली. त्याला इकडची कसलीही कल्पनाच नव्हती. आंत–काय शिजत होतें–शिजलें होतें, याची

## प्रकरण सहावें

गरुडाला दादही नव्हती. त्यामुळें कर्कोटक बंधूसहवर्तमान आखाडयांत उशीरां आला तेव्हां गरुड त्यांच्यावर उशीरां आल्याबद्दल रागावला. त्यांनीं कोणी गरुडाकडे लक्षच दिलें नाहीं. त्याच्याशीं मुळींच न बोलतांच आखाडयांतल्या कार्यक्रमाला आरंभ केला. हा गरुडाचा उघड उघड अपमान होता. गरुडाला त्यांच्या वर्तनाचें अत्यंत चमत्कारिक वाटलें—चीड आली. संतापला, ताड्कन तो कर्कोटकापुढें जाऊन उभा राहिला. त्याचे दोन बाहू धरून गदगद त्याला हलवीत त्यानें विचित्र वागण्याचा खुलासा विचारला. कर्कोटक प्रथम घाबरला खरा. पण पुन्हां सांवरला. गरुडापासून दूर होऊन त्याच्या डोळयाला डोळा भिडवीत धीटपणानें म्हणालाः—

"गरुडा, तूं कोण आम्हांला विचारणार?"

"आम्हीं तुझंच ऐकावं तें काय म्हणून?" दुसरा अवसान धरून म्हणाला.

"तुझीच आज्ञा आम्हीं मानावयाची काय म्हणून?" तिसरा उद्गारला.

"आमच्या लहरीप्रमाणें तूं कां वागूं नयेस?" चवथा म्हणाला.

याप्रमाणें प्रश्नांचा अनपेक्षित मारा गरुडावर झाला. गरुडाच्या हृदयावर तीक्ष्ण शरांचा वर्षाव होतो आहे, कानांत तप्त लोहरस ओतला जात आहे, मस्तकावर आकाश कोसळत आहे असें गरुडाला वाटलें! त्याचें मस्तक बधीर झालें। बंधुप्रेमाचा भडका उडाला. नात्यागोत्याचा लय झाला. निसर्गानें आपलीं बंधनें ताड्ताड् तोडलीं असें गरुडाला झालें. त्यानें दोन्हीं हातांनीं आपलें मस्तक दाबून धरलें. आपल्या मस्तकाच्या चिंधडया उडताहेत कीं काय, असें होऊन गेलें. त्याच स्थितींत गरुड असतां, त्याला बोलावयाची संधि न देतां कर्कोटक आपली छाती पुढें काढून दिमाखानें म्हणालाः—"ऐकलेंस गरुडा, इतउत्तर तूं आम्हांस कोणाला कोणत्याही प्रकारची आज्ञा करतां नये. कोणत्याही प्रकारचा दाब आमच्यावर असतां नये. उलट आमच्याच आज्ञा तुला ऐकल्या पाहिजेत. आमचाच दाब तुला मान्य केला पाहिजे!"

पुन्हां गरुडावर अमीवर्षाव झाला! त्याला चेव आला. तिरमिरीसरशीं तो त्यांच्या अंगावर धावला. सर्वांची गाळण उडाली. कर्कोटक दोन पावलें मागें झाला. क्षणभरच तेथून सर्वांसह पळ काढावा असें वाटलें. इतक्यांत दूर उभी राहून ती सुन्दर युवति आपल्याकडे आशेनें पहाते आहे असें त्याच्या ध्यानीं आलें. पुन्हां त्याला अवसान आलें. तितक्याच त्वेषानें तो गरुडाला म्हणालाः—"हां! हां! गरुडा हात आटोप! परवांच एक अपराध आम्हीं सहन केला आहे. कांहींच्या श्रीमुखांत तूं भडकावल्या आहेस. तें आम्ही विसरलों नाहीं. पण आतां सहन करणार नाहीं. असा अत्याचार करण्यापूर्वी तूं आपल्या आईला जाऊन विचार, कीं दासांना धन्यावर हात उगारण्याचा अधिकार असतो काय?"

गरुडाचा हात वरच्यावर थांबला! तो जागच्या जागीं खिळला. कर्कोटकानें कोणते भलभलते शब्द त्याला ऐकविले? त्याला कालचक्र उलटगतीनें फिरत आहे असें खास वाटलें! तो स्तब्धच होता. कोणतेच शब्द त्याच्या मुखांतून बाहेर येणें दुर्घट होतें! तो तारवटलेल्या डोळ्यांनीं कर्कोटकाकडे व त्याच्या बंधुजनाकडे पहात होता! कर्कोटकच त्याला पुढें म्हणाला:—"गरुडा, असा भांबावून जाऊं नकोस! तुझी आई आमच्या आईची आपखुषीनें दासी झाली आहे. त्या नात्यानं तुम्हीं आमचे दासच आहांत! तुझं आमचं बंधुभावाचं नातं राहिलेलं नसून धनी आणि चाकर असं नवं नातं निर्माण झालेलं आहे. त्याला अनुसरूनच आपणांला इतउत्तर वर्तन केलं पाहिजे. हें असत्य असेल, तर असाच्या असाच आईकडे जा. तिला विचार आणि मग तुला वागावयाचं असेल तसा तूं वाग!"

या कर्कोटकाच्या बोलण्यानें गरुड थिजला. त्याचा तेजोभंग झाला. आपल्या मानसिक शक्तीवर, आपल्या स्वातंत्र्याच्या पुण्याईवर हा अशनिपातच झाल्याचें त्यानें ऐकलें! त्यानंतर गरुड उभाच राहिला नाहीं. एक अक्षरही न उच्चारतां तो तेथून तडक चालता झाला!

कर्कोटकाच्या धैर्याचा, शौर्याचा, त्याच्या बंधूंनीं एकच जयजयकार केला! त्या रूपवतीनें मनोहारी हास्य केलें. स्वागताची मांला स्वकरांनीं

त्याच्या गळ्यांत घातली ! कर्कोदकादि सर्वांना त्या वेळीं खरें खरें समाधान वाटलें. आज आपण खरे सत्ताधारी झालों—खरा सत्तेचा उपभोग घेण्यास आरंभ केला ! पण इकडे त्याच वेळीं नसानसांतून अंगार उडालेल्या गरुडाची अवस्था काय होती ? तो कोठें गेला होता ? त्याला काय विचार करावा लागत होता ? तो कोणाला काय विचारणार होता ? ती वेळ भरमध्यान्ह्रींची असतांना अमावास्येचा काळोख सभोंवार पसरला असावा, माध्यान्ह्रींच्या सूर्यनारायणाला खग्रास ग्रहण लागलें असावें, अशा सारखें गरुडाला भासत होतें ! विचाराविचारांचे त्याच्या मस्तकांत कढावर कढ येत होते. स्वातंत्र्यसूर्याला कर्कोटकाचे शब्द कसे सहन व्हावेत ? पण परदास्याचे—त्याच्या मातेच्या परदास्याचे-तिच्या खुषीनें पत्करलेल्या दास्याचे शब्द कर्कोटकानें त्याला ऐकविले ते सत्य कीं असत्य त्याचा पडताळा घेईपर्यंत गरुडाला सहन करणें भाग होतें !

गरुड त्वेषानें, तडफडीनें, सर्वांचा भडका उडाला असतां आपल्या आईला भेटायला निघाला. त्याला समोरच विनतामाता येतांना दिसली. परंतु ती कशी ?—

डोकीवर एकावर एक असे तीनचार पाण्याचे घट आहेत. एका कमरेवर आणखी एक घट आहे. खांद्यावर घरादाराचीं धुतलेल्या वस्त्रांचीं ओझीं आहे. दुसऱ्या हातांत एक भरलेला कलश आहे. सर्वांगांतून—तोंडावरून घामाचे लोट चालले आहेत. खालीं तापलेली वाळू पायाला एकसारखे चटके देत आहे ! अशी सति विनता समोरून येत आहे. उभयता मातापुत्रांनीं परस्परांस पाहिलें. त्या क्षणीं परस्परांना काय वाटलें ? त्यांच्या जिवाचें काय झालें असेल ?



# प्रकरण सातवें

–' आई, बोल ग बोल, तूं सांग, मला तुझ्याकडून कळूं दे. मी देवाला जाऊन विचारतों. धर्माला, न्यायाला, नीतीला–तूं सांगशील त्याच्यापुढें जाऊन उभा ठाकून त्यांना गदगद हालवून विचारतों कीं बोला, माझ्या आईच्या पायांत पारतंत्र्याच्या शृंखला कां घातल्या आहेत ?'–

–' दुर्दैव देवावरही प्रभाव चालविते काय ?' असा प्रश्न त्यानें आपल्या मनाला केला. ' होय !' असें उत्तर त्याच्या कानीं कोणी तरी दिलें !

–परदास्य म्हणजे जिवंत मृत्यू होय असें तर त्या मायलेकरांच्या मनांत त्या वेळीं येत नसेल ? तो जिवंत मृत्यू आपण भोगतो आहोंत ही जाणीव त्यांना कोणत्या भयंकर यातना देत असेल ?–

" आई !"

" बाळ !"

" आई—!"

" समजलं ना तुला शेवटीं ? दुर्दैवानें इतक्यांत हाही दावा साधला का ?"

" आई, हें कसं झालं ? कुणी केलं ? कां केलं ? मला इतकें दिवस कां कळविलं नाहींस ?"

" काय सांगूं बाळ ! काय देऊं उत्तर ? बाळ, हें झालं नाहीं, केलं आहे ! हें आपल्या पूर्वजन्मींच्या प्रारब्धानें केलं ! अशी आपल्याला दशा आपल्या संचितानं आणली आहे ! बाळ, तूं विचारतोस की इतके दिवस कां कळविलं नाहींस ? पण बाळ, कोणत्या तोंडानं कसं सांगायचं होतं ? आई आपल्या बाळांना दुःखांत, हालांत कष्टांत आपण होऊन लोटायला कशी तयार होईल ? हरिणी आपल्या पाडसाला आपण होऊन व्याधाच्या बाणाच्या टप्पांत कशी सोडून देईल ? वाटेल तो त्रास आई आपल्या बाळाकरितां घेत असते. पक्षीण आपल्या मायेच्या पंखाखालीं आपल्या पिलांना स्वतः ऊन्ह, पाऊस, थंडी यांचा त्रास सोसून–झांकून ठेवीत असते. तेंच मी–या तुझ्या गरीब आईनं केलं होतं ! माझं दुःख मी सहन करावयाचं, त्याची झळ तुम्हांला लागूं द्यावयाची नाहीं. तुम्हांला पारतंत्र्याची

शृंखला आपल्या आईच्या पायांत अडकली आहे हें जाणवूं द्यावयाचें नाहीं, असा माझा कृतसंकल्प होता—पण दैवानं तोही दावा असा साधला. बाळ, मी कितीही दुःखी असलें, कितीही पारतंत्र्यांत अडकलें तरी माझ्या बाळानीं मनानं सुद्धां तें दुःख सोसूं नये, माझ्या बाळांनीं सदैव आनंदांत, जोमांत वाढावं, अशी माझी खरीखुरी इच्छा. माझीं बाळें आनंदांत असलीं म्हणजे मी दुःखांत असल्याचें कांहीं वाटणार नाहीं !—"

"आई, आई, काय म्हणतेस हें ? काय बोलतेस हें ? काय उद्गारतेस हें ? आमची आई दुःखांत—हालांत—परदास्यांत आणि आम्हीं तिचीं—मुलं—आनंदांत, सौख्यांत, समाधानांत असणार ? असावं म्हणतेस ? हें कसं होईल ? आई परदास्यांत खितपत असतांना, आई आपल्या त्या दुःखाचे घुटके घेत असतांना, आई आपल्या नेत्रांतल्या अश्रूबरोबर भाकरीचा तुकडा पोटांत कसाबसा ढकलीत असतांना, आम्हीं मोत्यांचा चारा खात असायचें ? वैभवांत विहार करायचा ? इतस्ततः जगांत तोऱ्यानं हिंडावयाचें ? आई, आई, असं कसं होईल ? असं कसं आम्हीं करूं ? आई दुःखांत पाहून ज्यांना सुखाची निद्रा येते, आई दुःखानें पारतंत्र्यांत संतत अश्रूप्रवाह वाहवीत असतांना वैभवांत स्वतः राहण्याची हौस वाटते, तीं आम्हीं मुलं तरी कसलीं ? आणि त्यांचा आनंद—वैभव तरी कसलं ? परदास्याचे फटके आईच्या पाठीवर सतत बसत असतांना त्याकडे दुर्लक्ष करून मुलांना सातस्वर्गींचं सौख्य पायाशीं लोळण घेत आलं, तरी तें काय होय ! तें सौख्य लाथेनं झुगारून दिलं नाहीं, अगोदर आईच्या सौख्याची चिंता वाहिली नाहीं, तर तीं मुलं तरी कसलीं ? आई तुझ्या उदरीं जन्म घेतां क्षणीं उगवत्या सूर्यावर झडप घालून त्याचा खेळायला कंदूक करूं इच्छिणारा हा तुझा बळिवंत मुलगा अशी कल्पांति इच्छा करील, असें तुला वाटलं तरी कसं ? आई—"

"बाळ, मी तसं कसं म्हणेन ? तुझ्यासारखा बळिवंत बाळ माझ्या उदरीं जन्माला आला म्हणूनच मी भाग्याची आहे. त्याच भाग्याच्या बळावर बहिणीचं—सवतीचं दास्य करीत असतें. सहन करीत असतें.

आज, उद्यां, परवां, आयुष्यांत केव्हांना केव्हां तरी माझी बळीवंत बाळंच माझ्या पारतंत्र्याच्या नरकयातना चुकवतील. त्यांतून मुक्त करतील, अशी खात्री वाटते म्हणून दास्याचा उजाडला दिवस मावळतो ! मी दुःखांत असलें तरी माझ्या बाळांनीं सुखांत असलं पाहिजे म्हणतें तें देखील तेवढ्याचसाठीं ! मी काय म्हणाले तें तुला समजलं नाहीं—"

"क्षमा कर आई ! खरोखरच तूं काय म्हणालीस तें मला समजलं नाहीं ! मी नव्या परिस्थितींत भांबावून गेलों आहें ! गोंधळून गेलों आहें ! माझ्या अंगांतल्या अजस्रशक्तीचा प्रयासानं कोंडमारा करावा लागत असल्यामुळें मला काय बोलावं हें सुचेनासं झालं आहे ! माझ्या आईवर परदास्याची पाळी आली ! माझ्या आईसारख्या महासतीच्या पायांत पारतंत्र्याची शृंखला ! हें मी कसं पाहूं ? कसं सहन करूं ? मनाला, बुद्धीला, शक्तीला कसा आवर घालूं ? आई, तुझ्यासारख्या महासतीच्या हातून असा कोणता अपराध कीं, त्यामुळें तुला पारतंत्र्य स्वीकारावं लागावं ? देवादारीं तुझ्या हातून असं कोणतं पाप झालं कीं, त्याचा मोबदला म्हणून देवानं तुझ्यावर ही आपत्ति आणावी ? धर्माची, नीतीची, पुण्याईची तुझ्याकडून कधीं स्वप्नांत तरी पायमल्ली झाली आहे काय ? कीं म्हणून जित्याचं जिणं तुझ्या कपाळी यावं ? आई, बोल ग बोल. तूं सांग. मला तुझ्याकडून कळूं दे. मी देवाला जाऊन विचारतों, धर्माला, नीतीला, न्यायाला, तूं सांगशील त्याच्या पुढें जाऊन उभा ठाकून, त्यांना गदगद हलवून विचारतों कीं, बोला, माझ्या आईच्या पायांत पारतंत्र्याच्या शृंखला कां घातल्यात ?"

"बाळ, देवाला बोल नाहीं. धर्माला शब्द नाहीं. नीती बिचारीकडे कांहीं नाहीं ! मी तुला सांगितलं ना, कीं हा आपल्या दुर्दैवाचा खेळ आहे. दुर्दैवाच्या लीला आहेत म्हणून ! आम्हीं दुर्दैवाच्या आधीन झालों आहोंत. आतां तें वागवील तसं वागलं पाहिजे, तें नाचवील तसं नाचलं पाहिजे !"

## प्रकरण सातवें

विनता हुंदके देत होती. बोलत होती! गरुड समोर बसून ऐकत होता, त्याच्या डोळ्यांतून अश्रू गळत होते! आईचे शोकावेग वरचेवर येत होते! गरुडाची अश्रूंची संततधार खळत नव्हती!

सभोंवारच्या वृक्षावरून टपटपटप पानें गळत होतीं, वेलीपासून फुलें सुटून भूमीवर पडून सडा करीत होतीं! विनतेवरील आणि गरुडावरील तो दारुण करुण प्रसंग पाहून वृक्ष अश्रू ढाळीत होते काय? वेली फुलांच्या रूपानें आपल्या अश्रूंनीं भूमीला शांत करीत होत्या काय? पक्षी किलबिल करीत होते. गाईवासरें हंबरत होतीं. आश्रमावर त्या शोकाचीच कळा पसरली होती!

आतां कुणी कोणाला समजावून सांगायचें? कुणी कुणाचें सांत्वन करावयाचें? काय सांगून सांत्वन करावयाचें? उभ्या आश्रमाला पहिली प्रेमाची सत्ता हवी होती. आतांची सत्तेची सत्ता नको होती! मग त्यावर शोकाची कळा कां दिसणार नाहीं? विनतेला समजलें कीं, आजवर आपण गुपित ठेवलेलें गरुडाला कळलें. गरुडालाही समजून आलें कीं आपली आई परतंत्र झाली. तें कळणें, त्याची जाणीव होणें म्हणजे हृद्रोग लागणें, त्या रोगानें जीव कुरतडून खायला—त्याच्या शक्तीचा ऱ्हास करावयाला प्रारंभ करणें होय! विनतेच्या काय किंवा गरुडाच्या बाबतींत काय तो खरा प्रारंभ आतां झाला! ती वाईटांतली वाईट वेळ होती. दुर्दिनांतला तो दुर्दिन होता!

आकाश मेघांनीं व्याप्त झालें. सहस्ररश्मी मेघाआड झाला! मायलेकरांची ती दारुण स्थिति सहस्ररश्मीला पहावत नव्हती काय?

वृक्षवेलींच्या दाटींतून वारा स्वैर वाहात असतां अडखळत होता, घोंघावत होता, तें त्याचें घोंघावणें देखील रडकें ऐकावयाला येत होतें! आश्रमाशेजारच्या सरितेचें खळखळणें आज आनंदी वृत्तीचें गाणें नसून विनतागरुडाची दुःखाची भेट पहात असतां शोकाचें रडगाणें होतें!

आश्रमांतली समता केव्हांच नाश पावली होती. प्रेमळ शांतता कधींच

ळयाला गेली होती! सलोख्याची, जिव्हाळयाची, आपुलकीचा पूर्वीच संपूर्ण नाश झाला होता. आतां राहिलें होतें काय?

कद्रू आणि कद्रूचीं मुलें यांचा राक्षसी आनंद!

विनता आणि विनतेचीं मुलें यांच्या नशीबींचें खडतर दास्य!

विनतेनें आपल्या दुर्दैवाकडे बोट दाखविलें. गरुडाला तें खपलें नाहीं. त्याच्या संतापानें फिरून उसळी घेतली. परदास्याची नुसती कल्पनाही क्षणाक्षणाला सहन होत नव्हती! तो कसलेंही बंधन ताड्ताड् तोडायला तयार होता! आपण बंधनांत, आपली आई बंधनांत! हें काय आहे? बरें त्याला कारण कोणतर दुर्दैव! देव नाहीं, धर्म नाहीं नीति नाहीं कीं कांहीं नाहीं! मग ते गरुडाला सहन कसें व्हावें? परंतु करणार काय? आईच्या नेत्रांतले अश्रू त्याला तें सहन करावयाला भाग पाडीत होते!

गरुड मध्येंच किती वेळ स्तब्ध राहिला! विनता खालीं मान घालून अश्रु गाळीत होती! परदास्याची भयानक कल्पना त्याच्या पुढें उभी राहिली! आपल्या सावत्र आईनें काय काय पराक्रम केला आहे; तिची मुलें इतकी अरेराव कां व कशी झालीं, शब्दांत अडवून, वचनांत पकडून त्याचा पुरेपूर फायदा आपल्या सावत्र आईनें कसा घेतला आहे, याचीं चित्रें गरुडाच्या नजरापुढें स्पष्ट अशीं येऊं लागलीं आणि मग आपली आई 'दुर्दैव दुर्दैव' कां म्हणते, प्रारब्धाकडेच कां बेट दाखविते, संचिताचाच, उच्चार पुन्हां पुन्हां कां करते, याचा उलगडा हलके हलके होऊं लागला! ते विचार येत असतां, समोर बसून अश्रू ढाळणारी आपली आई दिसत असतां गरुडाला आपल्या अचाट शक्तीला आंतून ओढ लागत आहे, आपल्या शक्तीचे लचके कुणी तरी अदृश्यपणानें तोडीत आहे असें वाटूं लागलें. गरुड हदरून गेला!

एवढा वीरपुंगव, एवढा पराक्रमी, एवढा श्रेष्ठांतला श्रेष्ठ एवढा खगेंद्र, पण याक्षणीं अगदीं अगतीक झाला! दुर्दैवानें नाडला. करणार काय?

गरुड कर्तव्यतत्पर, मातृभक्त, बुद्धीशक्तीचा सागर खरा. परंतु दुर्दैवानें त्याला पुरतें कोंडींत पकडलें. तो देवाला विचारायला तयार, धर्माला–

नीतीला खडखविण्यास सज्ज. पण त्यानें दुर्दैवापुढें हात जोडले! दुर्दैव देवावरही प्रभाव चालविते काय? असा प्रश्न त्यानें आपल्या मनाला केला! 'होय' असें उत्तर त्याच्या कानीं कोणी तरी दिलें!

आतां गरुडानें विनतेशीं काय बोलावयाचें? विनतेनें तरी गरुडाला कोणते शब्द ऐकवावयाचे? गरुड कांहीही बोलला तरी विनतेच्या नेत्रांतल्या अश्रूंचा पूर वाढत जात असे. विनतेनें कोणताही शब्द सांगितला, तर दुर्दैवाचें जाळें गरुडाभोंवतीं अधिकच गुंडाळत जाई. असा प्राप्त प्रसंग बिनतोड होता! तरी मनाला राहवणार कुठून? स्वस्थ बसणार कसें?

"आई, कद्रूमाता तुझी बहीण ना? गरुडानें मध्येंच विनतेला विचारलें.

"पण सवतही आहे! उत्तर मिळालें.

"ह्या दोनही नात्यांना तिनें कस्पटासारखें कां लेखलं?

"तें तिलाच माहित!

"त्या दोनही प्रेमळ नात्यापेक्षां कद्रूमाईला राक्षसी सत्ता आपल्यावर गाजवावी अशी बुद्धि कोठून सुचली?

"तेंही तिलाच माहीत!"

"आई, ज्या पणानें तूं जिंकली गेलीस, तोच पण तूं जिंकला असतास तर तूं कद्रूमाईशीं अशीच वागली असतीस का?"

"मी याचें कोणतेंही उत्तर दिलें तरी त्याचा उपयोग काय आहे?"

"आई, आपणांपैकीं कोणाच्याही हातून कद्रूमातेचा कांहीं कधीं लहानमोठा अपराध झाला आहे का? आपण तिला कधीं दुखवलं आहे का? कळून न कळून कद्रूमाता आपल्यावर चिडेल आणि त्याबद्दल आपला सूड घेण्याकरितां म्हणून आजची वेळ आपल्यावर आणील, असें कधीं आपल्या हातून झालें आहे का?"

"मला तर आठवत नाहीं!"

"आमच्यामध्यें आणि कद्रूमाईच्या मुलांमध्यें वागवितांना कधींकाळीं भेदभाव दाखविला होतास का? तसें कधीं मनांत तरी आणलें होतेंस का?"

" कधीं रे ? बाळ, मी असें मनांत तरी कसें आणीन ? "

" मायेंत कधीं अंतर केलं होतंस ? "

" याला ईश्वरच साक्ष ! " विनतेच्या डोळ्यांत हें म्हणतांना पुन्हां अश्रूंचा पूर लोटला !

" मग कद्रूमाईनं असं कां करावं ? " गरुडाची विचारमालिका फिरून मूळपदावर आली. तो आपल्याशींच अर्धवट उद्गारला.

" आपल्या दुर्दैवाशिवाय दुसरें कोणतेंच त्याला उत्तर नाहीं ! " विनता उत्तरली.

मायलेकरांमधील संभाषण फिरून थंडावलें.

हें त्यांचें भाषण ज्या ठिकाणीं, ज्या वेळीं चाललें होतें; त्या ठिकाणीं प्रथम प्रथम त्या मायलेकरांशिवाय दुसरें कोणीही नव्हतें. बोलण्याच्या–रडण्याच्या–हृदयें हलकीं करण्याच्या स्थितींत त्या मायलेकरांचा काळ त्या ठिकाणीं किती गेला होता, त्याची त्यांना कल्पनाच नव्हती. दुःखाचा, शोकाचा काल अत्यंत कंटाळवाणा जात असतो. थोडाकाळ जाऊनही युगचेयुग मध्यें गेलें कीं काय असें वाटत असतें. विनतेची आणि गरुडाची त्या वेळीं मनःस्थिति कशी होती हें सांगतां येणें कठीण आहे. एवढें खरें कीं तीं मायलेकरें बोलत असतां, रडत असतां, हृदयें हलकीं करून घेत असतां, भावी कालांतले कठोर आघात सहन करण्याची मनाची तयारी करीत असतां तीं दोघेही सभोंवारच्या जगाला पार विसरून गेलीं होतीं. आपलें भाषण कोणी ऐकत आहे काय ? आपलें रडणें पाहून दुःखभरानें हृदय भडभडून येऊन कोणी आपल्याबरोबर रडूं लागत आहे कीं, आपल्या दुःखानें कोणाला आनंद होत आहे ? किंवा मायलेकरांच्या भेटींत बिघाड आणण्याकरितां कोणी मध्येंच लुडबुडत होतें कीं काय ? यांपैकीं कशाचीही दाद त्या मायलेकरांना नव्हती ! आपल्यावर कोसळलेल्या प्रसंगाचाच तेवढा विचार व त्याबद्दल हृदयाला होणाऱ्या दारुण यातना एवढेंच त्यांना ज्ञान होतें ! मग इतर विषयांकडे त्यांचें लक्ष जाणार कुठून ?

## प्रकरण सातवें

परंतु याच वेळीं त्यांच्या पाठीशीं लागलेलें नव्या दमाचें दुर्दैव त्यांना कष्ट देण्याचा नवा डाव रचीत होतें. ठेंचाळून जखमी झालेल्या जागेवरच कितीही जपलें तरी हटकून आणखी ठेंच लागतें आणि पहिल्या वेदना उलट दुप्पट जोरानें वाढतात ! अशा तऱ्हेचे डाव खेळण्याची व घायाळ झालेल्यास अधिक घायाळ करण्याची दुर्दैवाची रीतच असते.

विनता व गरुड बोलत असतां कद्रूच्या मुलांना जें एक नवें रत्न प्राप्त झालें होतें—तें रत्न—ती कुटिलकारस्थानी कुलटा कद्रूच्या एकदोन मुलांना बरोबर घेऊन त्या बाजूलाच हिंडत होती. तिनें तें मायलेकरांचें दृश्य पाहिलें. लगेच तिची तरल बुद्धि काम करूं लागली. तिनें आपल्या बरोबर असणाऱ्या कद्रूच्या मुलांना तें दृश्य मुद्दाम दाखविलें आणि "तीं दोघें आपल्याविरुद्ध बोलत बसलीं आहेत. आपल्याविरुद्ध कारस्थान रचीत आहेत. आपल्याविरुद्ध कसला तरी डाव करीत आहेत" असें खुशाल त्या अगोदरच विषारी असलेल्या प्राण्यांत कानांत आणखी आपल्या कल्पनेचें गरळ ओकलें. "याचा प्रतिकार जर आपण केला नाहीं, हे प्रकार जर असेच चालूं दिले, असल्या प्रकाराबद्दल वेळच्यावेळींच शासन जर केलें नाहीं, तर आपल्या सत्तेवर हें केव्हां गदा आणतील याचा मुळींच नेम नाहीं. तेव्हां पहा. या कारस्थानाचा पाडाव तात्काळ होऊं द्या. सत्ताधाऱ्यांनीं आपल्या हातीं—आलेली सत्ता आपल्या हातींच अबाधीत रहाण्याकरितां डोळ्यांत तेल घालून जपावं लागतं हें ध्यानांत धरा म्हणजे मला अधिक सांगण्याची जरुरी नाहीं."

याप्रमाणें जें जें तिच्या मनांत आलें तें तें तिनें कद्रूच्या मुलांना सांगून टाकलें. आग पेटविली. ती एकेक—दोघे दोघे असे त्या ठिकाणीं मुद्दाम घेऊन येई. तें दृश्य दाखवी, आणि कोणाला कळवळून घाबरून, कोणाला रुसल्यासारखें दाखवून, कोणाला चढवून,तर कोणाला रागावून आणि कोणा-कोणाला चिडवूनही ती आपला तो आशय सांगत सुटली होती. तिचा मुख्य उद्योगच तो !

इतकें जरी त्या मायावी स्त्रीनें त्या सर्प मंडळींना पढविलें, त्यांच्या

विषाला आणखी विषाचीं पुटें दिलीं, तरी त्यांची बुद्धि मठच ! त्या विषाचा पुढें उपयोग काय करावयाचा हे त्यांना काय माहित? ज्यांना ज्यांना तें दृश्य दाखविलें, त्यांनीं त्यांनीं तें पाहिलें आणि स्वस्थच राहिले. त्या बाबतींत तिनें फक्त कर्कोटकाला वगळलें होतें व तें मुद्दाम वगळलें होतें. तिला या बाकीच्या मंडळींनाच दुष्टपणांत तरबेज करावयाचें होतें. कर्कोटक अगोदरच तसा तयार झालेला होता. ही मंडळी तयार करतांना तिला बराच त्रासही पडत होता. ती एकेकाला आणून तें दृश्य दाखवी व आपलें मनोगत सांगे, त्यावेळीं एक म्हणे—

" बसत ना का बोलत बसले आहेत तर ? आपल्याला काय त्याच्याशीं करायचें आहे ? "

दुसरा म्हणे–"रडताहेत वाटतं दोघेही. ठीक आहे, रडूं देत त्यांना मनमुराद ! "

तिसरा सांगे, " लाडके, तुला हे भलते उपद्व्याप पाहिजेत बघ ! आपल्याला त्यांच्याशीं कांहींही कर्तव्य नाहीं. त्यांना हंसूं देत, नाहीं तर रडूं देत ! आपण आपली हौसमौज करूं या. हंसूं या खेळूं या, बसूं या बोलूं या. अगदीं आनंदीआनंद करूं या ! त्या रडव्या मंडळीकडे बघून काय करायचं आहे ?"

तर चवथा शहाणा आपलें शहाणपण पाघळला, "अरेरे! काय बिचाऱ्यांची शोचनीय अवस्था ही ! गरुडासारख्या गरुडानें रडावें. आम्हीं ज्याला भ्यावें, ज्याला पाहून आमचा थरकांप व्हायचा, त्या गरुडाच्या नेत्रांत स्त्रियांप्रमाणें अश्रु पाहून आमच्या डोळ्यांत अश्रू उभे राहातात ! प्रिये, आमच्या गरुडाची ही दुःखावस्था आमच्या दृष्टिआड कर ! " असें म्हणत एक सर्प खरोखरीच रडायला लागे.

त्या सर्वांना ताळ्यावर आणून एकामाळेचे मणी करण्याचें काम ती सुन्दरकुलटा आपलें परम कर्तव्य म्हणून करी, ती त्या सर्वांच्या बाष्कळ बडबडीला एकच उत्तर देई. " ते आज रडत असतील–रडताहेत, पण त्याकडे तुम्हीं दुर्लक्ष केलें तर त्यांची आजची स्थिति उद्यां तुम्हांला प्राप्त

होईल. त्यांना शिरजोर होण्याची संधि आपण दिली तर आपली अवस्था कठीण झाल्यावांचून राहणार नाहीं. मग आपल्या नशीबीं कसल्या हौसा-मौजा, कुठलं हंसायचं खेळायचं ? कुठें बसायचं बोलायचं ?" या प्रमाणें ती बोले. धाक दाखवी. आपलें ऐकलें नाहीं तर आपण सोडून चालत्या होऊं असें म्हणे. मग त्या सर्वांचा नाइलाज होई व तिचें ऐकावयाला सर्व-जण तयार होत ! तें दृश्य पुष्कळांनीं पाहिलें खरें, पण त्याचें पुढें काय ?

ती सौंदर्यपुतळी जेव्हां त्यांच्यावर रागावली, तेव्हां तिची मर्जी सुप्रसन्न रहावी म्हणून त्या सर्वांनीं विचारलें—

"मग या दृश्याचें आतां आम्हीं पुढें काय करावें म्हणतेस ?"

"तुझी आज्ञा होईल तसं आम्हीं खास करूं !"

"कारण आम्हीं सत्ताधारी आहोंत !"

"आणि सत्ता कशी गाजवावी हें तूं आम्हांला सक्रिय शिकवती आहेस !"

"या करितां आम्हीं तुझी आज्ञा शिरसामान्य केलीच पाहिजे !"

"तर बोल !——"

सर्व मंडळी अशी अंकित झालेली पाहून त्या रूपवतीला फार फार आनंद होई. ती विकट हास्य करी ! आपल्याला हवें तें मिळालें आहे. ही मंडळी आपल्या भजनीं लागली आहेत. आपल्याशिवाय आतां त्यांना चैन पडत नाहीं किंवा क्षणभर वियोग सहन होत नाहीं. जगावर त्यांची सत्ता, त्यांच्यावर माझी सत्ता ! म्हणजे मीच या जगाची सम्राज्ञी म्हणा-वयाला कोणती हरकत आहे ? असे विचार तिला फार सुखवीत. ती आपलें सम्राज्ञीपद कायम टिकावयाला रोज नव्यानव्या युक्त्या योजी. रोज त्या मंडळींला नवा छंद लावी आणि त्यांना सदैव कसल्या ना कसल्या तरी आपल्याच नादांत गुरफटून ठेवी ! तिची सर्व मंडळीवरची पकड आतां अधिक अधिक जबरदस्त बसत चालली होती. तिच्या करड्या आज्ञेचें उल्लंघन करण्याची कोणाचीही प्राज्ञा नव्हती !

तिनें सांगितलें आणि त्यांनीं मुकाट्यानें ऐकलें. तिनें हंसून त्यांच्या कानाशीं लागून काय सांगितलें होतें कोण जाणें! तिच्या सांगण्यावर त्यांचा प्रथम भरंवसा बसेना! पुढें काय होईल याचा अंदाज त्यांना कळेना. ते साशंक झाले. पण तिनें ठासून सांगितलें. " माझ्या सांगण्याचा परिणाम इटकून असाच होईल. चमत्कार तर पहा! नाहीं झाला तर तुम्ही सांगाल तें मी ऐकेन. नाहीं तर दुसरी क्लृप्ति काढूं!"

त्यानंतर तिच्यापुढें कोण बोलणार? तिनें दिलेला कानमंत्र तात्काळच उपयोगांत यावयाला पाहिजे होता. तरच त्या मंत्रपठणाची फलश्रुति पहावयाला मिळणार होती. म्हणूनच त्यांनींही तितक्याच त्वरेनें मन्दाच्या जपास आरंभ केला!

विनता आणि गरुड अजूनही बसल्या ठिकाणींच होते! त्यांना उठावयाचें सुचत नव्हतें!

तीं दोघे बसलीं असतांना कद्रू आणि तिचीं कांहीं मुलें त्या ठिकाणीं एकदम आलीं. कद्रू एकाद्या चिडलेल्या वाघिणीप्रमाणें दिसत होती. ती एकसारखे संतापाचे फूत्कार काढीत होती. तिच्याकडे पहाणारास खचित असें वाटलें असतें कीं विनतेला खाऊं कीं गिळूं असें तिला होऊन गेलें असावें!

कद्रू जवळ आलेली पहातांच विनता उठून उभी राहिली. गरुडानेंही उठून आपल्या सावत्र मातेला वंदन केलें! गरुडाच्या अंतःकरणांत त्या वेळीं सागरींचा वडवाग्नी भडकलेला. पण त्याची बाह्य शांतता नगाधीशाप्रमाणें होती.

आपल्याला जवळ आलेले पाहिल्यावर खरा मान देण्यासाठीं उभी राहिलीं नसून, त्यांचे गुप्त बेत ऐकावयाला येऊं नयेत म्हणून बोलणें बंद करून तीं मायलेकरें जायला म्हणून उठलीं अशी कद्रूनें आपली समजूत करून घेतली. तिच्या अगोदरच्या रागांत अधिकच भर पडली! तिनें गरुडाकडे तिरस्काराचा एक दृष्टिपात फेकला आणि विनतेकडे तुच्छतेनें, अवहेलनेनें, संतापानें, अधिकारमदानें पाहिलें.

## प्रकरण सातवें

गरुडानें तिला केलेलें वंदन तिला मायावी वाटलें. तिला तें कसें सहन होणार? ती करकर दांत खात म्हणाली:—

"पुरे पुरे, हें मायावी नमस्कार-चमत्काराचें ढोंग! मलाही सारीं ढोंगं सोंगं समजतात! काय ग माई, इथं काय करीत होतां तुम्हीं?"

"कांहीं नाहीं!" विनतेनें साधें सरळ उत्तर दिलें!

"कांहीं नाहीं? कांहीं नाहीं असें कसें होईल? कांहीं करीत नव्हता तर एकमेकांकडे काय पहात बसला होता?" कद्रू विनतेच्या साध्या उत्तरानें उगीच चिडली व म्हणाली.

"आम्हीं बोलत होतों!"

"कां बोलत होतां?"

विनता नव्हे प्रत्यक्ष परमेश्वर झाला तरी सत्ताधाऱ्याच्या असल्या अडमुठ्या प्रश्नाला काय उत्तर देणार? विनता स्वस्थ राहिली. गरुडाच्यानें स्वस्थ राहावेना. तो उत्तर देण्यासाठीं म्हणाला—

"कद्रूमाई—"

"बस्स कर तुझा चोंबडेपणा!" गरुडाकडे डोळे वटारून अधिकाराच्या तोऱ्यांत कद्रूनें त्याला दाबलें. "तुला कोणी विचारलें नाहीं. ज्याला विचारलं, त्यानंच उत्तर दिलं पाहिजे. तुला विचारीन तेव्हां तूं उत्तर दे!" पुन्हां ती विनतेकडे वळली आणि तिनें विचारलें, "काय माई तुम्हीं बोलत होतां?"

"ताई, आम्हीं दोघें काय बोलणार?"

"तेंच तर मला ऐकायचं आहे! माई, तुझा साळसूदपणा आतां मला नको आहे! मला अधिक चिडविण्याच्या, भरीस पडूं नकोस! तुम्हीं काय बोलतां, काय विचारतां, काय काय कारस्थानं करतां, हें मला समजत नाहीं, असें समजूं नकोस!" मध्येंच आपल्या मुलांकडे कद्रू वळली आणि तिनें आपल्या मुलांना विचारलें, "काय रे, माई आणि गरुड इथं किती वेळपर्यंत बोलत आहेत?"

"दोन प्रहर तर सहज होऊन गेले असतील!" मुलांनीं सांगितलें.

" ऐक माई ! दोन दोन प्रहर बोलत बसणं म्हणजे काय ? माई, तूं कांहीं स्वतंत्र नाहींस ! तूं माझी दासी आहेस ! दासींना परवानगीशिवाय असं दोन दोन प्रहर बोलतां येत नसतं हें माहित नाहीं काय ? दोन प्रह-रांत जीं कामं पडून राहिलीं तीं कुणीं करायचीं ? तीं कामें आतां वेळेला कशीं व्हायचीं ? माई, हातचीं महत्त्वाचीं कामें टाकून, उगीच कुणी तरी दोन दोन प्रहर स्वस्थ बसत नसतं, त्यापेक्षां महत्त्वाचा विषय असल्या-शिवाय कोणी बोलायला वेळ काढीत नसतात, हें मला समजतं हें विसरूं नकोस ! माई, माझ्याविरुद्ध कारस्थानं रचित होतां हें खरें ना ?"

" मुळींच नाहीं ! माई, काय ही तुझी भलती शंका ? कारस्थानं ? तुझ्याविरुद्ध ? ताई, तुला अशी शंका तरी कशी आली ?"

" शंका कशाला ? माई, मला शंकेचं कारणच नाहीं !–माई, माझीं मुलं काय सांगतात तें ऐक. काय रे मुलांनो, या दोन प्रहरांत, या दोघांच्या बोलण्यांत माझं नांव निघालं होतं कीं नाहीं. माझं नांव घेत असतांना या दोघांचा राग अनावर होत होता कीं नाहीं ?"

" तें आम्हीं कितीदां तरी ऐकलं. किती वेळां तरी पाहिलें ! आम्हीं इतकें वेळां यांच्या जवळपास येऊन घिरट्या घातल्या तरी त्याची त्यांना दादही नव्हती !" कद्रूच्या मुलांनीं सांगितलें.

विनता तें ऐकून दिङ्मूढ झाली ! काय बोलणार ती यापुढें ? अर्थशून्य दृष्टीनें नुसती पहातच राहिली. ती स्वस्थ पाहिल्यावर कद्रूला अधिकच अवसान आलें.

" माई, दासी झाल्याबरोबर दासीचे गुणही तुझ्या आंगीं येऊं लागले का ? खोटं बोलणं, खोटं वागणं आतां अगदीं तुझ्या हातचा मळ असं तुला वाटूं लागलं का ?"

" कद्रूमाई, कद्रूमाई, माझ्या आईवर कसले भयंकर वृथा आरोप करते आहेस !–कद्रूमाई."

" बस्स कर ! गरुडा, मी तुला एकदां बजावलं आहे ! तुझा उर्मटपणा मला माहित आहे ! तुझी शक्तीची घमेंड मी जाणतें. आणि म्हणूनच

तुला बजावतें. आपली पायरी ओळखून वाग. माई, तूं आपल्या उर्मट मुलाला आपल्या पायरीची नीट जाणीव करून दिली नाहींस वाटतं ?"

एकाद्या यंत्राप्रमाणें विनतेनें गरुडाकडे पाहिलें. गरुड बोलतां बंद राहिला.

हीच संधि साधून याच वेळीं कद्रूच्या मुलांनीं कद्रूकडे गरुडाविरुद्ध तक्रार केली, "आई, गरुडानें आमच्या श्रीमुखांत उगाच भडकाविल्या!"

"निष्कारण आमचे कान उपटले!"

"गरुडानें आमचीं डोकीं झाडांच्या बुंध्यावर नेऊन हापटलीं!"

"खरें हें गरुडा?" कद्रूनें मुलांचा कैवार घेऊन गरुडाला विचारलें. तिचे डोळे ह्यावेळीं इंगळासारखें लालभडक झाले होते!

"होय, हे म्हणतात तें खरें आहे. पण—"

"पुरे! पुढें ऐकण्याची मला गरज नाहीं! माई, ऐक, तुझीं मुलं माझ्या मुलांना कसं वागवितात तें! माझ्या मुलांना असं वागवितां, माझ्याविरुद्ध कारस्थानं करतां, आणि मीच उलट वाईट अं! दासीपणांत वागण्याची हीच रीत वाटतं! माई, मी पुष्कळ मनाशीं ठरविलं कीं माईला दासीसारखं वागवायाचं नाहीं. दासीपणा तिला जाणवूं द्यावयाचा नाहीं. होतां होईल तितकें अगदीं पहिल्या नात्याच्याच प्रेमानं वागायचं! पण मी तसं वागवावं असं तुम्हांला वाटतच नाहीं मुळीं! तसं वाटत असतं तर तुम्ही असें कां वागतां? नीट रीतीनं वागलं म्हणजे दास्यांत सुद्धां सुख असतं, हें मीच सांगायला हवं असं नाहीं. तसं नीट असणं तुम्हांला आवडायचं नाहीं. पटायचं नाहीं. तुम्हीं असेच वागत राहाणार, अशींच कारस्थानं करीत राहणार हें मला माहित आहे. पण इतकें ओळखून मी स्वस्थ बसेन, तुमचीं कारस्थानं चालूं देईन, असं मनांत सुद्धां कधींकाळीं आणूं नका!"

इतकें म्हणून आपल्या बोलण्याचा परिणाम विनतेवर काय होतो हें पाहण्यासाठीं ती क्षणदोन क्षण विनतेकडे पाहात राहिली. विनतेच्या मनांत कांहीं बोलावयाचें आलें. शब्द अगदीं ओंठावर आले. कद्रूच्या ध्यानांत आलें. विनतेची पूर्ण मुस्कटदाबी करावयाची, तिला चकारही बोलूं द्यावयाचें

नाहीं, असा कद्रूचा संकल्पच झाला होता. तेव्हां ती तिला कशी बोलूं देणार ? तिच्या अगोदर कद्रूच बोलूं लागली, "माई, दासीपणाचा स्वीकार केल्याबरोबर तुझं मनही तशाच तऱ्हेचं ज्याअर्थी बनलं आहे त्याअर्थी तूं माझी पहिली माई राहिली नाहींस हेच खरं! अर्थात् माझ्याविरुद्ध कोणत्या वेळीं कोणतं कारस्थान करशील याचा नेम नाहीं. म्हणून मी तुला अगोदरच सांगतें—नव्हे आज्ञा करतें. तूं गरुड आणि अरुण, यांनीं एकत्र जमतां कामा नये. एकत्र जमायचं असेल, बोलायचं असेल, कांहीं विचार करावयाचा असेल तर तो माझ्या समोर झाला पाहिजे. माझ्या किंवा मी सांगेन त्याच्या समोर तुम्हीं एकत्र बसलं पाहिजे, विचार केला पाहिजे. एरव्हीं नाहीं ! हें तिनें विनतेला सांगितलें, त्याच वेळीं तिनें आपल्या मुलांनांही बजावून ठेवलं कीं हीं तिघे एकत्र कुठें जमतात कीं काय हें पहात चला. लक्ष ठेवा.

विनता कद्रूच्या तोंडचा एकेक शब्द ऐकत असतां हतबुद्ध झाली होती ! प्रति इंद्र असा गरुड, पण तोही आपल्या सावत्र मातेकडून आपल्या मातेवर हकनाक कसा कहर गुदरला जात आहे, असें पाहून बधीर झाला होता !

विनता त्याच्याकडे व तो विनतेकडे पहात—पण त्यांच्या दृष्टींतला हेतु वर्णन करणें मात्र सर्वथा दुरापास्त आहे !

परदास्य म्हणजे जिवंत मृत्यू असें तर त्या मायलेकरांच्या मनांत त्यावेळीं येत नसेल ? तो जिवंत मृत्यू आपण भोगतो आहोंत, ही जाणीव त्यांना कोणत्या भयंकर यातना देत असेल ?

सत्तेचा प्रतोद घेऊन विनतेच्या आणि तिच्या मुलांच्या पाठीवर ओढण्यास कद्रूनें नुकतांच कोठें अशा प्रमाणें प्रारंभ केला. त्यावेळीं तिच्या कपाळावर आसुरी आनंद थैमान घालीत असल्याचें दिसल्यास नवल काय ? कद्रू आतां अधिकारमदानें धुंद झाली होती. आपण आतां विनतेला काय बोलूं आणि किती बोलूं, तिच्या मुलाना कसें आणि किती टेचूं? असें तिला होऊन गेलें होतें. कद्रू मागचा पुढचा विचार पहात नव्हती. आपल्या नात्याला डोकें वर

काढूं देत नव्हती ! आपण, आपल्या हातीं घेतलेली सत्ता, तिचा उपयोग करून घेऊन आपण आपल्या मुलांसह सौख्यांत, वैभवांत, तोऱ्यांत कसं सतत रहावयाचें याचाच फक्त कद्रू विचार करीत होती !

गरुडाची मुस्कटदाबी होते आहे. आपली आई ती मुस्कटदाबी करीत आहे, हें पाहून सर्व मंडळींना कोण आनंद होत होता. तो त्यांच्या पोटांत मावेना असें होऊन गेलें होतें ! मनाचा, शक्तीचा, तेजाचा तडफडाट होऊन गरुडाला बोलण्याची इच्छा अनावर होई. पण विनता त्याला डोळ्यांनीं "बोलायचं नाहीं, बोलण्याची ही वेळ नव्हे, आज बोलण्याचा आपला अधिकार नाहीं !" असें सांगत होती. गरुड आंतल्याआंत सारे मनोविकार आईच्या आज्ञेनें दाबून टाकीत होता.

आतांपर्यंत—आल्यापासून आतांपर्यंत आपण दाखवावयाचें तें उग्ररूप दाखविलेंच नाहीं, गाजवावयाची ती सत्ता अजून गाजविलीच नाहीं, असें कद्रूला वाटत होतें. अजूनपर्यंत वागविलें तें अत्यंत सौम्यपणानें वागविले असें ती समजत होती. आल्यासारखें सत्तेचा प्रभाव कांहीं तरी दाखविलाच पाहिजे. तो दाखविला नाहीं, तर हातीं आलेल्या सत्तेचा उपयोग काय ? आतां तिनें अगोदर आपल्या मुलांना मलायकी देण्याचें ठरविलें. कारणही उघड होतें. विनतागरुडाचा गुप्त कट चालू असतां तो पाहून कद्रूला तेथें आणून तिलाही तो दाखविण्याची अपूर्व कामगिरी तिच्या मुलांनीं बजावली होती. म्हणून तिनें प्रथम आपल्या मुलांची पाठ थोपटली मग ती विनतेकडे वळली.

कद्रूची अधिकारवाणी स्रवूं लागली, " माई, तुम्हीं गुप्त कट करीत होतां, कारस्थान रचीत होतां, हें मी प्रत्यक्ष येऊन पाहिलें. त्या अपराधाचें माप पुरेपूर तुझ्या पदरांत टाकलें. गरुडानें माझ्या मुलांशीं मस्तवालपणा कसा केला, हें त्यानें तुझ्या समोरच कबूल केलें. हे दोनही अपराध अक्षम्य आहेत कीं नाहींत तूंच सांग. या अपराधाबद्दल मी प्रायश्चित्त कां देऊं नये ? याचेंही उत्तर दे. माई, मी आतां सत्ताधारी आहें. माझी तूं दासी आहेस ! मी या अपराधाबद्दल तुम्हांला प्रायश्चित्त सांगणारच सांगणार.

त्यांत दयामायाक्षमा कांहींही दाखविणार नाहीं ! माई, तूं आणि तुझीं मुलें आपल्या आंगच्या उपजत गुणामुळें, उपजत शक्तिमुळें, उपजत सौंदर्यामुळें न बोलतां, जिथें तिथें, ज्या त्या वेळीं आमच्यावर सत्ता गाजवीत होतां. उभं जग तुमच्या गुणांचा, तुमच्या सौंदर्याचा, तुमच्या शक्तीचा उठल्या सुटल्या गौरव करीत होतं. त्या जगाला दाखवूं दे कीं, त्याच सद्‌गुणांना, त्याच सौन्दर्याला, त्याच बळिवंत शक्तीला कद्रू आपल्या अधिकारानें आपल्या हाताखालीं हवी तशी राबवित आहे ! दिसूं दे एकदां जगाला हें दृश्य ! ऐकलंस माई, आजवर तूं माझीच सारीं कामं करीत आलीस. तुझ्या कार-स्थानाच्या नव्या अपराधाबद्दल माझ्या बरोबर माझ्या मुलांचींही कामं तूंच केलीं पाहिजेस ! आणि गरुडानें ज्या माझ्या मुलांना श्रीमुखांत भडक-विल्या, कान उपटले, वृक्षावर डोकीं आपटलीं, त्यांची सेवाचाकरी गरुडानें बिनहरकत आणि आनंदानें केली पाहिजे. त्यांना आपल्या आंगाखांद्या-वरून हिंडविलं पाहिजे. माझ्या मुलांच्या लहरी गरुडानें संभाळल्या पाहि-जेत. हें करायला गरुडाला तूं सांगितलें पाहिजे ! ”

कद्रू हें सांगूनच थांबली असें नाहीं, तर तेथल्या तेथेंच तिनें गरुडाला त्या कामाला लावलें. विनतेकडून सांगविलें व विनतेच्या हातावर आपला शालू भिरकावून आपल्यापुढें चलण्यास तिला आज्ञा केली !

विनतेचे अश्रु डोळयांतल्या डोळयांत दबून गरुडाला सांगत होतें ‘ प्राप्त घटकेला परदास्याची ही निरयगति तुम्हाला व मला भोगलीच पाहिजे ! ’

मातृभक्त गरुडानें आईची आज्ञा निमूट ऐकली. सर्वांना खांद्यावर घेऊन तो त्यांच्या इच्छेप्रमाणें त्यांना फिरावयाला घेऊन गेला !

विनता कद्रूपुढें दासीप्रमाणें चालूं लागली.



# प्रकरण आठवें

– सेवकांच्या पुढें ध्येय काय? त्याच्या आयुष्याच्या, जीविताच्या, संसाराच्या प्रवासाचा शेवट कुठें? आरंभ दास्यांत, मध्य दास्यांत आणि शेवटही दास्यांतच काय?

– प्राप्त परिस्थितींत गरुडाला आपल्या सभोंवती अंधःकाराच्या साम्राज्या-शिवाय दुसरें कांहींच दिसत नव्हतें !–

– या मंडळींची घमेंड जोपर्यंत जिरत नाहीं, यांना मनाच्या स्वतंत्र्याचा जोपर्यंत ताठा आहे, अभिमान आहे आणि तो तसाच त्यांना जोपर्यंत राखावयाचा आहे, तोपर्यंत यांना जेवावयाला देऊं नका. अन्नच द्यावयाचें नाहीं. यांना उपासमार पडूं द्या म्हणजे हे घमेंडखोर आपोआप ताळ्यावर येतील–

नगाधिराज हिमालयाचें पुण्यपावन दर्शन घेणारांस, त्यावरील अत्युच्च शिखर जें गौरीशंकर तेथवर जाणारांस नगराज नाना तऱ्हेचे कष्ट देतो, अनंत प्रकारच्या हालअपेष्टा करतो प्रत्येक पुढें पडणाऱ्या पावला-बरोबर नवीन संकटें पुढें आणून ठेवतो; एके ठिकाणीं तुटलेल्या भयानक कड्याच्या कडेकडेनें चालतांना प्रतिक्षणीं आपले प्राण धोक्यांत आहेत या जाणीवेनें पावलें लटपटावयाला लागतात. एकच पाऊल एका वेळीं ठेवतां येईल एवढाच निरुंद मार्ग असतो, त्यांतून किंचित् जरी पाऊल ठेवल्या ठिकाणाहून विचलीत झालें तरी तात्काळ दुसरें जगात जाण्याची धास्ती दत्त म्हणून पुढें असते. कुठें इतकी कराल दरी ओलांडावयाची असते, कीं सामान्य बुद्धि व दृष्टी त्या विक्राळ राक्षसीच्या पसरलेल्या जबड्यांत आपण कायमचे गडप खास होणार, असें सुचविल्यावांचून रहात नाहीं. मग मागला मार्ग मागें आणि पुढला पुढें! बरें, त्या दरीतून जीव बचा-वून, धीर धरून, कष्ट सोसून, जीव मुठींत धरून कसेंबसें पार पडावें, तों पुढें एकसारखा हिमाच्छादित प्रांत ठेवलेला. पाय गारठताहेत, शरीरांतील रक्त थंडीनें गोठतें आहे, शरीरांतील त्राण क्रमाक्रमानें नष्ट होत आहे, या प्रकाराला आरंभ व्हावयाचा! जीवासाठीं, ध्येयासाठीं, कारणासाठीं हिमा-च्छादित प्रदेश पाठीमागें टाकावा, तों योजनेच्या योजनें दूर अशी किर्र झाडी आहे, अशा मार्गाला सुरुवात व्हावी. प्रकाश नाहीं, पुढचा मार्ग

दिसत नाहीं, हा अंधेर—ही अडचण केव्हां संपावयाची तें समजत नाहीं, अशा स्थितींत त्या मार्गातून चालण्याचा प्रसंग यावयाचा. पूर्व पुण्याईनें म्हणा, जीविताची दोरी चिवट म्हणून म्हणा, किंवा अन्य कसल्या कारणामुळें म्हणा तो अंधेरांतला मार्ग पायांनीं तुडवावा, अंधेराच्या बाहेर यावें आणि आतां संकटें संपलीं, त्रास सरला, असें वाटून समाधानाचा श्वास सोडण्यास लागावें, इतक्यांत झाडीच्या तोंडाशींच कित्येक दिवसाच्या क्षुधेनें प्रक्षुब्ध झालेले व्याघ्रसिंहादि वन्यपशु आपापले जबडे वासून पुढें टाकलेले दिसावें! असें पाहिल्यावर त्या प्रवाशाला जीवाची, संसाराची सुखाची, ध्येयाची किंवा जीवितसाफल्याची कुठली आशा? सर्व आशा निराशा, इच्छा महत्वाकांक्षा तत्क्षणींच लयाला जावयाच्या व त्याबरोबर स्वतःही जीविताला मुकावयाचें!

गौरीशंकराच्या दर्शनाला चाललेल्या—खुषीनें किंवा सक्तीनें, इच्छेनें किंवा अनिच्छेनें निघालेला प्रवासी असो, त्याचा नगाधिराज हिमालय इतक्या संकटपरंपरेंतून चालविल्याशिवाय रहात नाहीं! मग तो कोणीही असो. राजा असो वा रंक असो! नगाधिराजाचे पाय वंदन करून एकेक शिखर गांठीत जाणाऱ्या कसल्याही प्रकारच्या प्रवाशाला एक शिखर गांठीपर्यंत, दऱ्याखोरी, निरुंद मार्ग, निबिड अरण्यें, हिममय मार्ग, आणि क्षुधित व्याघ्रसिंह इत्यादिकांना ओलांडून जावें लागावयाचेंच! एक संपलें कीं दुसरें शिखर तिथून तितकेंच उंच समोर तयार! तें गांठींपर्यंत फिरून मागील सर्व भानगडी आल्याच!

हा नगाधिराज चढणारा एकादा राव असेल तर त्याची गोष्ट कांहींशी निराळी. तो आपल्या हाताखालच्या सेवकांना राबवील. त्यांना वाकवील, त्रास देईल, प्रसंगीं त्यांचे ठायीं ठायीं बळीही देईल, पण आपला प्रवास सुखदायी होण्याची खटपट करील. तो सेवकांच्या डोक्यावर बसेल—नव्हे बसतोही! पण सेवकांनीं काय करावयाचें? त्यांच्या हालअपेष्टांची सीमा कशी संपावयाची? कदाचित् रावांना नवें शिखर दिसलें कीं तें चढावयाला सेवकांच्या सहाय्यामुळें नवा हुरूप यावयाचा! नगाधिराजाचें नवें

वैभव पहावयाला मिळेल ही सुखद कल्पना त्यांच्या मनाला रमवावयाची. परंतु तेंच, त्या वेळींच सेवकांच्या मनाची अवस्था काय? हें कोणाला कळणार? जे कोणी दीन दुबळे असतील, अशक्त असतील, परावलंबी असतील, सेवक असतील, दास असतील, ज्यांची हालचाल स्वतःच्या स्वाधीन नाहीं असे असतील, त्यांचा प्रवास कसा होणार? त्यांना हिमालयाचें प्रत्येक शिखर चढतांना आपल्याला नवा जन्म घ्यावा लागणार, असें वाटल्याशिवाय कसें राहणार? हिमालयाचें अत्युच्च शिखर सेवकांचे धनि पाहणार. सेवक पहातीलच याचा नेम काय? मध्येंच त्यांची जीवितयात्रा संपली तरी पर्वा कोणाला? आणि तितक्यांतून चाललें असतां आपल्याला याच प्रवासाच्या अंतीं गौरीशंकराचें पावन दर्शन होणार याची कल्पना येण्याचें तरी कारण काय?

सांप्रत कद्रू आणि विनता या दोघींचें ह्या प्रवाशाप्रमाणें असेंच कांहीसें चाललें होतें म्हणावयास कोणती हरकत आहे? कद्रू आपल्या मुलाबाळां-सह सत्तेच्या जोरावर विनता आणि तिची मुलें यांच्या मानगुटीवर बसून सत्तेच्या अत्युच्च शिखराचें वैभवशाली दर्शन घ्यावयाला निघाली होती. विनतेला व तिच्या गरुडाला व अरुणाला आपल्याला कोठें चालविलें जात आहे, याबद्दल कल्पनाही येत नव्हती! त्यांच्या पुढें सर्वत्र अंधः-काराचेंच साम्राज्य पसरलें होतें. पाऊल पुढें टाकावयाचें एवढेंच त्यांना काम होतें. त्यांचे पाय पुढें टाकावयाला लावणारा त्यांचा धनी म्हणजे कद्रू व तिची मुलें. सेवकांच्या पुढें ध्येय काय? त्यांच्या प्रवासाचा शेवट कुठें? आरंभ दास्यांत, मध्य दास्यांत आणि शेवटही दास्यांतच काय?

विनतेवर अधिकार चालवीत असतां कद्रू नित्य नवा आनंद उप-भोगीत होती. प्रतिदिनी कद्रूपुढें आज्ञेचे हात जोडून उभी असतां हें असेंच कुठवर चालावयाचें व याचा शेवट कशांत व्हावयाचा, याबद्दल विनता सतत मनाशीं कल्पना घोळवीत होती! आज इतकें झालें. कद्रूनें इतकें करावयाला लावलें. आपला सेवाधर्म आहे तेव्हां आपल्याला तो पाळलाच पाहिजे. त्यांत कसलीही कसूर करावयाची नाहीं.

ही विनतेची निश्चित बुद्धि. एक दिवस त्रास होईल. दोन दिवस होईल, आठ दिवस होईल. पण मग अंगवळणीं पडेल आणि आपल्याला कद्रूनें सांगितलेल्या कामाचें कांहीं वाटणार नाहीं. असें ठरवून विनता चाले व आपल्या मुलांनाही चालावयास लावी. विनतेच्या कल्पनेप्रमाणें होईही! कद्रूनें मुद्दाम दुष्ट बुद्धीनें कांहीं अत्यंत कठीण असें काम विनतेला सहज लीलेनें म्हणून सांगावें. तिनें तें करूं लागावें. त्रास व्हावा–पण थोडक्याच काळांत त्या कामाचा तिला सराव व्हावा व मग त्या कामाचें तिला कांहींच वाटूं नये. कद्रूनें सांगितलेल्या हलक्या सलक्या कामानें विनतेच्या मनाला प्रथम अतिशय क्लेश होत मग तिच्या शरीरावर परिणाम होई. अशीं कामें करतांना मुलांच्या अंगाची सदासर्वकाळ लाही लाही होई! पण बोलावयाचें कोणाजवळ? तक्रार न्यावयाची कोणाकडे? 'आपला हा सेवाधर्म आहे. आपल्याला तें मुकाट्यानें केलेंच पाहिजे' असें विनतेनें केव्हां डोळयांत पाणी आणून, केव्हां कळवळून, तर केव्हां केव्हां स्वतःवरच अत्यंत संतापून मुलांना सांगावें. गरुडानें मग मुकाट्यानें कामाला लागावें.

एक काम अंगवळणी पडत चाललें, त्याचें कांहीं वाटेनासें झालें, तें काम करून स्वतःच्या उद्धाराकरितां विचार करावयाला क्षणकाल मिळतो आहे, असें दिसलें कीं तेवढ्याचीच संधी घ्यावी व तसें विनतेनें वागूं लागावें. परंतु विनता स्वस्थ बसलेली दिसली कीं, कद्रूला आणखी एक नवें जोखड तिच्या मानगुटीवर लादण्याचें स्फुरण यावें. असा क्रम चालूं झाला.

परंतु हीं अशीं कामें चालूं असतांना आपण स्वतःचे स्वतःला दिवसानुदिवस विसरत तर चाललों नाहीं ना? परदास्य आपल्या कायमचें अंगवळणी पडत तर चाललें नाहीं ना? परदास्याच्या पचनीं आपण निरंतरचें तर पडत नाहीं ना? हें गरुडाच्या मनांत प्रतिक्षणीं आल्याशिवाय रहात नसे. तें मनांत आलें कीं त्याच्या शरीराला आणि मनाला असंख्य यातना –वेदना होत! तो त्वेषानें, मनाच्या अशा अनावर भिरभिरीनें आईला विचारी कीं, हें असें चालायचें कुठवर? या जिवंत मृत्यूच्या यमयातना

जन्मजन्मांतरीं तरी संपणार आहेत कीं नाहीं ? परदास्य असेंच निरंतरचें आमच्या पाठीमागें हात धुवून लागलें तर आजच्या मनाच्या तीव्र वेदना हलके हलके नाहींतशा होऊन परदास्य हाच आमचा देव, परसेवा हाच आमचा धर्म, पारतंत्र्य हीच आमची नीति, सत्वविटंबना हेंच आमचें जिणें, असेंच आम्हांला वाटावयाला लागून त्यांतच आम्हीं आनंद मानावयाला लागणार कांय ?

ती दीन माउली गरुडाच्या प्रश्नांना कसलीं उत्तरें देणार ? प्राप्त परिस्थितींत गरुडाला सभोंवतीं अंधाराच्या सम्राटाशिवाय दुसरें कांहीं दिसत नव्हतें, तर विनतेचीही तीच परिस्थिति होती ! ती गरुडाची कशी समजूत काढणार ? गरुडाचें कसें सांत्वन करणार ?

अशा स्थितींत मायलेकरांनीं संधि साधून रड रड रडावें, नशीबाला हात लावावा, आणि रोजच्या कार्याला लागावें.

इकडे कद्रूच्या करडेपणाची कमान दरक्षणाला चढतच चालली होती. कद्रू कुठेंही असली, तिचें कसलेंही काम असलें तरी, तिला विनता जवळ लागे. तिनेंच तें काम केलें पाहिजे. कद्रूचें अंथरूण घालण्याचा मान विनतेकडे आला होता. तिला झोंप लागेपर्यंत तिची सेवाशुश्रूषा विनतेलाच करावी लागूं लागली. कद्रूच्या समोर विनता अष्टौप्रहर उभी पाहिजे ! तिच्या दृष्टीच्या आड विनतेनें केव्हांच होऊन चालेनासें झालें. काम असो वा नसो, विनता समोर पाहिजे. दुसरें कोणी चुकलें, त्याचा राग निघावयाचा विनतेवर ! झोपेंत पाय उघडे पडले, पांघरूण बाजूला सरलें, तर तें नीटनेटकें करण्याची ज़बाबदारी विनतेवर ! कद्रू जेवावयाला बसली, तर विनता तिच्या समोर पाहिजे ! तिच्या हातावर पाणी विनतेनें घातलें पाहिजे. क्षणमात्र ती इकडे तिकडे झाली कीं लगेच गेली मर्जी ! लगेच आकाशपाताळ एक व्हावयाचें. त्याचक्षणीं सेवाधर्म पायधुळी पडल्याबद्दल विद्युत्पात विनतेच्या मस्तकीं व्हावयाचा !

एकाद्याला वाटावें, जीवींच्या जिवलगाशिवाय इतर कोणाला संततसान्निध्याचा मान कसा मिळणार ? विनतेचें हें भाग्यच म्हटलें पाहिजे कीं

कद्रूचा अनिवार लोभ होता म्हणूनच ती विनतेला लवमात्र विसंबत नव्हती !

परंतु याबद्दल विनतेला काय वाटत होतें ? विनता जेवली आहे का ? विनतेला दोन घांस पोटांत घालावयाचे आहेत का ? विनता आपल्या समोर अष्टौप्रहर उभी आहे. तिच्या शरिराला क्षणमात्र विसावा नको का ? आपल्या सेवेंत सतत रत राहावें लागत असल्यामुळें विनतेला किती रात्रीं आलोचन जाग्रणाच्या काढाव्या लागल्या आहेत, याबद्दल कधीं चौकशी करण्याचें, कधीं विचारण्याचें, किंवा सांगण्याचें कद्रूच्या मनांत तरी आलें होतें काय ?

विनतेच्या संबंधांत कद्रू अशा कशाचीच पूसतपास करीत नव्हती. तशी चौकशी करण्याची तिला कधीं गरजही वाटली नव्हती ! कशी वाटणार ? विश्वाच्या पाठीवर जेत्यानीं जित्याच्या पोटापाण्याची, हालअपेष्टांची, सुख-दुःखाची चौकशी करावयाची असते अशी कधीं रीत असल्याचें कोणी बोललें आहे काय ? मग त्याला अपवाद कद्रू तरी कुठून होणार ?

धनी गाढ निद्रेच्या आधीन झाल्यावर, कुणा जिवलगाशीं गुज चाललें असतांना, किंवा गुपितांतलें गुपित—कारस्थान कांहीं शेलक्या मंडळीबरो-बर चाललें असतांना तेवढ्यांतल्या तेवढ्यांत मिळतील तसलें शिळेंपाकें, उष्टेंमाष्टें, कुजलेलें सडलेले दोन घांस कसेबसे मिळेल त्या ठिकाणीं घशाखालीं घालावयाचें असतात ! त्याप्रमाणें विनतेच्या आयुष्यक्रमणाला सुरुवात झाली होती.

उजाडला दिवस मावळत होता. विनतेला रोजचा नवा त्रास भेटा-वयाला नव्या दमानें येत होता ! कद्रू विनतेला सतावून सोडूं लागली, तर कर्कोटकादि सर्व मंडळी गरुडाला आणि अरुणाला छळूं लागली. अशक्त, दुर्गुणी, दुष्ट, पण सत्ताधारी मंडळी गरुडाला आणि अरुणाला अशा कांहीं रीतीनें छळूं लागली कीं सांगतां पुरवत नाहीं. शक्तीची किंवा बुद्धीची कोणतीही कामें करावयाला गरुडाला कांहींच वाटावयाचें कारण नव्हतें. परंतु त्याला अशीं कांहीं निंद्य कामें ते करावयाला आज्ञा करीत कीं, त्या

## प्रकरण आठवें

आज्ञा कानांना ऐकवणें किंवा पाळणें म्हणजे त्यापेक्षां मृत्यू पुरवला, असें त्याला वाटावें.

असे नव खेळ खेळावयाला लावावयाला त्यांना मिळालेलें रत्न—ती स्वरूपसुंदर पण काळजानें भयंकर स्त्री-नेहमीं सज्जच होती. कर्कोटकच काय पण त्याचा प्रत्येक बंधु त्या रूप सुंदरीवर अलोट प्रेम करूं लागला होता. तीही प्रत्येकाचा लोभ संपादन करण्याची कमाल करीत असे. कोणाला करमेनासें झालें ती जवळ पाहिजे. कोणाला महत्त्वाच्या विषयावर विचार करावयाचा असला बोलवा तिला. एकादा खेळ खेळावयाचा असला, तर त्या खेळांत ती असल्यावांचून मौज नसावयाची. तिच्या शिवाय सर्व मंडळींचें कोणत्याही कार्यांत पान हलेनासें होऊं लागलें तर त्यांच्याखेरीज तिला क्षण युगासारखा भासूं लागला. हिच्याशीं गप्पा गोष्टींत दंग असतांना किंवा हिच्याबरोबर इकडून तिकडे हिंडत असताना कद्रूच्या दृष्टीस पडलें तर ती काय म्हणेल याची भीति त्याना वाटेनाशी झाली. ते प्रथम प्रथम आईला भीत. तिच्या दृष्टोत्पत्तीस आल्यास ते लाजत, खजील होत, तोंडें वळवीत. पण आतां तो मनु पालटला. तिला पुढें न करतां मुलांनींच अगोदर आईजवळ तिचें स्तोम माजवायला आरंभ केला. तिच्यामुळें विनता व तिचीं मुलें आपल्यापुढें नमूं लागलीं आहेत. तिच्याच नवनव्या कल्पनांनीं ती मंडळी हतबुद्ध होत असतात. व तीच आपल्याला हाताखालच्या मंडळींना जरबेंत कसें ठेवावें हें शिकवीत असते,' वगैरे सांगून मुलांनीं कद्रूचें तोंड अगोदरच बंद केलें होतें !

त्या बाईचा सहवास, तिचें वागणें, बोलणें, तो वर्तनाचा उद्धटपणा, स्त्री जातीला केवळ कलंक असा निलाजरेपणा कद्रूला मुळींच पसंत नसे. स्त्रिया स्त्रियांना फार चांगल्या आणि अतिशय लवकर ओळखतात. व त्यावर त्यांचें प्रेम जमतें किंवा वितुष्ट उत्पन्न होतें. कद्रूला हें सागरीचें रत्न मुळींच आवडलें नाहीं. तिची हकीकत जेव्हां तिला कळली, तिला जेव्हां मुलांच्या सहवासांत तिनें पाहिलें, तेव्हां तिला कसेसेंच झालें. बायकांना सुनाबद्दल जसें वाटत असतें, तसाच प्रकार त्या रूपवती-

संबंधीं कद्रूच्या ठिकाणीं प्रादुर्भूत होऊं लागला. परंतु प्रथम तिनें त्याकडे दुर्लक्ष केलें. पुढें मुलेंच इतकीं धीट झालीं कीं तीं आपलें ऐकतील असें कद्रूलाच वाटेना म्हणून तिला बोलावयाचें धाडसच होईना. नंतर खरींच मुलें निर्भय झालीं आणि त्या स्त्रीचें गुणवर्णन उघडा उघड आपल्या आईजवळही करूं लागलीं. त्या स्त्रीचे मायावी पाश मुलांच्या गळ्याभोंवतीं पसरले आहेत असें कद्रूला दिसलें, पण ज्या वेळेला दिसले तेव्हां आपण मुलांना कांहीं सांगू नये आणि मुलांनीं आपलें कांहीं ऐकूं नये, येथपर्यंत गोष्टी गेल्या होत्या. आपला पति ताब्यांत आला आहे असें लक्षांत आल्यावर सासूची कदर सुना करीतनाशा होतात, तसेंच ती स्त्री कद्रूची कदर करीनाशी झाली. कद्रूनें आपल्या मुलांना हांका मारल्या आणि त्यावेळीं ती जवळ असून आपल्या जवळून या मंडळींनीं हलूं नये असें असलें व त्याप्रमाणें तिनें नुसती तशी इच्छा दर्शविली, तर कद्रूच्या हांकाना मुलें जुमानीत नसत ! येथपर्यंत मुलांची पाळी आली होती.

अशा वेळीं कद्रू मुलांवर फारच संतापे. त्या स्त्रीविषयीं कांहींच न बोलतां मुलांच्या छंदीपणाबद्दल त्यांची निर्भत्सना करी आणि म्हणे, "माझा शेष असा तुमच्यासारखा उद्धटपणानें माझ्याशीं कधींच वागला नसता ! तुम्हांला वडिलधारी मंडळी आतां कळेनाशी झाली. कोण कुठली ती बया—आली आणखी तुमच्या गळी पडली. तिचें लक्षण ठीक दिसत नाहीं आणखी तुमचा तिच्याविषयींचा छंद सुटत नाहीं. तेव्हां पुढें काय होणार, हेंच मला समजेना! तिच्या छंदानं वागता काय ? करतां काय ? अघाशासारखे खात काय सुटतां ? जगांत बरें दिसेल असें तरी वागत जा. तुम्ही असे वागायला लागला म्हणजे मला शेषाची एकसारखी आठवण होते. तो असा कधीं कधीं वागता ना ! त्याला तुम्हीं भंडावून सोडून आपल्यांतून घालवून दिलात—तो इथं असतां तर—"

"तो असतां तर आपल्याला आज आपण विनतामाता आणि तिची मुलं यांच्यावर जी सत्ता गाजवितो ती गाजवताही आली नसती !" कद्रूच

शहाणा मुलगा अशा तऱ्हेचें पटकन् उत्तर देऊन कद्रूचे दांत कद्रूच्याच घशांत घाली. अशा मुलांपुढें कद्रू काय बोलणार? दांत आपले ओंठ आपले! संतापायाचें, रागवायचें आणि स्वस्थ बसावयाचें! तितक्यांत विनतेचा, गरुडाचा, अरुणाचा विचार आला, त्यांच्यावर आपण सत्ता गाजवीत आहोंत, या सुखद कल्पनेचें स्मरण झालें, म्हणजे मुलांची वर्तणुक पाण्यांत वितळल्याप्रमाणें केव्हाच वितळून जाई!

हेंच त्या मुलांनीं त्या स्त्रीला रंगांत येऊन सांगावें. 'आमची आई तुझ्यावर संतापते. तूं आमच्या संगती आहेस, आमच्यावर तुझें प्रेम आहे हें आईला आवडत नाहीं.' अशा तऱ्हेनें बोलावें. त्या रूपवतीनेंही तें ऐकल्यावर विश्वयोषितेच्या न्यायानें, रुसावें, रडावें, निराश व्हावें, आपला जन्म व्यर्थ आहे म्हणावें, आपण होऊनच निघून जातों म्हणून म्हणावें. आणि असें बोलत बोलतच आपले पाश अधिक बळकट करावेत. "तुमची आई कांहींही म्हणो, तुमच्या आश्रयाला मी आलें आहें. मी तुमच्यावर प्राणापलीकडे प्रेम करतें, अशा स्थितींत तुम्हीं माझा त्याग करणार काय?" असें विचारून त्या मंडळीकडून 'कल्पांती नाहीं!' असें उत्तर काढून घ्यावें. आणि मनांत अतिशय आनंदीत व्हावें. सर्प मंडळी अद्याप तितकी निर्ढावलेली नसल्यामुळें प्रत्येक वेळीं आईला दुःख देणें बरें नव्हे, असें त्यांना वाटे, व ते म्हणत आईची मर्जी आमच्याविषयीं व तुझ्याविषयीं सुप्रसन्न राहील अशा कांहीं तरी युक्त्या आम्हांला सुचवीत जा म्हणजे झालें. मग आपल्याला कशाचीच भीति नाहीं!"

तिनें युक्त्या सुचवावयाच्या म्हणजे काय? विनतेला व तिच्या मुलांना कसें नव्या तऱ्हेनें छळतां येईल, आपल्या वर्तणुकीनें त्यांच्या पोटांत आग कशी पडेल, हें सांगावयाचें! तसें झालें कीं कद्रू खुष! त्या तऱ्हेनें त्या स्त्रीनें मुलांना युक्ति सुचवावीही!

मध्येंच एकदां असा प्रसंग आला. कद्रू त्या स्त्रीबद्दल कुरकुरली. तें त्यांनीं त्या स्त्रीला सांगितलें. तेव्हां तिनें आपल्याला "तुमच्या आईकडे घेऊन चला म्हणजे मी तिला सांगेन कीं माझ्यामुळें यांचा आहार किती

वाढला आहे पहा. त्यांच्या प्रकृती कशा सुदृढ झाल्या आहेत तें ध्यानांत घ्या आणि मग मला बोल लावा. माझ्या संगतीनें तर जेवणांत रोज नवे प्रकार येऊं लागले. पक्वान्नें होऊं लागलीं. खरं तुम्हीं सांगा, माझ्या सहवासा-वांचून तीं पक्वान्नें तुम्हांला तितकीं चांगलीं वाटतील का ? ' मी बरोबर असलें म्हणजे तुमच्या पोटांत तीं पक्वान्नें किती रिचतात, त्यांना नवी गोडी कशी येते ? माझ्या खेरीज पक्वान्नें नाहींत, पक्वान्नांखेरीज मी नाहीं ! तुम्हीं मला वगळून एकदां तसा समारंभ करून पहा, म्हणजे तुम्हांला प्रत्यक्षच माझ्या सांगण्याचा अनुभव येईल. तुमच्या आईला हें सांगा. पंक्तीच्या वेळीं मी तुमच्या आईच्या कुठें जवळपास असलें तरी त्यांना जें पंक्तींत प्रेम येतं तें मी नसतांना येईल काय, हें एकदां पहा तरी ! "

अशीं सुन्दर मुखांतून सुन्दर सुन्दर मुक्ताफळें ऐकून कोण गारीगार होणार नाहीं ? अशा सुन्दर स्त्रीला कोणता दुष्ट दूर करील ? तिचें कोण ऐकणार नाहीं ? तिच्या करितां मातृप्रेमावर पाणी सोडावयाला कोण सज्ज होणार नाहीं !

ती स्वरूपसुन्दरी बोलूं लागली म्हणजे सर्व मंडळींची अशीच स्थिति अनेकदां होई ! अशा एका खटक्यांत तिच्या संतापाचें सांत्वन करण्या-करितां सर्प मंडळींनीं आईला सांगून फार मोठ्या जेवणाची तयारी केली. नानातऱ्हेचीं पक्वान्नें, नानातऱ्हेचा थाटमाट करावयाचा असें ठरलें. आपल्या हातीं सत्ता आल्यापासून जगाचे डोळे दिपविण्याकरितां आपल्याला असून असें कांहीं करतां आलें नाहीं तें आतां करावें असा निश्चय झाला. हा सारा कारभार त्या रूपवतीचा ! भोजनसमारंभाची कल्पना तिची ! आपलें वैभव जगाला दाखवावयाचें, सर्वांना आकंठ जेवायला घालून संतुष्ट करून आपल्याला धन्यवाद घ्यावयाचे, आशीर्वाद मिळवावयाचे, ही कल्पना त्या अवदसेनें कर्कोटकाकडून कद्रूच्या मनांत भरविली. आपलें मनोगत सफल झालें. हा कद्रूचा विचार ठरला.

जेवणाची टोलेजंग तयारी झाली. सर्व मंडळींची धांवपळ सुरू झाली. त्यांना मानणारी मंडळीही त्या जेवणाला निमंत्रिली. सर्व मंडळी कामाला

लागली. या समारंभांत विनतेला विलक्षण राबावें लागत होतें. हरकामीं ती होती व हा समारंभ पार पडेपर्यंत कामांत कसूर होतां कामा नये अशी विनतेला कद्रूची करडी आज्ञा होती! समारंभाची तयारी झाली. सर्व सर्पमंडळींच्या खाशा पंगति बसल्या. इतर निमंत्रितांचीही अत्युत्तम व्यवस्था ठेवण्यांत आली. पक्वान्नांची, आग्रह करकरून वाढण्याची सीमा सुटली! किती पक्वान्नांची नासधूस होत होती. किती अन्न मातीला मिळत होतें. किती अन्नांची चोरी होत होती.

कद्रू अत्यंत आनंदांत होती. जिच्यावर तिचें मुळींच प्रेम नव्हतें, त्या रूपवती स्त्रीला सुद्धां मुलांच्या सुखासमाधानाकरितां तिनें आपल्या खाशा पंक्तीला घेतलें होतें. किती मंडळी येत होती, हास्यमुखानें कद्रूचें अभिनंदन करीत होती! कद्रू यथायोग्य सर्वांचा परामर्ष घेत होती!

हा समारंभ वैभवाचा–थाटाचा–मोठेपणाचा होता. कीर्तीचा लाभ करून देणारा होता! त्या समारंभांत सर्व मोठेच मिसळावयाचे होते–मिसळले होते!

परंतु याच वेळीं विनता व गरुड अरुण यांची स्थिति काय होती? ते जित होते. जितांच्या करतां तो भोजनसमारंभ नव्हताच. त्यांनीं राबावयाकरितां होता. ते राबत होते. बरोबरीच्या नात्यानें त्या समारंभाचें निमंत्रण त्यांना कसें असणार? दासांना निमंत्रण नसतें. त्यांनीं वाटेल तर सर्व समारंभ संपल्यावर थोरामोठ्यांचें उरलेलें उष्टें मिळेल तेवढेंच आपल्या पोटांत लोटून त्यावर संतुष्ट असावयाचें असतें! विनतेला निमंत्रण नव्हतें म्हणूनही वाईट वाटत नव्हतें किंवा निमंत्रण असावें अशीही इच्छा नव्हती हें जसें तसेंच समारंभोत्तर उरलेल्या उष्ट्यांचा परामर्ष घेणेंही विनतेच्या स्वप्नस्वप्नांतरी येणें दुरापास्त होतें. ती त्या समारंभांत अविश्रांत राबत होती. गरुडही राबत होता. अरुणाच्या हातून होईल तें तो करीत होता!

हा भोजनसमारंभ चालू असतां कद्रूला आपल्या मनाप्रमाणें होत असल्याचें समाधान होत होतें. सर्प मंडळी तसाच आनंद अनुभवीत होती.

ती स्वरूपसुन्दरा कुलटा भोजनसमारंभांत सुन्दर नाच करीत होती ! तिच्या मनाप्रमाणेंच तो समारंभ साजरा होत होता !

विनता हें काम करीत असतां, आपलीं मुलें भुकेनें व्याकूळ झालीं असतील याची विवंचना करीत होती. तिची भूक मेली होती. भूक लागल्याचें तिला समजतच नव्हतें ! काम करावयाचें एवढेंच ती जाणें ! जेवणाचें तिला भानच रहावयाचें नाहीं, असा तिचा स्वभाव बनत चालला होता !

विनतेनें भोजन समारंभांत कोठेंही व्यत्यय येऊं दिला नाहीं. कोणालाही उणें पडूं दिलें नाहीं. शरीर कष्टत होतें. आपल्या मुलांना जेऊं केव्हां घालतां येईल ही चिंता तिचें मन करीत होतें.

वैभवाचें दुसरें शिखर दिसूं लागतां क्षणीं तें गांठावयाला कद्रूला नवा उत्साह प्राप्त झाला होता.

संकटाची दुसरी व नवी दुर्गम चढण येथूनच लागली ही कल्पना येऊन "आतां ही चढण चढण्याचें सामर्थ्य आपल्याला परमेश्वरच देवो," असें विनता म्हणत होती !

कद्रूचा परिवार पक्वान्नांच्या राशींत बुडत चालला होता. "पुरे पुरे, नको आतां फार झालें," असा पंक्तींत ध्वनी दुमदुमत होता.

सति विनता आपल्या मुलांना ओली कोरडी भाकर केव्हां घालतां येईल, याची संधि पहात होती.

तशांतून त्या माउलीनें वेळ काढली, पंक्तींतील मंडळी जेवण उरकून हात धुवावयाला गेली आहेत, ही वेळ तिनें पाहिली. त्या धांदलींत चाकरांना फारसें काम नसतेंच. तेवढ्यांत झटदिशीं आपण मुलांना जेऊं घालावें, व आपणही एकदोन घांस पोटांत लोटावेत, म्हणून विनतेनें गरुडाला व अरुणाला हलकेंच खुणविलें, बाजूस नेलें. आपल्या पर्णकुटींत आणलें. आणि केव्हां करून ठेवलेलें अन्न भरभर त्यांच्या पुढें मांडलें.

गरुडानें आपल्याबरोबरच जेवायला बसावयाचा आग्रह आईला केला. होय नाहीं म्हणण्याची ती वेळच नव्हती. किंवा आग्रह करण्याचीही वेळ

नव्हती. लगेच विनतेला पंक्तीला उष्टींखरकटीं काढावयाला धावावयाचें होतें, गरुड-अरुणाला सर्प मंडळींच्या सेवेला जावयाचें होतें. म्हणून विनतेनें तीनही पानें एकदमच मांडून घेतलीं.

प्रत्येकांनीं आपापल्या तोंडांत घांस घातले. तें शिळें अन्न-साधेंच! पण तें किती पवित्र, पावन, रुचकर आणि बलवर्धक होतें! विनतेच्या हातचें तें होतें. त्या अन्नांत विनतेच्या मायेचें अमृत समाविष्ट झालें होतें! त्या अन्नाची गोडी कद्रूच्या वैभवशाली भोजनसमारंभातल्या त्या थाटामाटाच्या पक्वान्नांना कुठून येणार? निदान विनता, गरुड, अरुण यांना तर नव्हतीच नव्हती! ती भाकर त्यांच्या कष्टाची होती. त्या अन्नाच्या आधारावर प्राप्त परिस्थितींत कंटकपणानें दिवस काढावयाची त्यांच्या मनाची पूर्ण तयारी होती.

त्या मायलेकरांनीं तोंडांत घेतलेले अन्नाचे घांस घशांतून अजून पोटांत उतरावयाचे होते. तोंडांत घास घालतांना देवाच्या नावाच्या झालेल्या उच्चाराचा ध्वनि अजून वातावरणांत पुरता विलीन व्हावयाचा होता, तोंच तिकडे "माई कुठें आहे? विनता कुठें आहे? चाकर कुठें गेले?" अशी चौकशी सुरू झाली. कद्रूची तर फारच गडबड उडाली. क्षणभर विनता दृष्टिआड झाली म्हणजे काय? तिचें पित्त खवळलें! "हे चाकर असे मस्तवाल असतात. गरज लागली म्हणजे जवळ कधीं असायचे नाहींत! कुठें तरी जाऊन मरतात!" कद्रूचें तोंड तें! एक बोलून थांवणार थोडेंच? तिनें चौकशी करण्याचा अवकाश, जो तो विनतेला धुंडाळावयाला लागला. धुंडाळीत काहीं सर्प विनतेच्या पर्णकुटींत सुद्धां आले.

"चला एकदम—आईनें बोलावलंय!"

"ही आलेंच!" हें विनता म्हणते न म्हणते तोंच आणखी सर्प मागोमाग आले.

"चला, चला, आई रागावली आहे!"

"हें काय? जेवत काय बसला?"

"आणि इथें जेवण काय म्हणून?"

## मातृसेवा

" पंक्तींतलीं पक्वान्नं टाकून हे शिळे तुकडे कां खातां ? "

" भिकारी ते भिकारीच ! रे–" सर्पांचें आपसांत व त्या मंडळींना उद्देशून उपहासाचें बोलणें सुरू झालें.

विनता उठूं लागली. गरुड तिला उठूं देईना. " दोन घांस पोटांत घालून मग ऊठ. घटकेचा प्रहर होत नाहीं. " त्यानें सर्वांनाही तसेंच सांगितलें. " क्षणा चार क्षणांत येत असल्याचें सांगा ! "

पण गरुडाचें कोण ऐकणार ? त्याचा निरोप सांगावयाला परत कोण जाणार ? विनतेच्या, गरुडाच्या, किंवा अरुणाच्या तोंडांत घोळणारे घास घशाखालीं कसे उतरणार ?

आणखी क्षण दोन क्षण त्याच स्थितींत गेले, तों खवळलेली कद्रू स्वतःच विनतेला धुंडाळीत त्या ठिकाणीं आली !

विनतेच्या व तिच्या मुलांच्या पुढ्यांत तें शिळें अन्न पाहून कद्रूचा क्रोध अनावर झाला !

" हातांतलं काम टाकून तुम्हीं इकडे कां आलांत ? कुणाला विचारून आलांत ? हें शिळेपाके तुकडे मुद्दाम का खात बसलात ? पक्वान्नं काय कमी पडलीं होतीं ? काम करीत असतांना, वाढीत असतांना काय थोडीं खाल्लीं असतील ? नसलीं खाल्लीं तर खायला कुणीं नको म्हटलं होतं ? मग हा देखावा का ? इतका मस्तवालपणा कशासाठीं ? आम्हांला डिवचण्यासाठीं ? आम्हांला चिडविण्यासाठीं ? आमच्यावर तोरा मिरविण्यासाठीं ? अहोरात्र तुमच्या शरीराला इतकं झिजवलं तरी तुमचा अभिमान मुरदाडपणानें जिवंत राहातो अं ?–तो कसा राहतो हें मी पण पाहातेंच ! उठा पानावरून. आतांच्या आतां उठा !–अरे, पाहातां काय बावळटासारखं माझ्या तोंडाकडं ? त्यांच्यापुढचीं पानं ओढा आणखी फेकून द्या ! माई, असं वागून माझा उपमर्द करतेस अं ! पक्वान्नं खात नाहींस ! स्वतंत्रता राखतेस ? शरीर परतंत्र असलं तरी मन स्वतंत्र आहे हें मला पटवून देतेस ? पण मी सांगतें, तूं माझी शरीरानंही दासी आहेस आणि

मनानेंही आहेस ! तुझ्या स्वतंत्र मनाचा तोरा मी माझ्यापुढें चालूं देणार नाहीं !"

ती खवळलेली नागीण इतके बोलून तेथून चालती झाली. सर्पांनीं त्यांच्या पुढचीं पानें ओढून भिरकावून दिलीं. त्या मायलेकरांना उपाशीं पोटीं पानावरून उठविलें आणि तसेंच कामाला लावलें !

विनतेवर व तिच्या मुलांवर हा कहर कोसळला होता !

कद्रूला या कृत्यानें हिमालयाचें अत्युच्च गौरीशंकर शिखर आपण गांठणार सत्तेनें आपण विनतेच्या मानगुटीवैर बसून त्यांनाही ती खडतर चढण चढावयाला लावणार अशी सुखस्वप्नें पडूं लागलीं.

उपाशीं पोटीं राबणाऱ्या त्या मायलेकरांना भोजनसमारंभांतले उष्टें खाण्याची सक्ति केली. जुलूम केला पण तिच्या त्या छळाला कोणींच जुमानलें नाहीं. त्यामुळें कद्रू अत्यंत चिडली आणि तिनें कद्रूला समोर उभी करून तिच्या देखत आपल्या मुलांना आज्ञा दिली—

"या मंडळींची घमेंड जोंपर्यंत जिरत नाहीं, यांना मनाच्या स्वातंत्र्याचा जोंपर्यंत ताठा आहे, अभिमान आहे, आणि तो तसाच त्यांना जोंपर्यंत राखावयाचा आहे, तोंपर्यंत यांना जेवावयाला देऊं नका. अन्न द्यावयाचें नाहीं. यांना उपासमार पडूं द्या म्हणजे हे घमेंडखोर आपोआप ताळ्यावर येतील !"

तीं मायलेकरें कद्रूनें मुलांना आपल्याकरितां दिलेली आज्ञा हिमालयाची शांतता पत्करून ऐकत होतीं !

ज्या दिवशीं ही आज्ञा केली गेली, त्या रात्रीं कद्रूला आपण नवें हिमालयाचें शिखर चढूं लागलों आहोंत, गौरीशंकर शिखर सन्निध आलें आहे, आपण विनतेला आणि तिच्या मुलांना आपलीं वाहनें केलीं आहेत, अशीं एकामागून एक सुखस्वप्नें पडत होतीं !

ती चढण चालावयास लागतांना त्या मायलेकरांना कसलीं स्वप्नें पडत असतील का !

---

# प्रकरण नववें

"तुझ्या पायांतल्या पारतंत्र्याच्या शृंखला प्रयत्नांच्या घणाच्या घावांनीं
निखळून टाकणार आणि आमच्या आईला स्वतंत्र करणार !
त्रिवार सांगतों, आई: तूं स्वतंत्र होणार ! स्वतंत्र
होणार ! स्वतंत्र होणार !"

कोणतीही गोष्ट अतीरेकाला गेली म्हणजे तिच्यांत बदल व्हावयाचाच. अतीरेकाला जाईपर्यंत कोणी झाला तरी दम धरणार. नाहीं तर सागर सीमा सोडतो. अचेतन सृष्टिही आपले नियम बदलूं लागते. उन्हाचा ताप अति झाला, सूर्यनारायण आपलें प्रखर तेज अतीरेकाला नेऊन वस्तुजात करपवून, जाळूनपोळून टाकूं लागला म्हणजे मग पर्जन्याला प्रारंभ होतो, तोच पर्जन्य आपल्या सत्तेचा अतिरेक करूं लागला—वरून हत्तीच्या सोंडेप्रमाणें धारा आणि त्या बरोबरच मेघखंडाच्या आडून येणारी उष्णता, यामुळें जीव गुदमरून जाण्याची पाळी आली—अशी शिक्षा पर्जन्य देऊं लागला म्हणजे हिमकाल आपलें वर्चस्व प्रस्थापित करतो आणि सृष्टीला सुखवितो.

अशीच गोष्ट कद्रूनें विनतेच्या बाबतींत अतिरेकाला नेली !

विनतेला आणि तिच्या मुलांना उपासमार होऊं लागली. खायचें झालें तर कद्रू सांगेल तें अन्न, सांगेल तितकें आणि सांगेल त्याच वेळीं घेतलें पाहिजे. एरव्हीं नाहीं, असा कडक निर्बंध कद्रूनें निर्माण केला होता. आपलीं मुलें अष्टौप्रहर त्यांच्या पाळतीवर ठेविलीं होतीं. कामाशिवाय स्वस्थ बसतात काय, आणि आपण सांगितल्याशिवाय त्यांच्या इच्छेप्रमाणें अन्न घेतात काय, हें सतत त्यांच्या बरोबर राहून पहाण्याचें काम सर्प आईच्या आज्ञेनुसार करीत होते !

उपाशीं पोटीं काम करावयाला लावण्याचा पराक्रम केल्याबद्दल मनांतून कद्रूला काय वाटत होतें हें सांगतां येणें कठीण आहे. परंतु कर्कोटकाला मात्र आपण हा अपूर्व विजय मिळविला आहे, असें खास वाटत असलें

पाहिजे. ज्याला पाहिलें कीं अंगाचा थरकांप व्हावयाचा, जो जवळ आला कीं हृदयांत धडकी भरावयाची, ज्यानें जरा डोळे मोठे करून पाहिलें कीं आपल्या डोळ्यापुढें हिरवीं तांबडीं चक्रें दिसावयाचीं, ज्याची एक चड-कण आपला प्राण यमसदनीं पाठवील, त्या गरुडाला व त्याबरोबर त्याच्या भावाला व आईलाही आपण उपाशीं पोटीं राबवूं लागलों, आपल्या आज्ञा पाळावयाला लावूं लागलों ही गोष्ट कर्कोटकासारख्याला अपूर्व विजयाची कां वाटणार नाहीं ?

उपासमार करीत पहाऱ्यांत ठेवल्यामुळें गरुडादिकांच्याकडे काय स्थिति झाली होती ? विनता अजूनही स्तब्धच होती. उपाशी तर उपाशी असें तिचें काम चालूं होतें. एक दिवस, दोन दिवस, महिनेच्या महिने त्यांनीं तसेंच काम चालविलें होतें. दिवसेंदिवस अन्नाचा कण पोटांत नसतांना काम करावयाला लागल्यामुळें क्षीणता येऊं लागली. शरीर थकूं लागलें. पोटांत आग पेटूं लागली. स्वातंत्र्यांतली ओलीकोरडी भाकर कद्रू खाऊं देईना आणि तिच्या मुलाबाळांचीं राहिलेलीं उष्टीं खाण्याचें या मंडळींच्या स्वप्नांतही येईना ! गरुडाला आतां तें असह्य झालें. त्याला आपल्या उपाशी पोटाचें कांहीं वाटेना, परंतु आपल्या समोर आपली आई उपाशी तडफडते आहे, तिला उठतां बसतां कष्ट होताहेत, चार दिवसांत तिच्यावर कळेची अवकळा आली आहे, असेंच आणखी कांहीं दिवस चाललें तर परीणाम काय होणार हें स्पष्ट दिसूं लागलें. हा कसला जुलूम ? हें कसलें परदास्य ! हें कसलें जिणें ? आणि हें जिणें काय म्हणून असें जगवावयाचें ? गरुडाच्या भडकलेल्या डोक्यांत विचारांची उलट गति होऊं लागली. ज्याचा शेवट हालांत, ज्याची अखेर अपमानांत, ज्याच्या अंतीं उपासमारीनें मृत्यूची झडप बसावयाची तें परदास्य आम्हीं कां पत्करावयाचें ? तें भयंकर परदास्य आम्हीं झुगारून कां देऊं नये ? आपण या परदास्यांत राहाणार नाहीं ! पारतंत्र्याच्या शृंखला ताड्ताड् तोडणार आणि स्वतंत्र होणार !

गरुडाच्या डोक्यांत एकएक विचार पेट घेऊं लागला. त्याचे नेत्र

खदिरांगाराप्रमाणें लालभडक झाले. त्याच्या सभोंवारचे पहारे वगैरे त्याला कांहीं एक दिसेनासे झाले. आपल्या आणि आईच्या भोंवतीचीं पारतंत्र्यांचीं बंधनें तोडावयाचीं कशी? काय करून तोडावयाचीं? काय बोलून तोडावयाचीं? हा एकच एक विचार गरुड धरून बसला! हें पारतंत्र्य नको. हें परदास्य नको! हा नरक नको! हा असह्य सेवाधर्मही नको! हाच एक ध्यास गरुड घेऊन बसला. सत्ताधाऱ्यांचा जुलूम पराकोटीला पोंचला, सत्ताधाऱ्यांचा दुष्टपणा व्याघ्रसिंहाच्या दाढा होऊन आपलीं नरडीं फोडूं लागला, तर स्वस्थ कोणाला बसवणार? जो जिवंत आहे, ज्याच्या ठिकाणीं थोडी तरी धुगधुगी आहे, तो सर्व शक्ती एकवटून त्यांतून सुटण्याची पराकाष्ठा कोण करणार नाहीं? मग गरुडाच्या विचारांचा भडका झाला तर त्यांत नवल काय?

गरुड संतप्त झाला खरा, त्याच्या नसान्नसा ताडताड उडूं लागल्या, मुठी वळूं लागल्या, जीभ वळवळूं लागली. पण तें अजूनपर्यंत आंतल्याआंत होत होतें. त्या सर्वांचा उद्रेक होऊन स्फोट व्हावयाचा होता. त्याला कारण पाहिजे होतें. परंतु तेंही कारण उपस्थित व्हावयाला वेळ लागला नाहीं. विनता रोजच्या प्रमाणें पाणी आणीत होती. डोक्यावर, कमरेवर, हातांत, असे घट होते. दहापांच खेपा झाल्याही होत्या. पुढच्या खेपेस उपाशीपणामुळें विनतेचे पाय लटपटूं लागले, डोळ्यापुढें अंधेरी येऊं लागली. ती तशीच पाऊल पुढें टाकीत होती. पण असें कुठवर निभणार? ती स्वतःला सावरून घेण्याकरितां किंचित् थांबली. पण त्या थांबण्याचा कांहीं एक उपयोग न होतां तिला अधिकच भोंवळ आली. हातांतला घट सुटला. ती तेवढ्यांत मटकन् खालीं बसली, तों डोकीवर दुसरा घड कलंडला! हें जवळपास वावरणाऱ्या कांहीं सर्पांनीं पाहिलें, ते तसेच धांवत धांवत तिच्या जवळ आले. उन्मत्तच ते! त्यांना वाटलें ही मुद्दाम ढोंग करीत आहे. म्हणून जवळ येतांच "ऊठ, बसलीस काय? प्रत्येक काम असं अळंटळं करीत करायचं काय?" असें एकजण म्हणाला.

दुसऱ्यानें उर्मटपणानें विनतेचा हात धरून तिला उठविण्याचा प्रयत्न

केला. हें दुरून गरुडानें पाहिलें. आपल्या आईला भोंवळ आली. ती मट-कन् खालीं बसली आणि तशांत सर्पमंडळी तिला सतावीत आहेत, असें दिसतांच गरुडाला विलक्षण चेव आला. तो तसाच तीरासारखा धांवत त्या ठिकाणीं आला. त्यानें मागला पुढला विचार केला नाहीं. ज्यानें त्याच्या आईचा हात धरला होता, त्याची मानगुटी पकडून त्याला एकदम मागें खेचून दूर भिरकावून दिलें. दुसरा जो उर्मटपणानें तोंडसुख घेत होता, अरेरावी दाखवीत होता, त्याच्या बरगडींत असा एक जोराचा गुद्दा गरुडानें ठेऊन दिला कीं, त्या गुद्यासरसा तीरीमिरी येऊन तो सर्प कोठच्या-कुठें जाऊन पडला! गरुडाच्या हातून हें सर्व इतक्या अल्पावकाशांत झालें, कीं त्यामुळें कोणाला काय झालें, कसें झालें, आपण कुठें आहोंत, वगैरे क्षणभर कांहींच कळलें नाहीं.

सर्पांचे तर डोळेच मिटले त्यांची दाणादाण झाली. कित्येक जण सैरा-वैरा पळूं लागले. गरुडाच्या क्रुद्ध मुद्रेकडे पाहण्याची एकाचीही सोय नव्हती!

गरुडानें त्याच स्थितींत विनतेच्या डोक्यावरील घट बाजूला ठेवले. कमरेवरीलही घट काढून घेतला. तिला हुशारी येण्याकरितां वस्त्रानें वारा घालण्यास सुरुवात केली. आईच्या पाठीशीं बसून तिचें मस्तक आपल्या अंगावर टेकविलें.

तिचें मस्तक हळूं हळूं चेपूं लागला. जवळच्या घटांतील पाणी डोळ्याला लावलें. विनतेची भोंवळ कमी व्हावयाचीच होती!

गरुडानें आपल्या कल्पनेप्रमाणें उलटलेल्या विचाराप्रमाणें मातृसेवेला असा आरंभ केला!

विनतेनें डोळे उघडले. सभोंवार पाहिलें. गरुडाकडे पाहिलें. यावेळीं गरुड डोकें चेपीत होता. अरुण वारा घालीत पुढें उभा होता! विनतेनें दोघांनाही पाहिलें. पुन्हां तिला भोंवळ आली. तिनें नेत्र मिटून घेतले. डोळे उघड ण्याच्या आणि मिटण्याच्या मधल्या वेळांत ती उद्गारली:—

"बाळ!—"

" आई !–काय ग–स्वस्थ अं जरा ! " गरुड आईकडे पहात तिला सावरीत म्हणाला. पण ती त्यावेळीं फिरून बेशुद्ध झाली होती.

गरुडानें सर्पांची केलेली दाणादाण, उडविलेली तारंबळ, मारलेले ठोसे, ही सर्व हकीकत तात्काळ कांहीं सर्पांनीं धांवतपळत जाऊन कद्रूच्या कानीं घातली. हा अनपेक्षित प्रकार ऐकून कद्रू आश्चर्यचकितच झाली. तिचा आपल्या कानांवर भरंवसाच बसेना ! गरुड उलटला. त्यानें आपली मर्यादा सोडली.आपली सत्ता झुगारली,स्वस्थिति विसरला. सेवाधर्म टाकला,कद्रूला हें ऐकून कसेंसेंच झालें. तिच्या डोक्यांत एकाएकीं भलभलत्या कल्पना येऊं लागल्या ! काय, आपली सद्दी इतक्यांतच संपुष्टांत येत चालली ! आपल्या तावडींतून आपली सवत मुक्त होणार ? आणि खरेंच तसें झालें तर ?–तर ?–छेः आपण तसें होऊंच देणार नाहीं. सवतीला कधींही आपण स्वातंत्र्य देणार नाहीं ! ती आतां कल्पनाच नको. कद्रूच्या डोक्यांत भराभर उलटसुलट विचार सारखे धिंगाणा घालीत होते. काय करावें, यावेळीं आपण कसें वागावें, उलट घेऊं पाहणाऱ्या गरुडाला जागच्याजागी कसें चेपून टाकावें, त्याचा भडकलेला संताप कसा थंड करावा ? आपणही क्रोधाविष्ट यावेळीं व्हावें कीं नको ? निश्चितपणें कसें वागावयाचें हें ठरविण्यासाठीं कद्रूला आपल्या कर्कोटकाची आवश्यकता भासली. तिनें त्याला लगेच बोलाविलें.

कद्रूचें बोलावणें आलें त्यावेळीं कर्कोटक चंद्रलोकीं त्या रूपवतीसह विलास विहार करीत होता. परस्परांनीं परस्परांच्या गळयांत गळे घातले होते, करपाशीं कंठ दिले होते. मधुमधुर वाणी परस्परप्रशंसानी अहोरूप-महोध्वनिचें कार्य करीत होती ! कर्कोटक त्या रूपवतीला 'प्राणवल्लभे' असें संबोधित होता, तर सुन्दरी हंसत मुखानें पंचप्राणांच्या 'प्राणेश्वरा' म्हणत पुन्हा पुन्हा दृढालिंगन देत होती ! अशाप्रकारें विलासांत दंग असल्यामुळें आपल्याला आईचें बोलावणें आलें आहे, हें त्यांना समजलेंच नाहीं. बोलावयाला आलेला सर्प कितीतरी वेळ तेथें उभा होता. त्यानें हळूंच हाक मारली. त्याची दादच नाहीं. उशीर झाला तर तिकडून आई

# प्रकरण नववें

रागवेल ही त्याला भीति पडली. आपल्यापेक्षांही कर्कोटकावर त्या रूपवतीचें प्रेम फारच आहे हें पाहून त्या सर्पाला तशाही स्थितींत कसेसेंच वाटलें. त्याला किंचित् वैमनस्य वाटलें. थोडासा हें त्या स्त्रीचा रागसुद्धां आला. त्याच रागाच्या झटक्यांत कर्कोटकाला त्यानें मोठ्यानें हांक मारली! या वेळीं कर्कोटकाचें लक्ष त्याच्याकडे वेधलें. 'काय आहे?' अशा अर्थानें नुसतें त्या सर्पाकडे कर्कोटकानें पाहिलें. बोलला नाहीं, किंवा ज्या अवस्थेंत तो होता, त्यांत त्यानें किंचिन्मात्र फरकही केला नाहीं. आपल्या आईचें तात्काळ भेटीला येण्याबद्दल बोलावणें आहे असें कळल्यावर त्यानें आंबट तोंड केलें. त्या रूपवती स्त्रीचेंही पण तसेंच तोंड झालें.

"आईनं बोलावलं आहे, जाऊं का?–" कर्कोटकानें त्या स्त्रीला विचारलें.

"मला सोडून? या आलिंगनसौख्याला दूर लोटून? रूपवतीनें उलट प्रश्न केला.

"पण आईनं बोलाविलं आहे—"

"तुमच्या आईला आतां चळ भरला आहे. तिला वडिलपणाची घमेंड आली आहे. तुम्हीं मानतां म्हणून! या वडिलमंडळींना आपलं शृंगारसौख्य पहावतच नाहीं! माझ्या शृंगारसौख्यांत भंग झालेला मला मुळींच खपायचा नाहीं. सांगून ठेवतें. आपण जाऊं नये. मी इथून आपल्याला सोडणार नाहीं!"

कर्कोटकाला तेंच पाहिजे होतें. तिला दूर लोटून आईच्या आज्ञेप्रमाणें निघून जाण्याऐवजीं कांहींशा शिथील झालेल्या आलिंगनाला फिरून त्यानें दृढता आणली! बिचारा निरोप्या सर्प जीभ बाहेर काढून तेथेंच मूढ होऊन उभा राहिला!

ज्या वेळीं येथें हा प्रकार चालला होता, कद्रू कर्कोटकाची मार्गप्रतीक्षा करीत आपल्या ठिकाणीं उगाचच विचारांच्या वाढत्या गतीबरोबर इकडून तिकडे तिकडून इकडे नाचत होती, त्या वेळीं विनता हळूं हळूं सावध होत चालली होती. विनता सावध झाली. सभोंवती तिनें पाहिलें. घड-

लेला प्रकार तिच्या ध्यानांत आला. तिला वाईट वाटलें. गरुडापासून ती दूर सरकली. अरुणाला खुणेनें वारा पुरें कर म्हणून सांगितलें आणि ती उठून घट घेण्याचा प्रयत्न करूं लागली. तिचा उद्देश ओळखून गरुडानें तिला त्या उद्योगापासून परावृत्त केलें. तिनें त्यांतून उठण्याचा प्रयत्न केला. उठलीही. पण लगेच तिला मूर्च्छा आली. गरुडानें तिला झट्कन् सांवरून धरलें म्हणून बरें झालें. पण तिला विलक्षण अशक्तता आली होती. उठवेनाचा तिला. तरी तिची धडपड चालूं होतीच. त्याबद्दल गरुडाला राग आला. तो आईवरच रागावून ओरडला—

" हें काय आई? पुरे कट तें! पडूं देत ते घर जागच्या जागींच! मी तुला तें उचलूं देणार नाहीं. परदास्याचें कोणतेंही काम या क्षणापासून आई मी तुला करूं देणार नाहीं."

" असं कसं म्हणतोस बाळ? मी दासी आहें. मला तसं कसं म्हणतां येईल? स्वस्थ कसं बसतां येईल? स्वतंत्र कसं होतां होईल?" विनता एकेक शब्द उच्चारीत होती. एकेक शब्दाबरोबर तिच्या नेत्रांतून अश्रू खालीं टिबकत होते!

" आई! मी असंच म्हणणार! माझी आई आतां कोणाचीही दासी नाहीं. मी तिला दासी राहूं देणार नाहीं! आई, तूं म्हणूं नकोस, मी म्हणणार! तेवढ्याच करतां माझा पिंड आहे. मी आतां स्वस्थ बसणार नाहीं. गप्प बसणार नाहीं! आई, आतां माझ्यावर ब्रम्हांड कोसळो कीं, कसलीही आपत्ति येवो. पंचमहाभूतें पिसाळून—खवळून माझ्यावर चाल करून येवोत; पण मी पाय मागें घेणार नाहीं. मी तुला स्वतंत्र करणार! तुझ्या पायांतल्या पारतंत्र्याच्या शृंखला प्रयत्नांच्या घणाच्या घावांनीं निखळून टाकणार आणि माझ्या आईला स्वतंत्र करणार! त्रिवार सांगतों आई, तूं स्वतंत्र होणार! स्वतंत्र होणार! स्वतंत्र होणार!"

गरुडाची गर्जना आसमंतात धुमत होती! त्याची वाणी उकलली होती. त्याची वाणीच काय, पण अवघे शरीर रोमरोमांतून बोलत होतें,

## प्रकरण नववें

' विनता स्वतंत्र होणार आपण तिला स्वतंत्र करणार ! पारतंत्र्य झुगारून भिरकावून देणार ! '

दुरून येणाऱ्या कद्रूच्या कानांत ते शब्द घुसत होते. त्यासरशीं तिच्या सर्वांगाची लाही लाही होत होती. एखाद्या खवळलेल्या नागीणीप्रमाणें, चवताळलेल्या वाघीणीप्रमाणें, भुकजलेल्या सिंहीणीप्रमाणें झापा टाकीत ती येत होती ! वाटेंत येतायेतांच गरुडाच्या शब्दांचे प्रतिध्वनि, एकतारखे तिच्या रागाच्या आगींत तेल ओतीत होते.

" बाळ, तुझे शब्द अमृतापेक्षां मधुर वाटतात ! सत्य होतील असा भरंवसा वाटतो ! पण, देव जाणें, माझं तितकं भाग्य आहे कीं नाहीं ? बाळ, खरंच सांग, मी कधीं तरी स्वतंत्र होईन काय ? तुम्हीं मला स्वतंत्र कराल काय ? माझ्या पापाचं क्षालन युगांतरीं होईल काय ?—बाळ, मी स्वतंत्र होणार ! तुम्हीं मला स्वतंत्र करणार ! किती सुखद कल्पना ही ? किती रम्य आशा ही ? बाळ, माझं दुर्दैव, ही कल्पना, कल्पनाच ठरविणार नाहीं ना ? ही आशा निराशाच होणार नाहीं ना ?" विनता एकेक शब्द, एकेक वाक्य क्षीणतेमुळें सावकाश उच्चारीत होती. इतकें बोलण्याचेंही त्राण तिच्यांत उरलें नव्हतें. परंतु सुखद स्वातंत्र्याच्या नुसत्या कल्पनेनें तिच्यांत नवजीवनाचा संचार होत होता व तो तिला बोलवीत होता !

" आई ! आई ! तूं इतकी निराश कां होतेस ? आम्हांला तूं जन्म तरी कशाला दिला आहेस ? आम्हीं तुला स्वतंत्र करणार ! आई, तूं स्वतंत्र होणार. तूं अशी पारतंत्र्यांत, खिचपत खिचपत उपाशीं पोटीं मरण्याकरितां जन्म घेतलेला नाहींस ! आणि तसें तुझें मरण पाहण्याकरितां आम्हींही जन्माला आलेलों नाहीं. तुझी पारतंत्र्यांतून मुक्तता करण्याकरितां जर आमचा जन्म नसेल, तर हें जिणें मला हवं कशाला ? ऐक आई, तुझे पारतंत्र्याचे दिवस संपले. तुझा दुःखाचा काळ आटोपला. आम्हांला वाटेल तें दिव्य करावयाला लागूं दे. पावलोंपावलीं आमच्या प्राणांचे बळी देण्याचा प्रसंग ओढवूं दे. क्षणाक्षणाला आमचे प्राण वेंचण्याची पाळी आमच्यावर

येऊं दे. आम्हीं माघार घेणार नाहीं. आई, तुझा बाळ तुला स्वतंत्र करणार !—"

" कोण कोणाला स्वतंत्र करणार ? गरुडा, काय बोलतो आहेस पुन्हां बोल ? " संतापानें फणफणत असलेली कद्रू तेथें येऊन ओरडली !

" आज्ञा प्रमाण ! माई, मी आईला सांगतों आहे कीं आई, मी तुला पारतंत्र्यांतून सोडविणार ! "

" गरुडा, तूं कोणासमोर बोलतो आहेस ? काय बोलतो आहेस ? याची तुला शुद्धि आहे काय ? "

" होय. मला पूर्ण शुद्धी आहे. माझ्या आईला जिनें आपली दासी केली आहे, जिनें माझ्या आईला उमासमार घातली आहे, त्या माझ्या सावत्र आईपुढें मी बोलतों आहें—तिच्याच आज्ञेनें बोलतों आहें—आणि माझ्या आईला मी स्वतंत्र करणार, पारतंत्र्यांतून सोडविणार, हेंच बोलतों आहें ! "

गरुडाच्या शब्दाशब्दानें कद्रूच्या अंगाला पलिते लागत होते. तिच्या सत्तेचा संताप तिच्या नसानसांतून थयथयत होता ! तर गरुडाच्या मुखश्रीवर उज्वल मातृप्रेम—मातृभक्ति ठाण मांडून बसली होती !

आजवर मुग्ध असलेला, आज्ञाधारक वाटणारा गरुड असें एकाएकी उग्र रूप धारण करील, असा चवताळून उठेल ही कल्पनाही कद्रूला नव्हती ! गरुडाच्या या वेळच्या तेजाकडे पाहून कद्रू दिपून गेली. मनाशीं खिन्न झाली. तिच्या हृदयांत चर्रर झाल्याशिवाय राहिलें नाहीं. कर्कोटक तेथें आलाच होता. बाकीची सर्प मंडळीही तेथें गोळा झाली होती. त्यांच्याबरोबर ती मायाविनीही होतीच ! कद्रूचा संताप जसजसा चढत असे, तसतसा कर्कोटकही संतापत असे. गरुडाच्या अंगावर चाल करून जाण्याचें त्याच्या वारंवार मनांत येई. इतर सर्पही आपल्या शेपट्या जमिनीवर आपटीत गरुडाशीं व अरुणाशीं लगट करून त्यांना सतावण्याचें ठरवित, पण गरुडाची दृष्टि एकदां चोहोंकडे फिरली कीं, सर्वांचें शौर्य जाग-

च्याजागींच गारठलें जाई ! गरुडाची कित्येकांच्या दृष्टिला दृष्टी भिडली कीं सर्प ची ची करीत कोठच्या कोठें मागचा पाय काढीत !

गरुडाचा या वेळचा आवेशच कांहीं विलक्षण होता. कद्रूला त्याच्या त्या आवेशाचा, संतापाचा, बोलण्याचा या कशाचाच अंदाजच येईना ! तिनें आपल्या सर्व मुलांकडे दृष्टि फेकली. पण एकांतही गरुडाशीं टक्कर देईल असें पाणी दिसेना. पण करणार काय ? मनांतल्यामनांत बसलेला चटका ती बाहेर कसा दिसून येणार ? आपलें वैगुण्य कसें उघडे करणार ! तिच्या हातांत सत्तेची शक्ति होती व तीच घट्ट धरून ठेवण्याचा तिचा दांडगा संकल्प होता ! गरुड आपल्या प्रश्नाला उत्तर देतो आहे, बरोबरीचें नातें दाखवितो आहे, हें तिला कसें सहन व्हावें ? तिला ते गरुडाचे उद्गार ऐकावयाला सुद्धां असह्य होते !

आपला पाणउतारा होतो आहे, हें दाखविण्याकरितां कद्रूनें गरुडाशीं बोलावयाचें सोडून ती विनतेकडे वळली. पूर्वीप्रमाणें विनतेकडूनच गरुडाला गप्प बसवावयाचें असें तिनें ठरविलें. तो डाव तिचा अगदीं ठरलेला होता. त्याच आधारावर ती अधिकाराच्या आवाजांत म्हणाली:—

" काय ग भाई, तुझं हें पोरटं कशी कशी जीभ चालवते आहे, ऐकतेस काय ? का त्याला तुझीच फूस आहे ? बोल. त्याला तूं बोलतां बंद करतेस कीं नाहीं ?—"

" माई, तुम्हीं आईला विचारूंच नका ! " गरुड मध्येंच म्हणाला, " आई बोलणार काय आणि तुम्हीं ऐकणार काय ? आणि तिनें कांहीं जरी म्हटलं तरी यावेळीं आम्हीं तिचें ऐकणारही नाहीं लक्षांत ठेवा ! ती काय, म्हणेलही ' मी अशीच परदास्यांत उपाशीपोटीं राहून, हाल अपेष्टा करून मरून जाईन ! ' पण हें काय मी ऐकेन ? मी तिला तशी मरूं देईन ? मी तिला तशीच पारतंत्र्यांत पिचत ठेवीन काय ?"

" उन्मत्ता ? घमेंडखोरा, उमेटा, कशी रे तूं आपल्या आईला स्वतंत्र करणार ? ती माझी दासी आहे ! तिला स्वतंत्र करणं किंवा परतंत्र ठेवणें

माझ्या इच्छेवर अवलंबून आहे! मी तिला कधीं काळीं स्वतंत्र करीन असें तुला वाटतं तरी कसें?—" कद्रू कडाडली!

" कद्रूमाई, हें मी तुम्हांलाच विचारतों. माझ्या आईला केव्हां स्वतंत्र करणार? दासीपणांतून केव्हां मुक्त करणार?" " तें तर कालत्रयीं माझ्या हातून येणार नाहीं." कद्रूनें सर्व शक्ति एकवटून सांगितलें.

" मला हें ऐकावयालाच येत नाहीं! हें मी माझ्या कानांना ऐकूंच देणार नाहीं!" गरुडानें पण तितक्याच निकरानें उत्तर दिलें.

" मग काय रे अकलेच्या कांद्या माझ्याकडून ऐकायचं आहे?" कद्रू त्याच्यावर चवताळून ओरडली, " तुझ्या आईला माझ्याकडून स्वातंत्र्य पाहिजे–"

" होय!" गरुडानें मध्येंच गर्जना केली. " हेंच तुमच्या तोंडून ऐकावयाचें आहे. 'आईची स्वतंत्रता' हाच माझा प्रश्न आणि हेंच माझें उत्तर! आई स्वतंत्र होईपर्यंत माझी जीभ या मन्त्रावाचून दुसरा कोणताही शब्द उच्चारणार नाहीं. दुसरा कोणताही विचार मनांत आणणार नाहीं. गरुडाच्या डोक्याला 'माझ्या आईचें स्वातंत्र्य' याशिवाय दुसरी कोणतीही कल्पना शिवणार नाहीं. या महामंत्राच्या चिंतनाशिवाय, साधनाशिवाय, सिद्धीशिवाय माझें मन क्षणभरही विश्रांति घेणार नाहीं. या मन्त्राच्या उच्चाराशिवाय माझी जीभ अन्नाचा कणही पोटांत घेणार नाहीं! बोला, कद्रूमाई बोला, माझ्या आईला स्वातंत्र्य केव्हां देणार?—"

" स्वातंत्र्य केव्हां देणार?" हेटाळणीचं विकट हास्य करून, तुच्छतेनं पाहून, कद्रू म्हणाली, " मूर्ख मुला, स्वातंत्र्य द्यावयाला, तें काय पोरखेळ आहे का! वाटेवर पडलेलं आहे, कीं तें सहज उचलून द्यायचं?"

" आकाशांतल्या चंद्रसूर्याइतकं तें दुर्मिळ आहे–इतकं तें दूर ठेवलें आहे काय?" गरुडानें पृच्छा केली!

" होय! होय! तितकंच तें दुर्मिळ आहे. तितकंच तें दूर आहे!" कद्रू उत्तरली.

" मग तें इतरांना दुर्मिळ असेल, दूर असेल, मला नाहीं. कद्रूमाई,

## प्रकरण नववें

मी जन्म पावतांच सूर्यमंडळ कवळावयाला धांवलों होतों, तो कंदूक करून त्यानें खेळण्याचा बाळ हट्ट धरला होता, हें अजून जर आपण विसरलां नसाल, तर मी म्हणतों तें आपल्याला पटल्यावांचून राहणार नाहीं! तुमच्या हातून माझ्या आईला स्वातंत्र्य मिळणें त्यापेक्षां कठीण आहे काय ?" या गरुडाच्या गर्जनेनें कद्रू खरोखरीच गडबडली. गरुड कोणत्याही दटावणीला दबकत नाहीं. हेटाळणीला हटत नाहीं, असें पाहून ती निरुत्तर झाल्यासारखी झाली. तिचें निरुत्तर होणें तिला तापदायक होतंच. पण गरुडालाही तें असह्य होतं. ती स्तब्ध राहिली. कांहींच उत्तर येईना. तो स्तब्धतेचा एकेक क्षण म्हणजे सामान्य जनतेची शतकेंच्या शतकेंच म्हणावयाची! 'होय' नाहीं किंवा 'नाहीं' नाहीं. या स्थितींत धीर कसा धरतां येणार? गरुडाला ती स्तब्धता गुदमरून सोडूं लागली. त्यानें कद्रूला पुन्हां तोच प्रश्न केला, आणि उत्तरासाठीं अधीर झाला.

कद्रू निरुत्तर झाली हें पाहून सर्पमंडळींत बरीच गडबड उडाली. आतां आई काय उत्तर देणार? विनतेला व तिच्या मुलांना स्वातंत्र्य कबूल करते कीं काय? तें कबूल केलें तर भरलींच आपलीं शंभर संवत्सरें पुरीं! गरुड आपणां सर्वांना कशाला मग जीवंत ठेवतो आहे? हेंच ज्याच्या त्याच्या मनांत. त्यांच्या बरोबर असलेल्या मायाविनीला सुद्धां पंचाईत पडली. ती कद्रूकडे आणि सर्वांकडे आळीपाळीनें पहातच राहिली. तिला मध्येंच वाटलें कीं, कद्रू आपल्याला सल्ला विचारील. त्याकरितां ती आपल्या डोक्याला शीण देऊं लागली. कद्रूनें एकदा दोनदां तिच्याकडे पाहिलें, पण तिला कांहींच विचारलें नाहीं. म्हणून तिला बरेंही वाटलें, व रागाही आला, या प्रसंगीं सर्पांचा नसता क्रूरपणा, त्याबरोबर भीरूपणा तिनें पाहिला, त्याबरोबरच गरुडाचा खंबीरपणा, तेजस्विता, स्वातंत्र्याचें पाणी, वगैरे पाहून ती अगदीं दिपून गेली. त्या तशाही स्थितींत "वाः वीर पुरुष!" असेही कदाचित् तिच्या मुखांत उद्गार घोंटाळले असतील! नाहीं म्हणून कोणी सांगावें. पण त्यापेक्षां तिचें लक्ष त्यावेळीं सर्व सर्पांप्रमाणें कद्रू पुढें गरुडाला काय सांगतें, याकडेच लागलें

होतें. कद्रू घोटळली आहे, गडबडली आहे हें गरुडाच्या ध्यानांत आल्या-शिवाय राहिलें नव्हतें. आतां तिनें अधिक कठोर होऊं नये किंवा दुष्ट विचारांच्या नादीं लागूं नये म्हणून गरुडानें आपला पहिला कठोरपणा सोडून दिला. कांहींसा नम्रभाव धारण करून क ूला करुणा येईल व ती आपल्या आईच्या स्वातंत्र्याची ग्वाही देईल. तिनें ती द्यावी म्हणून तो होऊनच पुन्हां म्हणाला, "कद्रूमाई, तुम्हीं माझ्या आईवर कधीं तरी खरें-खुरें प्रेम केलं असेल, माझ्या आईला खऱ्याखऱ्या प्रेमानं केव्हां तरी क्षण दोन क्षण वागविल असेल, तर त्या काळाचं स्मरण करा, त्या प्रसंगांना आठवा, तें निर्व्याज, निर्हेतुक, स्वर्गीय प्रेम ध्यानांत आणा, आणि माझ्या आईला स्वातंत्र्याची ग्वाही द्या. माझी आई तुमची दासी झाल्यावर, तुमच्या सेवेंत कधींही अंतर केलं नसेल, तिच्या सेवेनं केव्हां काळीं क्षण-मात्र तुम्हीं संतुष्ट झाला असाल. त्या संतुष्टतेची साक्ष द्या आणि माझ्या आईच्या स्वातंत्र्याची ग्वाही द्या! कद्रूमाई, माझ्या आईला परतंत्र तुम्हींच केलें आहे आणि तुम्हींच तिला स्वातंत्र्य देणार आहांत. तुमच्या मनोदेव-तेला यामुळें कोणताही कमीपणा न येता त्या देवपणांत अधिक भरच पडेल. तिची सत्कीर्ती जगत्त्रयांत होईल. माझ्या आईच्या स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं तुमच्या मनोदेवतेनें आपल्या समाधानासाठीं या गरुडाला केवढेंही भयंकर दिव्य करावयाला सांगावें, तें दिव्य तो आनंदानें करून दाखवील. माझ्या आईच्या स्वातंत्र्यसुखासाठीं प्राणाप्राणांचें मोल तुमच्या चरणीं वहाव-याला मी सज्ज आहें! कद्रूमाई, आमचे प्राण घ्या. आम्हांला उपाशीं ठेवा. पण माझ्या आईला स्वातंत्र्य द्या!"

"नको रे! बाळ, असं अभद्र बोलूं नको! तुम्हीं मला अंतरल्यानंतर मला त्या स्वातंत्र्याला काय करायचं आहे रे? तुम्हीं आहांत तर मला तें स्वातंत्र्य गोड. नाहीं तर विषाहून कडू आहे! ताई, माझ्या परमपूज्य राणी, माझ्या बाळांचा बळी घेऊन मला कसल्याही स्वातंत्र्याची गरज नाहीं!" विनता मध्येंच उठून, कशीबशी राहून, कण्हत, विवळत म्हणाली. गरुड तिच्याकडे सादर दृष्टीनें पहातच राहिला. कद्रू अधिकच

## प्रकरण नववें

गोंधळांत पडली. गरुडाच्या व विनतेच्या बोलण्यानें खिजून जाऊन कद्रू कडाडली, " हें काय लावलें आहे तुम्हीं माझ्या मागें ? काय चालवलें आहे हें ? कशासाठीं ? "

" आईच्या जीवितासाठीं ! आईच्या प्राणासाठीं ! शीलासाठीं ! स्वातंत्र्यासाठीं ! " गरुड चट्कन उत्तरला !

आतां कांहीं तरी उत्तर दिल्याखेरीज गत्यंतर नाहीं, हें कद्रूला कळून चुकलें. कर्कोटकादि मंडळींच्या मनांत जी भीति उत्पन्न झाली होती, तीच भीति कद्रूला उत्पन्न झालीच होती. उत्तर तर द्यावयाचें. पण स्वातंत्र्य देणें टाळावाचें हें कद्रूच्या मनानें घेतलें होतें व त्याचा ती विचार करीत होती.

ती विचारांत असतांच गरुडानें पुन्हां तोच प्रश्न केला:—

" कद्रूमाई, माझ्या आईच्या स्वातंत्र्याची ग्वाही—"

" मूर्खा, स्वातंत्र्य मागून मिळत नसतें—"

" हिसकावून घेण्याची आज्ञा करा, त्यालाही माझी तयारी आहे, हें मी मघाशींच बोलून दाखविलें आहे. बालकाचा पराक्रम मातेला पहाण्याची इच्छाच असेल, तर बालक तरी मागें कां घेईल ? कद्रूमाईनीं तशी आज्ञा करावी; कितीही दुष्प्राप्य वस्तु साध्य करण्याची शक्ति देवदयेनें, मातेच्या आशीर्वादानें गरुडाच्या आंगांत खेळत आहे हें विदितच आहे. " गरुडाचें हें उत्तर तयारच होतें. आतां गरुड उत्तर द्यावयाला कचरत नव्हता ! सर्वांनाच प्राण प्रिय असतात ! त्या प्राणांवरच बेतविल्यावर कोण बोलता राहील ? शिवाय कद्रूनेंच चवताळून येऊन त्याला बोलता केला होता. गरुडाचें हें उत्तर कद्रूला जहरापेक्षांही जास्त झोंबलें. पण त्यांतच तिला एक उत्तर देण्याला आधार मिळाला. 'दुष्प्राप्य वस्तु साध्य करण्याची शक्ति जवळ असण्याची जर घमेंड गरुड मारतो आहे, तर तेंच त्याला सांगावें. दुष्प्राप्यच असल्यामुळें त्याला तें कधींच प्राप्त होणार नाहीं. आपण निर्धास्त राहूं. बरें मिळाली, ती आपण घेतली, तरी आपण त्या जोरावर त्यांच्यावर वर्चस्व गाजवूं, हें तिनें जाणलें. अशी वस्तु तिच्या दृष्टीनें जगांत एकच

होती. ती म्हणजे ' अमृत ! ' अमृत सागरांतून निघालें, तें देवांनीं नेलें. इतरांना तें दुष्प्राप्यच राहिलें. कोणी त्याचें रूप–रंग–रुचि–गंधही पाहिलीं नाहींत ! तें मागितल्यास त्याच्या सेवनानें आपण सर्व अमर राहू व त्यामुळेंच निरंतरचें यांच्यावर श्रेष्ठत्व ठेऊं. ' हा विचार कद्रूला चांगलाच ग्राह्य वाटला. सागरांतल्या उच्चैश्रवा या रत्नाच्या वर्णाच्या नुसत्या वादानें आपल्याला हें वैभव दिलें, तर ' अमृत ' मिळालें तें वैभव निरंतरचें कां टिकणार नाहीं ? अर्थात् टिकणारच ! तेव्हां ही दुष्प्राप्य गोष्ट गरुडाला सांगितली पाहिजे. हा तिचा निश्चय झाला. त्या बरोबर तिला बरें वाटलें.

" कद्रूमाई, आपली मनोदेवता कांहींच कौल देत नाहीं काय ?" गरुडानें निकरानें तिसऱ्यांदा विचारलें.

" घमेंडखोरा, तुझ्या शक्तीचा तुला अभिमान आहे. आत्मविश्वास वाटतो. तर ऐक ! तूं दुःष्प्राप्य वस्तु साध्य करतोस नाहीं ? कर सागरांतून निघालेलं अमृत देवांनीं स्वर्गांत नेलं आहे, तें आम्हांला अप्राप्य आहे. त्याची वांच्छा आम्हांला आहे. तें ' अमृत ' आण. मला आणि माझ्या मुलाबाळांना पाज. त्या क्षणीं तुझी आई स्वतंत्र आहे ! "

" काय ? ' अमृत ' आणल्यावर माझी आई स्वतंत्र ! ती दुष्प्राप्य वस्तु आणावयाची ? तें अप्राप्य रत्न तुमच्या चरणीं आणून द्यावयाचें ?" गरुड अत्यानंदानें मोठ्यानें म्हणाला "आपली आई स्वतंत्र होणार, कद्रू आतां तिचें पारतंत्र काढून टाकणार, हेच शब्द त्याला अमृतापेक्षां मधुर वाटले. त्यापुढें ' अमृत ' प्राप्ती कस्पटाप्रमाणें वाटत होती. तो आणखी आनंदानें हुरळून म्हणाला " कद्रूमाई, तुम्हांला शतशः प्रणाम असोत. तुम्हीं खऱ्याच मोठ्या उदार अंतःकरणाच्या आहांत ! माझ्या आईच्या स्वातंत्र्यप्राप्तीचा मार्ग मोकळ्या अंतःकरणानें स्पष्ट सांगितलात, हे उपकार, हें ऋण मी जन्मजन्मांतरीं विसरणार नाहीं! ' अमृत ' आणल्यानंतर माझी माता स्वतंत्र आहे ना ? "

" होय ! होय ! होय ! " कद्रूची वाणी वदली.

## प्रकरण नववें.

"तथास्तु !" गरुड गडबडीनें दोन्हीं मातांना प्रणाम करून तेथून "हा निघालों," म्हणून चालता झाला !

कद्रू चकित दृष्टिनें गरुडाकडे पहात राहिली ! विनता कोणत्या अज्ञान कारणानें अश्रू ढाळीत होती. तिचे ते अश्रु आनंदाचे होते कीं दुःखाचे होते कोण जाणें ! सर्प मंडळी आपल्याला अमृत प्राशन करावयाला मिळ-णार काय ? याच विचारांत गुंतले. 'अमृत' येथें येणार, गरुड आणणार हे शब्द कानांवर पडतांच त्या रूपवती मायाविनीचें तोंड खर्रकन् उतरलें. ती तत्क्षणीं तेथून चालती झाली !



*

# प्रकरण दहावें

–मज दुबळीची असेल नसेल ती सर्व पुण्याई सदासर्वकाळ तुझ्या पाठीशीं–
उभी असो !

अमावास्येचा अंधःकार उजाडेपर्यंत असणारच. मध्यंतरीं कितीही प्रकाशाची अपेक्षा केली तरी ती सफल कशी येणार? तशा अंधःकारांत आकाशांत अनंत तारका लुकलुकतात. प्रकाश देण्याची त्यांची अनिवार इच्छा असते, त्या प्रमाणें त्या जिवापाड झटतातही. पण त्यांचा प्रकाश अंधःकाराची भीषणता वाढविण्याकडेच अधिक उपयोग होत असतो. प्रकाशकिरणाची निश्चितता त्यांत नसते. लुकलुकावें, लुप्त व्हावें आणि अंधःकारच दुणावत जावा ! अशा अंधःकारांत मार्गक्रमण करण्याचें ज्यांच्या ललाटी लिहिलेलें असतें, त्यांना अवघी रात्र त्या अंधःकारानें दिलेले क्लेश निमूटपणें सोसावे लागतातच. पाउल पुढें पडतें खरें, पण तें कुठें आणि कसें पडतें, हें दिसतच नाहीं; पुढचें पाउल काट्याकुट्यांतच पडतें, नदी नाल्यांत बुडतें, कीं कराल कडा चढावयाला लावतें, आणि त्या सर्वांच्या शेवटीं काय ? याचा उगम अमावास्येचा काळोख मुळींच पडूं देत नाहीं. पण तशांतूनच कंटकपणानें पुढें चालूं लागलें म्हणजे केव्हां तरी प्रातःकाळ प्राप्त होतो, दिशा फाकतात, प्रकाश किरणें येऊं लागतात, आणि आशेला नवी पालवी फुटून जीवाला पुढच्या चालीविषयीं धीर येतो ! दिवसाच्या प्रवासांत कितीही बिकट प्रवास असला तरी त्याची पुरेपूर कल्पना असल्यामुळें प्रवाशाला तितकें कांहीं वाटत नाहीं. तो तितक्या तऱ्हेनें आपल्या मनाची तयारी करतो. पण अंधःकारांतील मार्ग सरळ सपाटीचा असला तरी देखील काट्याकुट्यांनीं गजबजलेला, गिरीकुट्टरानीं अडविलेला, नदीनाल्यांनीं नडविलेला असला पाहिजे, असें वाटून प्रवास दुर्घट होतो मग तो खराखुरा असला तर विचारावयाची सोयच नाहीं. त्यांतून सुखरूप येणें कठीणच ! तशा प्रवाशाला त्याच्या सुदैवानें त्या अंधःकारांत प्रकाशरेषा दृष्टीला पडली,

त्या प्रकाशरेखनें त्याच्या कानांत "तूं माझा आधार घेऊन प्रकाशाच्या स्वर्गसाम्राज्यांत प्रवेश कर, या शिवाय अन्य मार्ग नाहीं आणि हा एकच मार्ग दुर्गमांतला दुर्गम आहे तरी पण बिचकूं नकोस, गांगरू नकोस, या एकाच मार्गानें निधड्या छातीनें ये, तूं येशील," असा दिव्य संदेश सांगितला म्हणजे ब्रम्हांडापेक्षांही अधीक आनंद झाल्याशिवाय रहात नाहीं. त्या प्रकाशकिरणाचा आधार कसा घ्यावयाचा, त्यावर आरोहण कसे करतां येतील, आणि प्रकाशाचें स्वर्गसाम्राज्य आपल्याला कसें प्राप्त करून घेतां येईल, या कल्पनेंलाही अगम्य गोष्टी आहेत, हेंही भान मग मला त्या प्रवाशाला रहात नाहीं. आपल्याला त्या प्रकाशकिरणाचा आधार मिळणार, आपण तो दिव्यलोक गांठणार, असेंच त्या प्रवाशाला विश्वासानें वाटत असतें, त्यांतच तो रममाण होतो व मार्गक्रमणाला आरंभ करतो.

मातृभक्त वैनतेयाच्या संबंधांत दुसरें काय झालें होतें? हेंच! आपल्या मातेच्या मुक्ततेकरितां तो दारुण अंधःकारांतच चाचपडत हाता. त्याच्या मनाच्या इच्छा, आकांक्षा, महत्त्वाकांक्षा वाऱ्यावर वार करीत राहाण्याऱ्याच कोटींतल्या होत्या. तोंच कद्रूनें त्याला आपल्याकडून सर्वथा अप्राप्य वस्तु प्राप्त करून देण्यास सांगितलें. म्हणजे वाराही नाहीं, त्यावर वार करण्यास हातीं शस्त्रही नाहीं, अशी स्थिति करून त्याला वाऱ्यावर वार करण्यास परवानगी दिली आणि इच्छित प्राप्ति करून घेण्याची मोकळीक दिली. परंतु वैनतेयाला आपल्या मनाच्या इच्छाशक्तिपुढें, मातृसेवेच्या श्रेष्ठ आनंदापुढें कद्रूनें अप्राप्य सांगितलेलें अप्राप्य वाटलेंच नाहीं. स्वर्गी जाऊन अमृत आणावयाचें, एवढें केलें म्हणजे आई स्वतंत्र होते. मुक्तावस्थेंतला मातेचा परमानंद नेत्रांना पहावयाला मिळतो, मनाला अनुभवायला मिळतो, एवढेंच तो जाणत होता; व त्या अप्राप्य वस्तूच्या मागें लागण्यांत मागें पाय मुळींच घ्यावयाचा नाहीं, हा त्याचा सत्संकल्प ठरला! वैनतेयाचें मन त्या विचारांतच दंग झालें. चालतांना, बोलतांना, स्वर्ग, अमृत, मातेची मुक्तता, एवढेच विचार त्याच्या मनांत घोळत. निद्रावश असला तरी तींच सारीं स्वप्नें! वैनतेयाचें झालें तरी मनच! आपल्याला

आवडतें तसेच तें विचार करूं लागणार. तशींच स्वतःला स्वप्नें पाहून घेणार. थोडासा आशेचा आधार मिळतांच, त्या आधारावर मनाचे उत्तम मनोरे रचित राहाणार! आणि खरोखरच वैनतेयाचें मन कद्रूनें अप्राप्य मर्गाकडे बोट दाखविलें होतें तरी विचार अनुकूलच करीत सुटलें होतें. वैनतेयाचे सारे विचार, सारीं स्वप्नें म्हणजे अशीं होतीं:—

" आपण स्वर्गांत गेलों आहोंत. आपल्या सद्गुणाला, शक्तीला, इच्छेला, तेथें पदोपदीं मान आहे. आपण मातृभक्त आहोंस. मातृसेवा करू इच्छि- णाऱ्याची स्वर्गांत अधिक किंमत करतात! आपल्या सद्गुणाला ओळखून, शक्तीची आठवण देऊन मातृसेवेच्या आणि भक्तीच्या गुणांचा गौरव करण्यासाठीं जो तो अहमहमिकेने पुढें येत आहे. आपल्यासारख्या मातृसेव- काच्या दर्शनासाठीं देवांच्या कोटींच्या कोटी लोटत आहेत! आपल्या कंठांत नंदनवनींच्या पुष्पाचे हारसभार पडत आहेत. आपल्या नांवाचा एकसारखा जयजयकार होत आहे, कित्येक देव आपल्याशीं बोलण्याची इच्छा धरून तिष्ठत उभे आहेत. कित्येक सुरवरांची इच्छा आपण त्यांच्या निवासस्थानी जावें, त्यांचें प्रेमाचें आद- रातिथ्य स्वीकारावें, आपल्या श्रेष्ठ मातृप्रेमाची महती आपल्या मुखानें ऐकावी, अशा प्रकारची दिसून येत आहे, किती सुरश्रेष्ठ आपल्याला साह्य करण्यास उत्सुक आहेत. आपण त्यांना त्याबद्दल केव्हां विचारतों आहोंत आणि ते अत्यानंदानें आपण तयार आहोंत, असें सांगतात. अमरपुरीचा सम्राट देवेंद्र आपल्या आगमनाची सुवार्ता कानीं पडतांच सिंहासनाखालीं उतरून, लगबग करून आपल्या सेवकांना ऐरावताला शृंगारावयास आज्ञापून त्याच्यासह आपल्याला सामोरा येत आहे. हिऱ्या- माणकांनीं मढविलेल्या, मोत्यांच्या झालरी लावलेल्या, रत्नांनीं खचलेल्या, अंबारींत आपल्या डाव्या हाताला आपल्याला सुरेंद्रानें बसवून घेऊन सन्मानानें वाजत गाजत आपल्या वैभवशाली मंदिरांत नेलें आहे! प्रत्यक्ष सुरेंद्राची पट्टाभिषिक्त महिषी शचि अंबारींतून उतरतांच आपल्याला पंचा- रती घेऊन ओंवाळावयाला आली आहे! देवेंद्र क्षेम पुसतो आहे, शचि

कुशल विचारते आहे. आपल्याजवळ देवगुण आहेत म्हणून आपण देवांना प्रिय आहांत. आपण मातृभक्त आहांत-मातृभक्ति ही देवांना अत्यंत लाडकी आहे म्हणून देवांचे आपण लाडके आहांत! मातृसेवेसाठीं आपण सर्वस्वावर तुळशीपत्र ठेवलें आहे, म्हणून देव आपल्याला कंठभूषण समजतात! या प्रकारच्या घोषणा आपल्या कानीं येत आहे! केवढा आपला सन्मान! स्वर्गांत केवढी आपली कीर्ति! देवेंद्र आपल्याजवळ अत्यंत शालीनतेनें पृच्छा करीत आहे कीं 'येथपर्यंत येण्याची कोणत्या महत्कार्याकरितां आपण तसदी घेतली आहे? आपल्या आगमनाचा हेतु कळवून नम्रदेवेंद्राला उपकृत कराल असा भरंवसा आहे!' केवढी ती देवेंद्राची शालीनता? किति विनय! देव लोक तो देव लोक! त्याची सर दुसऱ्या कोणाला येणार! देवांच्या, देवेंद्राच्या मानसन्मानाखालीं आपण पूर्णपणें दडपून गेलों आहोंत. त्यांच्या मन्दिरांची रचना, त्यांची विशालता, भव्यता, त्यांचें दिव्यत्व, अमोलिकत्व, कलाकुसरी, वगैरे पाहून धन्य धन्य हा स्वर्ग! धन्य धन्य देव देवेंद्र! आणि धन्य धन्य त्रिवार धन्य आपण कीं आपल्याला स्वर्गलोक पहावयाला मिळाला. स्वर्ग लोकांत विहार करावयाला सांपडलें. स्वर्गीचें ऐश्वर्य पाहून नेत्रांचें पारणें फिटलें. देवेंद्रानें आपल्या जवळ बसवून घेऊन बरोबरीनें गौरविलें! त्या धन्यतेंत आपण स्वर्गांत कां आलों आहोंत? आपलें कर्तव्य काय? देवेंद्राजवळ आपल्याला काय मागावयाचें आहे? येथील ऐश्वर्याचा मोह सोडून परत आपल्याला जाण्याची त्वरा करावयाला कांहीं कारण आहे काय? इत्यादि विचारांचा क्षणमात्र मनाला व्यामोह पडतो आहे. आपलें स्वस्थ राहणें संकोचामुळें होत आहे. अशा समजुतीनें देवेंद्र फिरून पहिलाच प्रश्न करीत आहे. तेव्हां आपल्या आगमनाचें प्रयोजन ध्यानांत येऊन लज्जीत होऊन आपण देवेंद्राला आपल्या आगमनाचा उद्देश अतिशय थोडक्यांत कथन करीत आहोंत. तें ऐकून देवेंद्र प्रसन्न अंतःकरणानें आपल्याला उलट म्हणत आहे "अमृताकरितां एवढी तसदी घेण्याचें काय कारण होतें? इकडे नुसता निरोप कळला असता, आपल्या मातेच्या मुक्ततेकरितां अमृताची

आवश्यकता आहे, असें जरी कोणा हातीं समजलें असतें, तरी आम्हीं आपल्या सेवकाकरवीं मोठ्या आनंदानें आणि त्वरेनें पाठविलें असतें! कोणाही पुण्यवंताला, कोणाही मातृभक्ताला, कोणाही मातृसेवकाला स्वर्गात अग्रपूजेचा मान मिळत असतो. तो मान आपण आमच्याकडून मिळविला आहे!"

अशींच विचारचक्रें वैनतेयाच्या मनश्चक्षुपेक्षां फिरून फिरून फिरत होतीं! स्वप्नेंही एकसारखीं पडत होतीं! पुण्यवंताला स्वर्गात सन्मानानें वागवतात, त्याचा जयजयकार करतात. वैनतेय आतांच विचार व स्वप्न-सृष्टींत अनुभवीत होता! स्वर्गाचें, देवाचें, देवेंद्राचें राहून राहून कौतुक वाटत होतें. अभिमान वाटत होता! त्या विचाराबरोबर किंवा त्या स्पप्ना-बरोबर वैनतेयाच्या मनोवृत्ति एकसारख्या उल्हसित होत असत! स्वर्गा-तली अमृतप्राप्ति ही किती सहज सुलभ वस्तु आहे. ती आपल्या हातची आहे. आपण ती आणणार–सन्मान मिळवून आणणार–आणलीच," इतक्यावर त्याच्या विचारांची गति येई. स्वप्नाची मजल जाई. पण त्या विचारांच्या किंवा स्वप्नाच्या शेवटीं कांहीं तरी विक्षेप यावा, मनाची चल-बिचल व्हावी, व त्याच विचारांचें चक्र उलट फिरूं लागावें, स्वप्नसृष्टितील देखावे उलट दिसूं लागावेत! "छेः! स्वर्ग इतका सहजसाध्य नाहीं. इतका तो सहजसाध्य असता, तर कद्रूमाईनें इतकी साधी अट घातलीच नसती! ज्याअर्थी कद्रूमाईनें अट घातली आहे, त्याअर्थी ती खात्रीनें दुःसाध्यच आहे. कुठें स्वर्ग आहे? कुठें आपण आहोंत? त्याचा मार्ग किती बिकट आहे. तो पार होणें कसें प्रयासाचें आहे, ठायीं ठायीं यम-राजाचे दूत 'ऑ' करून गिळावयाला सज्ज आहेत!"

या तऱ्हेच्या उलट विचारांना किंवा स्वप्नांना आरंभ झाला म्हणजे गरुडाला तेंही आवरेनासें होई! मस्तक फुटून जाण्याची पाळी येई! अनु-कूल विचारांना किंवा स्वप्नांना धुडकावून देऊन उलट विचार व स्वप्नें बळावत! त्या वेळीं वैनतेय आपल्या प्रयत्नांची शिकस्त करून प्रतिकूल विचारांना व स्वप्नांना दडपून अनुकूल विचारांकडे व स्वप्नसृष्टिकडे धाव

घेत राही! प्रतिकूल विचार व स्वप्नें येऊं लागलीं म्हणजे त्यांची मालिका अशी सुरू व्हावयाचीः—

" आपण स्वर्गाच्या स्वारीवर निघालों आहोंत. त्या निघण्यालाच अडथळे येत आहेत. अनेक प्रकारचे अपशकून होत आहेत. पदोपदीं पाय गुंतून पडूं अशीं कांटेरी कुंपणें, जाळीं कद्रूमाईनें आपलें कौटिल्य खर्च करून तयार केलेलीं आहेत. त्यांतूनही आपण पुढें जात आहोंत तर, कुठें अन्नच मिळेनासें व्हावें, तर शरीरावरील वस्त्र थंडीवाऱ्याला किंवा उन्हाच्या कहराला कमीच पडावें. अगोदर कद्रूमाईच्या अडचणी, तर त्यापुढें निसर्गाच्या अडचणी. त्या नंतर यक्षकिन्नरांचा लोक, त्यामधून जावयाला दुर्गम, तर स्वर्गदारावरच आपली अडवणूक! देव भेटतात, आपली पूसतपास करतील असें वाटतें, आपण उत्सुक होऊन आतुरतेनें त्यांच्याकडे पहावें तों ते तसेच चालते होतात. आपल्याकडे पहातही नाहींत. जो तो आपापल्या नादांत–तंद्रेंतच! कोणी पाहिलेंच, कोणा देवाला आपण होऊन एकादा प्रश्न विचारलाच तर आपल्याकडे तिरस्कारानें तुच्छतेनें पाहून मुळींच उत्तर न देतां निघून जात आहे! आपल्याला कोणी विचारीत नाहीं. आपल्याला स्वर्गद्वारांतून प्रवेश नाहीं. आपल्यापेक्षां शरीरानें केवढाले ते देव आहेत! साधी विचारपूस जेथें नाहीं आपल्या अस्तित्वाची दाद जेथें नाहीं, तेथें सामोरे कोण येणार? मानसन्मान कोण करणार! देवेंद्राची भेट दुर्लभ, शचीचें दर्शन कल्पनेलाही अगम्य! मग अमृताची गोष्ट तर बोलावयालाच नको! निमिषमात्रही जे असावध असत नाहींत, ज्यांच्या हातांत नग्न तरवारी चकचकत आहेत, ते त्यांचीं टोकें पुढें करून भोसकूं पहात आहेत! प्रत्येक देव आपल्याला खड्डू करीत आहे. अवमानित आहे. एकादा बोललाच तर भलतीच दिशाभूल करून तिसराच मार्ग दाखवीत आहे! आपल्याला कोणी ओळखीत नाहीं. आपल्या सद्गुणांना, मातृभक्तीला, मातृसेवेच्या व्रताला कोणी काडीची किंमतही देत नाहीं. देवगुणांचें महत्व प्रत्यक्ष देवलोकांत मुळींच नाहीं! त्यांतच एक भलासा देव भेटतो आहे. त्याला आपण चिकाटीनें विचार-

ण्याचें धाडस करीत आहोंत. काय वाटून कोण जाणें तो देव आपल्याला आपादमस्तक न्याहाळून आपण काय म्हणतों हें ऐकण्यासाठीं उभा राहतो आहे. म्हणून आपल्या मातेची दुःसह स्थिती, त्यांतून तिची मुक्तता करण्याकरितां आपणांला अमृताची जरूरी, हें सर्व त्याजजवळ विनम्रपणें बोलतों आहोंत. तें सर्व ऐकून घेतल्यानंतर त्या सुरवराची पहिली गंभीरता जाऊन खूप मोठ्यानें—हेटाळणीनें खो—खो—खो—खो करून हंसत आहे व म्हणत आहे, " काय अमृत ? तें तुला पाहिजे आहे ? तें तुझ्या आईला मुक्त करण्याकरितां ? " असें विचारीत आहे आणि पुनः पुन्हां हंसत आहे. त्याच्या हंसण्याच्या उघड अर्थ आपण वेडे आहोंत. मूर्ख आहोंत ! अमृताचें नांव घेण्याचीही आपली योग्यता नाहीं. मग त्याच्या प्राप्तीची गोष्ट कशाला? त्या सुरवराचें हेटाळणीचें—निर्भत्सनेचें हास्य हृदयाला जाळीत आहे ! अशा तऱ्हेनें तो सुरवर आपली पूर्णपणें फजीती उडवून तेथून जात आहे ! आतां आपण काय करावें ? याचा विचार आपण मनांत आणतो आहोंत न आणतों आहोंत इतक्यांत आपल्यापुढें क्रुद्ध झालेला देवेंद्र आपल्या सेवेकासहवर्तमान येऊन उभा ठाकतो आहे. त्या भल्या सुरवराला आपली हेटाळणी पुरेशी न वाटून त्यानें देवेंद्राला कळवून आपल्या पारिपत्यासाठीं येथवर आणलें आहे. 'अमृत प्राप्ती'ची इच्छा करून येथवर आलेल्या भूलोकाच्या प्राण्याला कडक शिक्षा द्यावयाची हेंच देवेंद्राचें ब्रीद ! अमृत सेवन सुरवरांखेरीज कोणाला करण्याचा काय अधिकार आहे ? दुसऱ्यांनीं तशी इच्छा कां करावी ? देवेंद्राच्या आज्ञेनें त्याच्या सेवकांनीं भोंवतीं गर्दी करून आपल्याला बंदीवान केलें आहे. नंतर देवेंद्र संतप्त डोळ्यांनीं आपल्याकडे पहात आपला अपराध आपल्या पदरांत घालीत आहे. " भूलोकचा तूं यःकश्चित प्राणी ! अमृतप्राप्तीसाठीं येथें येण्याचें धाष्टर्य करून देवांचा आणि देवेंद्राचा भयंकर अपमान आणि अपराध केला आहेस. अशा प्राण्यांना आम्हीं मोकाट सोडीत नसतो ! " नंतर तो आपल्या सेवकांना उद्देशून सांगत आहे, " या अपराध्याला तुटलेल्या कड्यावरून लोटून द्या. त्यांतून याचे प्राण गेले नाहींत, तर याच्या गळ्यांत भरभक्कम

दगड बांधून अथांग सागराच्या तळीं पोचवा! त्यालाही याच्या प्राण्यानें जुमानलें नाहीं तर अग्नीनारायणाच्या ज्वाळेंत याला भस्म करून टाका! किंवा यमधर्माकडे धाडून तापलेल्या तेलाच्या कढईत तळा! तप्तलोह-स्तंभाशीं बांधून फटके मारा, कांटेरी अरण्यांतून फरफटत नेऊन याच्या शरीराचे, मनाचे, हालचाल करून याला ठार करा! कारण याचा अपराध भयंकर आहे! यानें अमृतप्राप्तीची इच्छा प्रदर्शित केली आहे देवकोटींत घुसूं पहातो आहे!"

त्या विचाराबरोबर व स्वप्नांबरोबर तसे तसे प्रयोग आपल्यावर होत आहेत, असें वैनतेयाला वाटून, त्याप्रमाणें आनंद किंवा संताप, आशा किंवा निराशा, लोभ किंवा संताप, यांची उत्पत्ति त्याच्या ठिकाणीं होत आहे! संतापलेला देवेंद्र समोपचाराकरितां म्हणून शेवटीं म्हणत आहे, "अमृतप्राप्तीची इच्छा फिरून कधीं करणार नाहीं, असें कबूल करीत असशील, तशी इच्छा केली हा अक्षम्य अपराध झाला, असें म्हणत असशील आणि आल्यापावलीं परत जाण्याची तुझी तयारी असेल तर एकवार आपण प्राणदानाची भिक्षा तुला घालूं!"

त्यावर आपण गोंधळलों आहोंत. अमृतासाटीं आलों आणि त्याशिवाय परत कसें जाणार? अमृत प्राप्ति झाली नाहीं तर मातेची मुक्तता कशी होणार? पण परत गेलों नाहीं तर देवेंद्रानें म्हटल्याप्रमाणें तो आपल्या हालअपेष्टा केल्याशिवाय रहात नाहीं. शिक्षा ठोठावल्याखेरीज सोडीत नाहीं! मग काय करावयाचें? अमृतप्राप्ति इतकी दुर्गम आहे! म्हणूनच कद्रूमाईनें असली बिकट अट घातली आहे! पण कांहीं झालें तरी, देवेंद्रानें आपल्याला बंदिवान केलें तरी आपण अमृत घेतल्याशिवाय परत फिरणार नाहीं! हा आपला निश्चय आपल्या मुखावर उमटलेला देवेंद्राला दिसून येऊन तो अधिकच क्रोधायमान होऊन स्वतः शिक्षा देण्याकरितां पुढें सरत आहे—इतक्यांत गरुडाचा विचार किंवा त्याचें स्वप्न कांहीं तरी विक्षेप येऊन थांबे! तो भानावर येई! अशा विचारांचें आणि स्वप्नांचें गरुडाला विलक्षण आश्चर्य वाटे!

## प्रकरण दहावें

कद्रूची अट कबूल केल्या क्षणापासून स्वर्गाच्या स्वारीची तयारी करी
असतांना गरुडाच्या डोक्यांत वरील विचारांची आणि झोपेंत स्वप्नांचं
किती आवर्तनावर आवर्तनें झालीं असतील, हें त्याचें त्यासच माहित
एकीकडे असे विचार येत होतेच अशीं स्वप्नें पडत होतींच आणि एकीक
त्यानें स्वर्गावरच्या स्वारीची तयारी चालविली होतीच !

आपण अमृत आणावयाला स्वर्गाकडे गेल्यावर कद्रूनें आपल्या आईल
कसें वागविलें पाहिजे, सर्पांनीं आपल्या आईशीं कसें वागलें पाहिजे
आपल्या आईनेंही त्यांच्याशीं कसें वागावें, हें सर्व गरुडानें कद्रूची पुन्ह
गांठ घेऊन वादविवाद करून ठरविलें. कांही कद्रूनें त्याच्या अटी मान
केल्या. कांहीं अमान्यही केल्या. त्याला बरें वाटण्याकरितां तोंड देख
एक बोलली, तर मनाशीं तिचा निराळाच संकल्प चालला होता !

त्यानें सर्वांना जसें सांगितलें, तसें अरुणालाही जवळ बोलविलें आपल्य
पश्चात त्यानें कसें कसें वागावें, हें सांगण्याचा त्याचा हेतु होता. तो कस
काय वागेल, वागवील, हेंही त्याला पहावयाचें होतें. गरुडानें अरुणाल
दूरवर फिरावयाला म्हणून नेलें. आपलें संभाषण कोणी ऐकूं नये, आप
त्यालाही मोकळेपणानें बोलतां यावें, एवढाच दूर जाण्यांत हेतु दिसल
दूरवर गेल्यावर त्यांचें संभाषण सुरू झालें:—

"अरुणा, अमृत आणण्याकरितां मी स्वर्गीं जाणार !—"

"आणि आपली आई स्वतंत्र होणार !"

"पण मी येईपर्यंत तूं कसा वागणार ?—"

"तूं सांगशील तसा वागेन !—"

"आईला कोणाला छळूं द्यावयाचें नाहीं !"

"तें तर ठरलेंच !—"

"कद्रूमाई किंवा तिचीं मुलें, ही कबूल केलेल्या अटी वेळीं प्रसंग
मोडतील तर—"

"मी आरडाओरडा करून आकाशपाताळ एक करीन !"

## प्रकरण दहावें

" शाबास ! पण तूं पांगळा आहेस–तुलाही जर ते त्रास द्यावयाला लागले तर ?"

" माझें व्यंग मी जाणून आहे. त्याकरितां तुझ्या पश्चात मी वागण्याचें धोरणच अगदीं बदलून टाकीन !"

" म्हणजे ? तें कसें काय करणार ?"

" मी होतां होईतों तुझ्याप्रमाणें, त्यांच्याशीं तुटून वागणार नाहीं. भांडणार नाहीं. वर्दळीवर येणार नाहीं. मी त्यांचा मित्रच आहे असें दाखवीन !—"

" आणि—"

" आणि मनाशीं मात्र जागरूक राहीन ! त्यांनीं आपल्या अटी पाळल्या, आईला त्रास देण्याचें मनांत आणलें नाहीं, त्यांनींच आईला बरें वागविण्याचें ठरविलें, तर ते आम्हीं स्नेही मित्र ! त्यांचें मी मोकळया मनानें सर्वांच्या देखत अभिनंदन देखील करीन !"

" आणखी काय ? मी त्यांच्याशीं गोड बोलेन. प्रसंग पडला तर त्यांचीं अविकउणीं कामें करीन. प्रसंग वाटला तर गरुडाचें सगळेंच करणें–बोलणें मला पसंत नसत असेंही सांगण्यास कमी करणार नाहीं !" अरुण अगदीं खुलून सांगत होता !

" वा: ! हें असें कां वागणार ?"

" मी पांगळा आहे म्हणून ! तुझ्याप्रमाणं मला त्यांच्याशीं प्रसंगीं ठोसाठोशी करतां येणार नाहीं म्हणून !"

" कांहीं हरकत नाहीं ! तुला जसें जमेल तसें तूं वाग ! पण आईला विसरूं नकोस. तिला दुःख देऊं नकोस. तिला तुच्छ लेखूं नकोस म्हणजे झालं !"

" गरुडदादा ! असं माझ्या मनांत तरी कधीं येईल काय ?" अरुणाच्या नेत्रांत खळकन् अश्रु आले ! तो हे शब्द कसेबसे बोलला.

गरुडालाही वाईट वाटलें. उगाच अरुणाला बोललों असें त्याला होऊन गेलें. त्यानें आपल्या हातांनीं अरुणाचे डोळे पुसले ! याचेंच नांव खरें

बंधुप्रेम! अरुण पांगळा असला म्हणून त्याचे आपल्या आईवर प्रेम कमी होतें काय? तिच्या स्वातंत्र्याची त्याची उत्कटता गरुडाच्या मानानें कोणत्याही प्रकारें शिथिल होती काय? मुळींच नाहीं! गरुडाच्या आणि अरुणाच्या मनांत मातृप्रेम सारखेंच उज्ज्वल होतें. आईच्या स्वातंत्र्याप्रीत्यर्थ सारखीच तळमळ होती! म्हणून उणा वाटणारा किंचितूही शब्द अरुणाला सहन झाला नाहीं! गरुड अरुणाला पुरता ओळखत होता. अरुणाला गरुडाच्या सामर्थ्याची पूर्णपणें जाणीव होती. फक्त प्रकृतिधर्माप्रमाणें ज्याला जसें वागतां येईल, तसेंच त्यानें वागावयाचें असतें. मातृप्रेमाच्या अढळपणांत, मातृसेवेच्या तत्परतेंत, कोणत्याही प्रकारची कसूर नसली म्हणजे झालें.

गरुडाचें आणि अरुणाचें असेंच होतें. त्या दोघांही बंधूंची मातेच्या ठिकाणीं अढळ निष्ठा होती. मातेच्या पारतंत्र्यामुळें त्यांच्या नेत्रांतले अश्रु खळत नव्हते. त्यांच्या अंतरींची आग शमत नव्हती. स्वातंत्र्याकरितां सारखीच तळमळ खळाळत होती! दोघांचें अंतरंग एक, ध्येय एक, कार्य एक होतें! अशा बंधुंच्या हातून कोणतें अचाट कार्य होणार नाहीं? कोणता पराक्रम ते करून दाखविणार नाहींत? मातेच्या पायांतील पारतंत्र्याच्या शृंखला निखळून तिला स्वातंत्र्यसौख्य मिळवून तो दिव्यानंद उपभोगल्यावांचून ते कसे राहातील?

गरुड अमृत आणणार ही अरुणाची खात्री होती, त्याचप्रमाणें आपण परत येईपर्यंत अरुण पांगळा असला तरी कर्तव्यच्युत होणार नाहीं, आपल्या मातेची सेवा यथायोग्य बजावण्याचें पुत्राचें कर्तव्य उत्कृष्ट करणार हा अरुणाबद्दलचा गरुडाला भरंवसा वाटत होता.

त्यानंतर ते दोघे बंधु किती वेळ तरी तेच तेच बोलत होते. बंधुबंधुचें भाषण, विषय मातृप्रेमाचा आणि सेवेचा, तेव्हां तो पुरा कसा व्हावा? त्याचा कंटाळा कसा यावा? बोलण्यांत वेळ किती निघून गेला, हें कोणाच्या तरी कसें ध्यानीं यावें? अशा विषयावर अशा बोलणारापुढें कालालाही कुंठीत व्हावें लागावयाचें!

किती तरी वेळानें दोघांनीं बोलणें थांबविलें. गरुड म्हणाला, 'आपण

## प्रकरण दहावें

कितीही बोललों, तरी हें बोलणें संपावयाचें नाहीं. संपवावें असें वाटावयाचें नाहीं. पण त्यांत कांहीं अर्थ नाहीं. बोलणें बंद करून आपल्याला कार्यालाच आरंभ केला पाहिजे! नुसत्या बोलण्यानें मातृभक्ति काय होणार? मातृसेवा कशी घडणार? माता स्वतंत्र कशी होणार? नुसतें बोलणें कांहीं करणार नाहीं! तूं आपलें कर्तव्य कर. मी माझें कर्तव्य करतों! हें करीत असतांना सौख्य लागो वा दुःखाचे चटके बसोत, कोणी नीट वागवो वा क्लेश देवोत, कोणी जवळ बोलावोत वा दूर लोटोत—कोणी भले बोलोत वा बुरे वागोत! कांहीं झालें तरी मागें हटावयाचें नाहीं, कर्तव्य सोडावयाचें नाहीं, ध्येय ढळूं द्यावयाचें नाहीं! आपली वाणी मातेच्या स्वातंत्र्याकरितां, आपली कृति मातेच्या स्वातंत्र्याकरितां, आपलें वर्तन जीवन—श्वसन मातेच्या स्वातंत्र्याकरितांच ठेवावयाचें!"

असें ठरून गरुडानें मनाचा मंगल मुहूर्त योजला. मातेच्या चरणीं भक्तिभावानें जाऊन लोटांगण घातलें. आपली योजना सविस्तर तिला निवेदन केली. आईचा शुभाशीर्वाद मागितला. त्या प्रेमळ माउलीनें आपल्या आवडत्या पुत्राला तोंडभर कल्याणप्रद आशीर्वाद दिला. आपल्या स्वातंत्र्याकरितां सुपुत्र सज्ज झाला आहे, त्याच्या प्रयत्नानें आपण सुखाचे दिवस पहाणार आहोंत; ही कल्पना, ही आशा, ही इच्छा कोणत्या माउलीच्या डोळ्यांत आनंदाश्रू उभे करणार नाहींत? कोणत्या मायमाउलीचें हृदय वात्सल्यानें भरून येणार नाहीं? प्रेमभरानें कोणती माऊली आपल्या लाडक्याच्या मस्तकाचें अवघ्राण करणार नाहीं? विनतेनें लडिवाळपणानें गरुडाला कुरवाळलें. आपल्या आनंदाश्रूंनीं गरुडाला न्हाऊं घातलें. आपल्या डाव्या पायाच्या तळव्याची माती त्याच्या कपाळीं लावून, त्याचा आलाबला घेऊन आपल्या कानशिलावर इडापिडा टळो अमंगळ पळो म्हणत आपल्या हाताची कडाकड बोटें मोडलीं आणि आशीर्वादाचे शब्द उच्चारतांना ती म्हणाली:—

"बाळ, विजयशाली हो! तुझ्या मार्गांत कोणत्याही अडचणी न येवोत. तुला कोणत्याही प्रकारचे क्लेश न बाधोत! उन्हातान्हांतून तूं चालत असतां,

तुझ्यावर लतावृक्ष आपल्या पर्णयुक्त करांनीं छत्रें करोत; तूं ज्या मार्गानीं जाशील, त्या मार्गांतले कांटेकुटे, स्वातंत्र्यप्रिय वायु जातां जातां दूर करून तो मार्ग निष्कंटक करो! रात्रीं अपरात्रीं अंधःकारांतून तुझा प्रवास चालला असतां चंद्रचंद्रिका आपल्या प्रकाशांनीं तुझा मार्ग नीट दिसेल असें करोत! तुझा जठराग्नि शांत करण्याकरितां फलभारांनीं लवलेले वृक्ष आपले कर पुढें करून पक्व फळें देवोत. तुझी तृषा शमन होण्याकरितां निर्मल जलसंचय तुझ्या आगमनाची मार्गप्रतीक्षा करोत. बाळ, तूं चालत असतांना मनाला उदास वाटूं नये, म्हणून तुझ्या दृष्टिसुखाकरितां सृष्टिसती प्रसन्न अंतःकरणानें विहार करीत असो. तुझ्या श्रांत चित्ताला विश्रांती वाटावी, मनरंजन व्हावें म्हणून द्विजकुळें स्वातंत्र्य संगीताचे मधुरालाप तुला ऐकवोत. बाळ, तूं देवादिकांशीं संभाषण करीत असतां, त्यांचें चित्त सुप्रसन्न राहण्याकरितां भगवती शारदादेवी तुझ्या जिव्हाग्रीं अधिष्ठित असो! तुझ्यावर कोणी चवताळून आल्यास त्यांच्यापासून संरक्षण होण्याकरितां महारुद्राची शक्ति तुझ्या ठायीं वास करो! चौदा विद्या, चौसष्ट कला, ऋद्धिसिद्धि प्रसंगीं तुझ्या सहाय्याला येवोत. मज दुबळीची असेल नसेल ती सर्व पुण्याई सदा-सर्वकाळ तुझ्या पाठीशीं उभी असो. अंतरिक्षांत वावरणाऱ्या अदृश्य देव-देवता तुझें संरक्षण करोत. तपस्वी, संन्यासी, योगिनी या सर्वांकडून त्यांच्या तपाच्या पुण्याईतील पुण्याई तुला आनंदानें मिळो! बाळ, स्वतःच्या आत्मबळावर, निरलसतेवर, घराण्याच्या, पूर्वजांच्या, पुण्याईचा पाठिंबा तुला असो, त्या सर्वांच्या पुण्याईच्या जोरावर तूं स्वर्गांतून अमृत आण आणखी कद्रूची इच्छा तृप्त कर! माझें स्वातंत्र्य पहा. तो आनंद तुला प्राप्त होवो! बाळ, यापेक्षां तुझी दुबळी आई दुसरा कोणता आशीर्वाद देणार? शेवटीं सर्वसाक्षी सर्वेश्वराजवळ तुझ्या आईची नित्य प्रार्थना असेल कीं, भगवंता, माझ्या बाळाला मी दिलेले आशीर्वाद सफळ होण्याइतकी तरी त्या आशीर्वादांत पुण्याई वास करील असें कर!"

विनता आशिर्वाद देऊन स्वस्थ बसली. तिच्या डोळ्यांत पुन्हां गंगा-यमुना आल्या. गरुडानें मातेचे चरण धरले. गंगायमुनांचा त्याच्यावर

अभिषेक केला. गरुड पावन झाला. गरुडाच्या नेत्रांतही त्या क्षणीं पवित्र भागीरथीचा उगम झाला! त्या पवित्र त्रिवेणी संगमांत तीं मायलेंकरें किती काळ तरी सर्व जगाला विसरून जाऊन पुनीत होत होतीं!

कोणतीही माता आपल्या पुत्राला अंतःकरणापासून आशीर्वाद देते. पुत्रानें विजयी व्हावें, कीर्तिवान्, बलवान्, शतायु, धीमान्, पुंमान्, धनवान् व्हावें असें कोणत्या मातेला वाटणार नाहीं? कोणता सुपुत्र आपल्या मातेपासून अशा आशिर्वादाची अपेक्षा करणार नाहीं? सतीच्या आशीर्वादांत ईश्वर बांधलेला असतो! मातेचा अंतःकरणपूर्वक आशीर्वाद सुपुत्राला परमपदाला नेऊन बसविण्याची शक्ति मिळवून बसलेला आहे! म्हणून विश्वाच्या पाठीवर आईपेक्षां श्रेष्ठ कोणी नाहीं आणि आईच्या निर्मळ आशीर्वादाइतकी दांडगी पुण्याई दुसऱ्या कोणत्याही तपश्चर्येच्या ठिकाणीं नाहीं! मातृदेवो भव ही श्रुतिस्मृतींची प्रथम आज्ञा वृथा कां असेल?

विनतामातेचा निश्रेयस् आशीर्वाद शिरीं घेतल्यानंतर आणि तिच्या नेत्रांतल्या अश्रूंच्या पावन जलानें न्हाल्यानंतर गरुडाचे विचार–अविचार स्वप्नें–दुःस्वप्नें पार कोठच्या कोठें नाहींतशीं झालीं. संकल्प–विकल्प लयाला गेले. शंका कुशंका मावळल्या. भीतीराक्षसीनें सप्तपाताळांत दडी दिली! गरुडाच्या अंगांत नवचैतन्य प्राप्त झालें. मातृभक्तीची दिव्य कांती मुखावरून सांडूं लागली! त्याच्या आत्मविश्वासाची प्रभा फांकली! त्यानें आपल्या मातेच्या चरणावर मस्तक ठेऊन, तिला व अरुणाला आपण परत येईपर्यंत कसेंकसें वागावयाचें हें आणखी एकदां पढवून, प्रत्यक्ष सेवेला दुरावलों, तरी अरुण त्या सेवेकरितां आहे, याबद्दल आनंद व दुःखमिश्रित समाधानाचा एक दीर्घ निश्वास सोडून गरुडानें ॐकाराचा प्रणवपूर्वक जयघोष करीत अमृतप्राप्तिकरितां स्वर्गावर स्वारी करावयाला प्रस्थान उचललें!



# प्रकरण अकरावें

—त्या ऋषींचें तपःसामर्थ्य ध्यानांत येऊन अणुरेणूंतही ईश्वर समावलेला असतो, त्याला वंदन केलेंच पाहिजे, त्यापुढें मान नमविलीच पाहिजे, हें गरुड समजून चुकला—

मनाचा दांडगा उल्हास अत्यंत प्रभावशाली असतो. त्या उल्हासाला संकटें भासत नाहींत, दिसत नाहींत, जिकडे तिकडे तो उल्हास विजयचिन्हेंच मांडून ठेवीत असतो! जो जो कोणी भेटेल तो आपल्या मताचा, आपला विजयेच्छु, जो बोलेल तो आपल्या हेतुला, कार्याला यशाला पोषक असेंच बोलेल. मनाच्या उल्हासाला अडथळे येत नसतात. दऱ्याखोरी, जलवाहिन्या, प्रखर उन्ह, किंवा रक्त गोठून टाकणारी थंडी उल्हासी, उत्साही, मनाचा मार्ग रोधीत नाहींत. त्या मनाला पुढें कांहीं अडचणी आहेत असें दिसत नाहीं. त्याला समोर येणारे शुभ शकूनच येत असतात! प्रत्यक्ष विचारपूस केली नाहीं तरी मनाच्या उल्हासानें आपल्या उंबरठ्याच्या बाहेर पाऊल टाकतांना गुरुपुष्याचा-अमृतसिद्धि योगच दिलेला असतो! बाहेर येतांच पाण्यानें भरलेले कलश माथ्यावर घेऊन सुवासिनी सामोऱ्या येत असतात! चासपक्षी आपण होऊन त्याला उजवी घालून जात असतो!

गरुडाला स्वर्गाच्या स्वारीवर निघतांना हे उत्तमोत्तम अनुभव येत होते. गरुडाच्या भरारीला रोधून धरील असें मध्यें कांहीं एक येत नव्हतें. त्याच्या कानीं स्वातंत्र्यगीतें येत होतीं. त्याच्या यशाकरितां जागजागीं मन्त्रोच्चार होत होते! गरुड अमृतप्राप्तिकरितां स्वर्गावर जाणार, ही शुभवार्ता हां हां म्हणतां चोहोंकडे प्रसृत झाली होती. आश्रमाला आनंद झालेला दिसत होता. आश्रमांतील गाईगुरांना तें समजलें होतें. नित्य वावरणाऱ्या पक्ष्यांना तें माहीत झालें होतें. आजवर दांव्याला बांधलेलीं गाईगुरें आपल्या व आपल्या स्वामिनींच्या बंधनामुळें अश्रुपात करीत—आंतल्या आंत दुःखी असत, घरट्यांत अडकून राहिलेले पक्षी पारतंत्र्यांतलीं गीतें गात नसत,

## प्रकरण अकरावें

त्यांना आपली स्वामिनी स्वतंत्र होणार म्हणून कोण आनंद झाला होता! स्वामिनीच्या भावी स्वातंत्र्याचीं गाणीं निर्झर आतांपासूनच गुणगुणूं लागला होता. अमृतप्राप्तीकरितां बाहेर पडणाऱ्या गरुडाला आत्मविश्वास उत्पन्न करून देण्याकरितां अमृतसिद्धी योग आपण होऊन त्याच्याकडे आला होता! जेथें तेथें आणि जो तो गरुडाला स्वर्गांत यश मिळो, त्याला अमृत प्राप्त होवो, आणि सती विनता स्वतंत्र होवो, असेंच उद्गारत असलेला ऐकावयाला येत होतें!

गरीब, दुबळे, अनाथ, पंगु, शेतकरी, कामकरी, गरुडाला भक्तीभावानें दुरूनच वंदन करीत. हा प्रत्यक्ष परमेश्वरावतार मातेला स्वतंत्र केल्याखेरीज राहणार नाहीं, तो प्रत्यक्ष ईश्वर आहे, असें म्हणत आनंदभरीत होत!

लेकुरवाळ्या स्त्रिया आपापल्या लहानमोठ्या बालकांना दारांत घेऊन मुद्दाम उभ्या रहात होत्या, व वत्सलतेनें, बंधुभावानें, सादर दृष्टीनें मार्गस्थ गरुडाला डोळे भरून पहात, त्याला आपले आशीर्वाद देत किंवा नमस्कार करीत! आपल्या मुलांना नमस्कार करावयाला लावीत, व मुद्दाम त्यांना तो दाखवीत! प्रत्येक स्त्रीला वाटत होतें कीं गरुडाप्रमाणें आपल्या लाडक्या पुत्रांनीं व्हावें. आपल्या पुढें त्यांनीं गरुडाचें ध्येय ठेवावें!

मार्गांतून जातांना गरुडाला जागजागीं थांबावें लागे. किती ठिकाणीं अत्याग्रहानें त्याला थांबवीत. त्याचें अभीष्ट चिंतीत. त्याला खायला-प्यायला देत. त्याचा गौरव करीत आणि मग मोठ्या प्रेमानें निरोप देत! संचारी, संन्यासी, तपस्वी, ऋषीमुनी, गरुड स्वर्गावरच्या स्वारीकरितां जात आहे म्हटल्यावर आपलीं नित्यकर्में अगोदर आटोपून, किंवा नंतर करूं म्हणून ठरवून, मुद्दाम मार्गांत येऊन प्रतीक्षा करीत होते! गरुड आला कीं, त्याला थांबवावयाचेंच, यथाशक्ति त्याचें स्वागत करावयाचें, अल्पोपाहार तरी त्याला करावयाला लावावयाचाच, आणि असें झालें म्हणजे आपली पूर्वपुण्याई फळाला आली, या भावनेनें अत्यानंदांत असावयाचें.

गरुडाला पुढें धांवण्याची जरी अत्यंत उत्कंठा, तरी मार्गांत कोणालाही तो निराश करीत नव्हता. प्रत्येक ठिकाणीं थांबून, त्या त्या मंडळींची

जशी इच्छा असेल, तसें त्यांना करूं देऊन मग त्यांचा निरोप घेई आणि मग पुढें चालूं लागे. मंडळींच्या मनासारखें वागलों, सज्जनांना संतुष्ट केलें, हीच आपली पुण्याई, असें तो समजे. असें प्रत्येकाला म्हणे आणि आपल्या सर्वांच्या पुण्याईनेंच स्वर्गांतील अमृत आपल्या हातीं येणार व माझी परतंत्र आई स्वातंत्र्यसुखाचा आस्वाद घेणार, असें तो प्रांजलपणें म्हणे.

गरुडानें स्वागत स्वीकारलें म्हणजे तें करणारांना आनंद होई, अभिमान वाटे. आपल्या येथें गरुडासारख्या मातृभक्ताची पायधूळ झडली म्हणून धन्यता वाटे, तर उलट गरुड या ऋषीमुनींचे, तपस्व्याचे आशीर्वाद आपल्याला मिळाले, आपल्या तपश्चर्येंत भर पडली, स्वर्गांत वावरावयाला तितकें सामर्थ्य आपल्या ठिकाणीं अधिक समावलें असें मानी! केवळ याच कारणानें कोणालाही निराश करावयाचें नाहीं, सर्वांकडे थांबावयाचें, आपली अनिवार त्वरा थोपवून ठेवावयाची, असें त्यानें निश्चित केलें होतें. जातां जातां चोहोंकडे पहात जावयाचें. कोणी आपल्याकरितां तिष्ठत आहे काय? कोणी मार्गप्रतीक्षा करीत आहे काय? हें पहावयाचें व मग पुढें चालूं लागावयाचें, असें त्याचें मार्गक्रमण चालू होतें.

गरुडानें पुष्कळांचे पुष्कळ शुभाशीर्वाद मिळविले. मिळवीत चालला. त्याच्या या प्रशंसनीय दक्षतेमुळें सर्व मंडळी त्याच्यावर संतुष्ट होत. त्याचाही आनंद दुणावे. परंतु त्याच्या त्या अतीदक्षतेमुळें कित्येक वेळां त्याचीच गोड अशी फसवणूक होई! एके ठिकाणीं झालेंही तसेंच. म्हणजे असें झालें. वाटेंत ऋषीमुनींचा गौरव स्वीकारून त्यांचे आशीर्वाद मिळवून तो पुढें चालला. चालतांना इकडे तिकडे असा दोहों बाजूस तो पहात चाललाच होता. त्याला एका बाजूच्या शेतांत दोनही हात लांब करून आपल्याला कोणी थांबवूं पहात आहे, असें दिसलें. थांबविणारे कोणी होतें, तें मार्ग सोडून बाजूला बरेंच दूर होतें. गरुडाच्या मनांत एक विषय भरलेला. कोणालाही नाखुष करावयाचें नाहीं. आपणच थोडी तसदी घ्यावयाची, मार्गापासून बाजूला असलें तरी जावयाचें. कंटाळा करावयाचा नाहीं. या निश्चयाप्रमाणें हात लांब केलेल्या व्यक्तीकडे गरुड निरलसपणानें गेला.

## प्रकरण अकरावें

अगदीं जवळ गेला तों काय ? शेतकऱ्यानें शेताचें पक्ष्यांदिकापासून रक्षण करण्याकारितां काठीवर कांबळी टाकून, त्याच्या टोंकाला रंगवून मृत्तिका घट उपडा ठेवून तयार केलेलें तें एक बुजगावणें होतें! अगदीं जवळ गेल्यावर गरुडाच्या तें ध्यानीं आलें. तो चमत्कार अवलोकन करून गरुडाला भारी हंसूं आलें. तो तेथूनच परतला. त्यानें त्या क्षेत्राला नमस्कार केला. त्या भूमीचीच इच्छा आपल्याला दर्शन देण्याची झाली असेल, असें त्यानें आपल्या मनाला म्हटलें.

हेंच गरुडाऐवजीं मानाला हपापलेला, गौरवाला लालचावलेला, केवळ प्रतिष्ठेच्याच पाठीशीं लागलेला, ढोंगी, पोकळ मातृभक्त असतां आणि त्याची अशी त्या बुजगवण्यानें फजिती उडविली असती, तर त्याला काय वाटलें असतें ? तो किती चिडला असता ? त्यानें कदाचित् आपला अपमान करणाऱ्या त्या निर्जीव बुजगावण्यावरच चाल करून जाऊन हस्त-पाद प्रसादानें त्या बुजगावण्याला भूमीगत केलें असतें !

परंतु वैनतेयाला तसें वागण्याचें कांहीं कारणच नव्हतें. त्याचा हेतुच स्वतंत्र होता. तो तेथून पुढें चालला. तो जसजसा दूर जाऊं लागला, तसतशीं मंडळीची वर्दळ कमी झाली. स्वागताची जिकीर कमी होऊं लागली. मागील अवधान सुटत जाऊन पुढील दृश्यें दृष्टिपुढें एक एक अशीं येऊं लागलीं. स्वर्गासंबंधींचें विचार उद्भवूं लागले. कांहीं मागील गोष्टी, कित्येक ऋषीमुनींनीं अकारण किंवा सकारण केलेले गौरव पुनर्स्मृतीनें गोड आनंद देऊं लागले. गौरव, स्तुति, अभिनंदन, कीर्ति, वगैरे अत्यंत उन्मादकारी बाबी आहेत, त्या एकदां मनांत वरचेवर येऊं जाऊं लागल्या म्हणजे दुसरें कांहीं सुचूंच देत नाहींत. एकसारखा त्यांचाच विचार येतो. त्यांच्याच सभोंवती मन घुटमळत गुंगत असतें, त्यांच्याशीं सहवास निरंतरचा ठेवण्यांत आयुष्याची इतिकर्तव्यता असावी अशीही डळमळीत मनाला, अपुऱ्या बुद्धीला दिशाभूल होत असते !

मधून मधून वैनतेयाच्या मनावर ऋषीमुनींच्या गौरवाचा, स्तुतीचा पगडा पडूं पहात असे, नाहीं असें नाहीं. अशा वेळीं त्याला समजतांच, त्याचें

पाऊल मंद पडत आहे, शरीराला शिथिलता येत आहे, आपण खूप चालून थकलों आहोंत, विश्रांतीची आवश्यकता आहे, असें त्याला वाटे. आपण कांहीं तरी चुकतों आहोंत का? कशाची तरी विस्मृति आपल्याला पडूं पहात आहे का? असेही त्याच्या मनांत येई! मी मातृभक्त आहे. मातृसेवेसाठीं तळहातावर शिर घेऊन स्वर्गाकडे चाललों आहे. त्या मला ऋषी मुनी गौरवितात. जग जयजयकार करतें, हें उक्तच आहे. त्यांनीं तें तसेंच केलें पाहिजे. मी त्या सन्मानास पात्र आहें, अशा उत्तेजक भावना गरुडालाही उन्माद आणीत. त्या वेळीं तो जागच्या जागींच थबके! पुढें पाऊल टाकण्याचें त्याला भानच रहात नसे! किंचित् कालानें त्याची शिथीलता त्याच्या लक्षांत यावी व त्यानें 'अं हं! हें उपयोगाचें नाहीं!' असें म्हणून देह व बुद्धि झडझडून झाडून चालण्याची त्वरा करावी!

गौरव करून घ्यावयाचा खरा, परंतु त्यावर विचार करीत बसावयाचें नाहीं, त्याकरितां कर्तव्यांत खंड पडूं द्यावयाचा नाहीं. गौरव हा कार्योत्सुक करणारा खरा! पण तो माफक असेल तर! तोही अती झाला, तर त्याचें अजीर्ण व्हावयाचें व त्याचा परिणाम कर्तव्यच्युतींत हटकून व्हावयाचा; याची मात्र विस्मृति गरुडानें आपल्याला सहसा होऊं दिली नाहीं. स्तुतीचें, गौरवाचें अजीर्ण झालें आहे, आतां पाऊल उचलण्याची शक्ति त्यामुळें आपल्यांत राहिली नाहीं, असें एकदां वैनतेयाला वाटलें त्याबरोबर त्यानें इतउत्तर आपण कोणाकडूनही गौरव स्वीकारावयाचा नाहीं, असा निश्चय केला. परंतु असा निश्चय करून कांहीं काळ लोटतो न लोटतो, कांहीं दूर जातो न जातो, तोंच त्याच्यापुढें त्याच्या निश्चयाला धुडकावून देणारा, त्याच्या खंबीर मनाची कसोटी पाहाणारा प्रसंग दत्त म्हणून उभा राहिला.

समोरच कुणी तरी हलक्या आवाजांत आपल्याला हांका मारीत आहे, बोलावीत आहे, आपली चौकशी करीत आहे, असें त्याला भासलें. त्या हांका अतिशयच हळू हळू येत होत्या. कोण हांका मारीत आहे, हें त्याला नीटसें दिसेनाही. म्हणून प्रथम तरी त्याला भाससाच वाटला! पण त्यानें

# प्रकरण अकरावें

त्याकडे दुर्लक्ष होऊं नये म्हणून सूक्ष्म रीतीनें अवलोकिलें तों, बरीच ऋषी-मंडळी एकत्र जमली आहेत, त्यांचीं शरीरें इतकीं लहान आहेत, इतकीं खुजी आहेत, कीं त्याची नुसती कल्पना करूनच हंसूं येईल. त्यांच्या आकारमानानेंच त्यांचा आवाज होता. त्यांचें मोठमोठ्यांदा बोलणें म्हणजे गरुडाला आपल्या कानांत कुणी गुणगुणत आहे, असें वाटे ! ते वालखिल्य ऋषी होते. ते देहानें अतीसूक्ष्म पण तपश्चर्येनें अत्यंत जाज्वल्य होते. त्यांनीं गरुडाला थांबवून घेतले. गरुडाला त्यांनीं ओळखलें होतें. त्याच्या उद्दीष्ट कार्याची माहितीही त्यांना होती म्हणूनच त्यांनीं त्याला मुद्दाम थांबविलें.

" सुपर्णा, तूं आमच्या विनंतीला मान देऊन थांबलास, तुझा जय-जयकार असो ! " एक ऋषी पुढें होऊन म्हणाला.

" विनतानंदा, तुझ्या उद्दिष्ट कार्यांत तुला पूर्ण यश येवो ! "

" वैनतेया, तुझें उद्दिष्ट कार्य फार थोर आहे. स्तुत्य आहे ! या स्तुतीस तूं सर्वशा योग्य आहेस ! म्हणून आम्हीं तुझी अंतःकरणपूर्वक स्तुति करतों ! "

" कश्यपमहामुनींच्या सुपुत्रा, तूं महेंद्राला जिंकणारा आहेस ! त्या-करितांच तुझा जन्मावतार आहे ! तूंच एक महेंद्राचा गर्व हरण करशील ! त्याचा मद हरण करशील ? "

" गरुडा, आमचे शब्द निष्फळ समजूं नकोस ! तूं प्रतिमहेंद्र आहेस! आमच्याच तपप्रभावानें तुझा संभव झालेला आहे ! तुझ्या उद्दिष्ट कार्यांत तुला यश तर येईलच, परंतु त्याबरोबर तूं महेंद्राचाही मद उतरशील. त्या शुभक्षणीं आम्हांला अत्यंत आनंद होईल ! आमची तपश्चर्या त्यावेळीं सार्थ होईल ! "

" आम्हीं क्षुद्र म्हणून, सूक्ष्म म्हणून देवेंद्रानें आमचा उपहास केला होता, त्या उपहासाची परतफेड करण्याकरितां तपश्चर्येनें आम्हीं तुला निर्माण केलें आहे ! "

" आणि, त्या महेंद्राप्रमाणें तूं आमचा उपहास केला नाहीस, आमच्या

सूक्ष्म देहाला हंसला नाहींस, आम्हांला कस्पटाप्रमाणें समजून, आमच्या विनंतीचा अव्हेर केला नाहींस–"

"म्हणूनच तूं महेंद्रापेक्षांही श्रेष्ठ आहेस, यांत तिळमात्र संदेह नाहीं!"

एकेक ऋषी बोलत होते. त्यांच्या बोलण्याची नुसती घाई उडून गेली होती. त्यांच्या स्तुतीचा वर्षाव गरुडाला असह्य होत होता! परंतु ऋषींची स्तुति अन्यथा नव्हती. व्यर्थ नव्हती. सार्थ होती. त्यामुळें गरुडाचें त्यांच्या-पुढें कांही चालेना. त्यांच्या शरीराकडे, सूक्ष्म देहाकडे, त्यांच्या त्या आवाजाकडे पाहून हंसण्याचें किंवा हेटाळणी करण्याचें गरुडाच्या मनांतही आलें नाहीं. या वालखिल्यऋषींच्या तपःप्रभावानेंच आपला जगतीतलावर संभव झाला, या गोष्टीचें त्याला विशेषच वाटलें! त्या ऋषींकडे पाहून, त्यांचें तपःसामर्थ्य ध्यानांत येऊन अणुरेणुतही ईश्वर समावलेला असतो, त्याला वंदन केलेंच पाहिजे, त्यापुढें मान नमविलीच पाहिजे, हें गरुडाच्या मनांत आलें. त्याबरोबर वालखिल्य ऋषींच्या पुढें गरुडाची मान आपोआप नमली. गरुडाचें शालीनत्व पाहून, नम्रत्व ध्यानात येऊन वालखिल्यऋषींना अत्यंत हर्ष झाला! हर्षभरानें त्यांनीं त्याला अनेक आशीर्वाद अंतःकरणा-पासून दिले. त्याचा यथाशक्ति गौरव केला. चिमुकल्या वाटींतून दूध वगैरे त्याला दिलें. संकोचित मनानें गरुडानें त्या सर्वांचा स्वीकार केला. या ऋषीमहामुनींना स्वर्गांतून अमृत आणल्यावर त्यांना त्यांतील भाग द्याव-याचा, असें त्यानें मनाशीं ठरविलें.

वालखिल्यांनीं पुनः पुन्हां गरुडाचें अभिनंदन केलें. आपलें एवढें ऐकलें. आपल्याकरितां थांबला, त्याबद्दल त्याची पुष्कळ पुष्कळ स्तुति केली, आणि निरोप देतांना तें त्याला म्हणालेः—

"महेंद्र केवढाही बलिष्ट असला, तरी त्याला दिपून जाण्याचें तुला कारण नाहीं!"

"त्याला तूं सहज जिंकशील!"

"परंतु तो अत्यंत उन्मत्त झालेला असल्यामुळें, तुझ्या तो सामोप-चाराच्या किंवा तशाच एकाद्या अन्य सौम्य उपायाच्या पकडींत सांपडून

अमृत तुझ्या हातीं लागूं देईल, असें मुळींच समजूं नकोस ! ”

“ त्याकरितां महेंद्राशीं तुला झुंजच द्यावी लागेल ! ”

“ ती तूं खुशाल दे ! त्यांत तूं विजयी आहेस ! ”

वैनतेयानें अत्यंत नम्रतेनें वालखिल्य ऋषींना नमन केलें. निरोप घेतला आणि तो तेथून निघाला. त्यावेळीं “ आमच्या खगेंद्राचा जयजयकार असो ! ” अशी वालखिल्यांनीं एकत्र गंभीर घोषणा केली !

गरुडाच्या कानांत ऋषींची घोषणा एकसारखी किती तरी वेळ घुमत राहिली होती ! ऋषींनीं केलेला गौरव, ऋषींनीं गाईलेली स्तुति क्षणांत उत्साहित करी, तर क्षणांत विषासारखी झोंबे. त्या विषानें गरुडाची अगतिकासारखी अवस्था होई. त्याचे पाय अडखळत ! बुद्धि भ्रष्ट होऊं पाहे ! अशा वेळीं त्याला वाटे कीं, हे सारे माझी स्तुति कां करतात ? स्तुतीनेंच मला मारावयाचा, मला लुळापांगळा करावयाचा तर त्यांचा विचार नाहीं ? माझ्या ध्येयापासून मी ढळावें, म्हणून तर कद्रूमाईनें कौशल्यानें हें कौटिल्य रचलें नसेल ? त्याचें एक मन म्हणे ‘ होय ! तसेंच असेल. त्याशिवाय असें व्हावयाचें नाहीं. नाहीं तर अशी अवास्तव उठल्यासुटल्या आपली स्तुति कोण करील ? ’ दुसरें मन सांगे, ‘ छेः तसें नाहीं. कद्रूमाईचा येथपर्यंत अगोदर हातच पोंचावयाचा नाहीं. तिनें कौटिल्य करण्याचें मनांत आणलें तरी, या महाभाग ऋषीमुनींनीं तिचें कां ऐकावें ? ते खास ऐकणार नाहींत ! कद्रूमाईच्या कौटिल्याला बळी पडण्याइतके ते हलके नाहींत ! तेव्हां ते आपली स्तुति करतात—गौरव करतात, तें बरोबरच आहे. बरोबरच करतात ! त्यांचा हेतु अयोग्य नाहीं. परंतु आपल्यालाच तें सहन करण्याचें, स्तुति गौरव पचविण्याचें सामर्थ्य नाहीं ! ’

शेवटीं त्याला हीच विचारसरणी पटे. पण जें सामर्थ्य आपल्याजवळ नाहीं, तें आणावयाचें कसें ? स्तुतिगौरवाचा पगडा आपल्यावर बसूं नये, याकरितां काय करावयाला पाहिजे ? कोणत्याही बिकट परिस्थितींत ध्येयाचा तारा दृष्टिपुढून ढळतां उपयोगी नाहीं, याकरितां काय करावयाला पाहिजे ? स्तुतिगौरवादि विषें आपल्याला पचवितां येतील कशी ?—

अशा प्रकारची त्याची विचारमालिका सुरू होई. त्याचें मार्गक्रमण व हे विचार बरोबरच चालत ! एकदां स्तुतीवर ध्येयाचा पगडा बसत आहे, तर दुसऱ्या वेळीं ध्येयाला मागें सारून स्तुतिविष आपला प्रभाव गाजवीत आहे, अशा प्रकार चालला असतां गरुडानें गंधमादन पर्वतापर्यंत मजल मारली. तेथपर्यंत त्याच्या मनांत परस्परविरोधी विचारविकारांचा सतत झगडा चालू होताच ! ज्या वेळीं तो गंधमादन पर्वतावर पोंचला, त्यावेळीं त्याच्यावर स्तुतिगौरवाच्या विषाचा प्रभाव चांगलाच होता. त्यांतून सुटका कशी करून घ्यावी, याबद्दल त्याची तळमळही चांगलीच तीव्र झाली होती. अशा वेळीं गंधमादन पर्वतावरील वारा त्याच्या अंगाला स्पर्श करूं लागला. वनपुष्पांनीं सुगंधित झालेलें वातावरण त्याचें मन रिझवूं लागलें. हलकेंच कसला तरी कोणाचा तरी गंभीर, पवित्र ध्वनी कानावर येऊं लागला ! त्या ध्वनीनें गरुडाला कांहीं विलक्षणच होऊन गेलें. त्या ध्वनी-कडे त्याचें सर्व चित्त वेधलें. विचारविकारांची सर्व भुतावळ कोठच्या कोठें नाहींशी झाली ! गरुडाच्या हृदयांत खोलखोल दडालेल्या शुद्ध, पवित्र, वृत्ति जागृत होऊं लागल्या.

तो ध्वनि कसला होता ? तो ध्वनी म्हणजे महन्मंगल गायत्रीमन्त्राच्या पवित्र उच्चाराचा होता ! आदिनारायणाचा उच्चार कोणीतरी करीत होते !

तो परम कल्याणकारी मन्त्र कोण जपत होते ? कोणाची भगवच्चरणीं समाधी लागून तल्लीन वृत्ति झाल्या होत्या ?

वैनतेयानें चोंहीकडे निरखून पाहिलें ! तेव्हां त्याला कोण दिसलें ? कोणाला पाहून त्याला ब्रह्मानंद झाला ? कोणाला कडकडून भेटावयाला गरुड त्वरेनें धांवला ?

विरक्तवृत्तीनें श्री विष्णूभक्त शेष भगवच्चरणसान्निध्य मिळावें म्हणून नासाग्री दृष्टि ठेऊन "ॐ भुर्भुवस्वः" या महामन्त्राचा एकसारखा घोष करीत होता ! शेषाला–आपल्या आवडत्या बंधूला गरुडानें दुरूनच ओळखलें. त्याचा हर्ष गगनांत मावेना. तो धांवत त्याच्याजवळ गेला.

# प्रकरण अकरावें

गरुड जवळ येतो आहे तोंच शेषाची समाधी उतरली. त्यानें नेत्र उघडले तों समोर गरुड !

परस्परांनीं परस्परांना पाहिल्यानंतर परस्परांना जो आनंद झाला, तो काय वर्णावा ? बंधुबंधूची ती भेट ! जीवशिवांचीच ती भेट ! तिचें वर्णन कोणाला कसें करतां येईल ? परस्परांनीं क्षेमालिंगन दिलें. दोघेही श्री विष्णूचे परमभक्त. दोघांनाही एकच ध्यान ! दोघांचेही एकच चिंतन ! गायत्री मन्त्राच्या महामन्त्राचा उच्चार अजून वातावरणांत दुमदुमत होता. त्याला पडसाद गरुडाच्या वाणीकडून अगदीं खोल अंतःकरणांतून निघून मिळत होता !

किती वेळ तरी दोघे स्तब्ध होते. काय बोलावयाचें ? बहुता दिवसांच्या भेटीनें बंधुप्रेमाचा सागर इतका उचंबळला होता, कीं त्यांत शब्दवीचि उठावयाला स्थिरताच नव्हती ! दोघेही मूक भाषाच मनमुराद बोलत होते ! पुष्कळ वेळानंतर गरुडाला वाचा फुटली. त्यानें विचारलें:—

" प्रिय बंधु ? इकडे कोणीकडे ? आणि हें काय ?"

" प्रिय बंधु ? पारलौकिक चिरंतन कल्याणासाठीं ? आणि हें काय म्हणून विचारतोस ? बंधु, हें भगवच्चिंतन ! इतक्यांतच विसरून गेलास ? आपण लहानपणापासून, जेवतांना, खेळतांना, झोंपतांना आदि नारायणाची स्तुति ज्या मन्त्रानें करीत होतों तो हाच महामन्त्र मोठया आवडीनें, प्रेमानें, भक्तिभावानें म्हणत होतों ना ? सगळ्यांना झुकांडी देऊन, आश्रमापासून दूर जाऊन सरितातटाकीं बसून डोळे मिटून हाच पवित्र मन्त्र गात होतों ना ? आणि तो इतक्यांतच तूं अगदीं विसरलास ! "

" नाहीं बंधु ! " गरुड हें उत्तर देणार. पण त्याचें कारणच उरलें नाहीं. त्या उत्तराऐवजीं तो मन्त्रच त्याची जीभ उच्चारूं लागली. एक-दोन वाक्यांतच दोघांच्याही डोळ्यापुढें त्यांचें रम्य बाळपण उभें राहिलें.

" माझी विनता माता कुशल ? " शेषानें विचारलें.

" क्षेम ! " उत्तर मिळालें.

" माझा अरुण बाळ ? " पुन्हां प्रश्न आला.

" तोही."

" मग त्यांना सोडून तूं इकडे कोणीकडे ?" आणखी प्रश्न आला.

" इकडे मी कोणीकडे ?—बंधु, याचें उत्तर काय देऊं मी ? "

" कर्कोटकादि बंधूंच्या वृत्ति अजून बदलल्या नाहींत ना ? "

गरुडानें नुसतेंच त्याच्याकडे पाहिलें.

" कद्रूमातेनें विनतामातेचें बंधमोचन केलें काय ? "

" अजून केलें नाहीं ?—"

" अरेरे! मी माझ्या तपश्चर्येच्या आदिअंतीं भगच्चरणीं नित्य प्रार्थना करीत असतों कीं, कद्रूमातेला सद्बुद्धि दे. बंधूंच्या ठिकाणीं सद्वासना निर्माण होऊं देत. भगवंतांना माझी प्रार्थना सार्थ व्हावी, असें अजूनही वाटलें नाहीं काय ? " शेष हळूंहळूं उद्गारला.

" बंधु, तुझी प्रार्थना देवाघरीं रुजू झाली आहे. " गरुड उत्तरला.

" म्हणजे काय ? "

" कद्रूमाईच्या अंतःकरणाला दयेचा पाझर फुटला. तिनें विनतामातेला बंधविमोचन करण्याचें आश्वासन दिलें–म्हणून तर मी तिच्या आज्ञेनुसार निघालों आहें–"

" बंधु, तूं अधिकच मला घोंटाळ्यांत घालीत आहेस ! मला कांहींच समजलें नाहीं ! कृपा कर आणि मला स्पष्ट काय तें सांग !" शेष फारच अधीर होऊन विचारूं लागला.

" कद्रूमाईला स्वर्गांतून अमृत आणून मी द्यावयाचें आणि कद्रूमाईनें विनतामातेचें बंधविमोचन करावयाचें असें आश्वासन मिळालें म्हणून–"

" तूं स्वर्गांत अमृत आणावयाला निघाला आहेस ! " गरुडाचा आशय समजल्यावर शेषानेंच त्याचें बोलणें पुरें केलें ! " तुझ्या कार्यांत यश प्राप्त होवो ! बंधु, कद्रूमाईच्या आणि कर्कोटकादिकांच्या कुटिल कारस्थानांची दुर्गंधी मला सोसली नाहीं. त्यांच्यांत रहावेना ! म्हणूनच हा मार्ग मी पत्करला ! आत्मोद्धार हाच एक माझा आतां जीवित हेतु आहे ! " शेषानें आपलें अंतःकरण उघडें केलें. तें ऐकून गरुडालाही अत्यंत समाधान

झालें ! शेषानेंही अंतःकरणपूर्वक इच्छा प्रकट केली. हें पाहून शेषाबद्दलचें त्याचें प्रम शतगुणित झालें. त्यानंतर त्यांचें अवांतर असें किती तरी बोलणें झालें. शेषाची विरक्ति, त्याची ध्यान–धारणा, त्याचा निदिध्यास, त्याचें परमात्मचिंतन, यांत तर तो इतका तल्लीन झाला कीं, त्याच्या तुलनेनें आपण कांहींच नाहीं असें पाहून, स्वतःच्या स्वतःला दोष देण्यापर्यंत त्याची पाळी आली. संभाषणाच्या ओघांत भावनोद्रेकानें तो म्हणाला कीं, " प्रिय बंधु, तें कांहीं नाहीं ! मीही तुझ्याचप्रमाणें, तुझ्या सन्निध राहून भगवच्चिंतन करणार ! मीही जन्मसार्थकतेसाठीं तुझ्याप्रमाणेंच उग्र तपश्चर्या करणार ! "

त्यावर शेष किंचित् हंसून त्याला म्हणाला " प्रिय बंधु, हेतु स्तुत्य आहे ! पण त्या तपश्चर्येची तुला आज आवश्यकता काय आहे ? "

" कां बरं ? "

" विनतामातेचें बंधविमोचन तुला करावयाचं आहे ! त्याकरितां तूं स्वर्गावर स्वारी करावयाला निघाला आहेस. तुला अमृतप्राप्ती करून घ्यावयाची आहे. आज ही तुझी तपश्चर्या आहे ! तीच तूं आचरणें योग्य आहे ! माझ्या तपश्चर्येहून तुझी तपश्चर्या कोणत्याही प्रकारें कमी नाहीं ! ईश्वरसेवेइतकंच मातृसेवेचंही महत्त्व आहे ! मात्र–"

" मात्र काय ?–" गरुडानें मध्येंच विचारलें. त्याला शेषाची विचारसरणी पूर्णपणें पटली. त्याची चूक त्याच्या लक्षांत आली. तो अगदीं ओशाळल्यासारखा झाला. अशी चूकसुद्धां व्हावयाला स्तुतिविषाच्या अतिरेकाचेंही कारण असेल. पण त्याची चुकसुद्धां योग्य ठिकाणींच घडली होती. त्या चुकीची दुरुस्ती करावयाला शेषासारखा खंबीर बंधु पाठीशीं उभा होता. त्यानें फिरून शेषाला विचारलें " मात्र काय ?–"

" आपल्या तपश्चर्येचं अधिष्ठान ईश्वराच्या ठिकाणीं असूं दे. ईशचिंतन करावं. पुढं पाऊल टाकावं ! म्हणजे कार्यसिद्धि होते. संकटें आड येत नाहींत. कसले मोह उत्पन्न होत नाहींत, किंवा कशाची बाधा बाधत नाहीं!" शेषानें सांगितलें.

हें तर गरुडाला निखालस पटलें. स्तुती विषयावर ही तर जालीम मात्रा मिळाली. गरुडाचा आतां निश्चयच झाला. भगवच्चिंतन आणि ध्येय याखेरीज विचार नाहीं, उच्चार नाहीं किंवा आचारही नाहीं ! प्रेमळ बंधुशिवाय कोण इतकें स्पष्ट सांगणार ? कोण चुकलेल्या मार्गावरून परत आणणार ? कोण धीर देणार ? असें भाग्य ज्यांना असेल ते केवढे थोर ! गरुडाचें भाग्य तसेंच थोर होतें.

शेषाजवळची आत्मविश्वासाची अशी जडीबुट्टी घेऊन, गरुड पुढें जायला निघाला. शेषानेंही त्याला अत्यंत प्रेमानें निरोप दिला. निरोप देतांना, " माझ्या तपश्चर्येच्या आदिअंतीं, " कद्रूमातेला आणि कर्कोट-कादि बंधूंना सद्बुद्धि दे. त्यांचा उद्धार होऊं दे. " ही जशी प्रार्थना आज-वर करीत आलों आहें, त्यांतच 'माझ्या बंधूला अमृतप्राप्ती सुलभ रीतीनें स्वर्गांत होऊं दे आणि विनतामाता लवकर बंधमुक्त होवो,' ही प्रार्थना करीत जाईन ! " याप्रमाणें म्हटलें. परस्परांनीं जातांना प्रेमभरानें दृढा-लिंगन दिलें. नंतर गरुडानें पुढचा मार्ग पत्करला.

आतां भगवच्चिंतन आणि मार्गक्रमण एवढेंच गरुडाचें कार्य झालें. ऋषीमुनी मागें पडले. आशिर्वाद, गौरव, स्तुती वगैरे पाठीमागें राहिली. मार्गही विशेष बिकट लागला. फलभारांनीं लवलेले वृक्षही क्वचितच आढळूं लागले ! जसजसें पुढें जावें तसतसे हिमाच्छादित प्रदेश लागूं लागला. गारठा वाटूं लागला. गरुडाच्या शरीराबरोबर मनालाही स्वर्गाचा मार्ग अत्यंत कठीण—दुरापास्त हें पटूं लागलें ! परंतु भगवच्चिंतनाबरोबर ध्येयही भडकपणानें डोळ्यापुढें असल्यामुळें गरुडाचें एकेक पाऊल जिकी-रीनें पुढें पडत होतें !

भूक लागली तर जवळ कांहीं नाहीं. शीतनिवारण होईल म्हटलें तर पुरेसें शरीरावर वस्त्र नाहीं. बसावें म्हटलें, उभें राहावें म्हटलें, किंवा चालावें म्हटलें तरी हिमांतच ! बसतां येत नाहीं, उभें राहावयाची सोय नाहीं, चालणें दुर्घट झालें आहे. पदोपदीं परत फिरावें असें वाटे, पण परत फिरून करावयाचें काय ? स्वर्गांतलें अमृत कसें प्राप्त होणार ? आई स्वतंत्र

कशी होणार ? ' आई.! ' म्हटलें–अगदीं थकून भागून–श्रांत–क्लांत होऊन ' आई ' म्हटलें कीं सर्व पूर्वस्मृति व्हावी आणि उभें राहण्यास आग्रह करणारी बुद्धि नष्ट होऊन पुढें चालण्याचें अवसान व्हावें.

मातृसेवा सुखाची नाहीं. ऐषआरामाची नाहीं. ती अशी खडतर आहे ! खडतर आहे म्हणूनच तिला महत्त्व आहे. श्रेष्ठता आहे. गरुडाचे जीव गोळा होऊन येऊं लागले. पोटांत क्षुधेनें कल्पांत उडविला. शरीरांत कोण-त्याही प्रकारचें त्राण उरले नाहींत ! देहपात येथेंच कोठें तरी होणार असें जवळ जवळ त्याला वाटूं लागलें. " आपला देहपात होणार ? तो येथें आणि असा ? मग अमृतप्राप्ति कशी होणार ? आईची मुक्तता कशी होणार ? " हा विचार बळावूं लागला. " त्यापेक्षां परत फिरणें बरें नव्हे काय ? " दुसरा विचार डोकावूं लागला. " पण समज, असेच आपण चिकाटीनें पुढें गेलों. अघटित पराक्रम करून स्वर्गांतून अमृत घेऊन परत आलों. पण तें आणण्यापूर्वींच कद्रूमाईच्या छळाला आपली माता बळी पडली असली, तर ?–" किती दुष्ट मन ! या मनाच्या नुसत्या ओझरत्या विचारानें सर्वांगाचा थरकांप उडे ! असा विचार आपल्या मनांत कां आला ? म्हणून त्याचा तोच स्वतःवर रागावे ! त्या झटक्यांत आणखी दोन पावलें पुढें पडत ! असे दुष्ट विचार कधींही फलद्रूप व्हावयाचे नाहींत. आपलाही येथें देहपात व्हावयाचा नाहीं, किंवा माताही सुखसोहळे उपभो-गल्यावांचून राहावयाची नाहीं. हा विचार तशाही स्थितींत त्याला सुखवी. ईर्षा उत्पन्न करी.

पण नुसती ईर्षा काय करणार ? पोटांत अन्नाचा लवलेश नसतांना किती काळ निभावतां येणार ? कद्रूमाई आपल्यासमोर ठेऊन तशी उपाशी मारीत होती. दुसऱ्या खडतर अटीनें अशी उपाशी मारीत आहे ! देहधा-रणापुरतेंही पोटांत कांहीं गेलें नाहीं, तर हातपाय चालावयाचे कसे ? परा-क्रम घडावयाचा कुठून ?

काय ? माझी आई स्वतंत्र होऊं नये असाच ईशसंकेत आहे ? काय, ऋषीमुनींचे, अनाथ अपंगांचे, गरीब दुबळ्यांचे पुण्याशीर्वाद फोल ठरणार ?

आणि माझा देहपात, ध्येयपात आणि पुण्यपात इथेंच होणार ? कितीही दुष्ट कल्पना मनांत येऊं द्यावयाची नाहीं म्हटलें तरी पोटाची आग तशा दुष्ट कल्पना उत्पन्न करते !

आतां अन्नाचा अंश पाहिजे. पुढें मार्ग दाखविणारा हात पाहिजे. धीर देणारा गुरु पाहिजे, तरच तरणोपाय आहे, असें गरुडाला निकरानें वाटूं लागलें. त्याचें भगवच्चिंतन अखंड चालू झालें !

अशी ज्या वेळीं चोहोंकडून अगतिक स्थिति होते गुरुदर्शनाची आत्यंतिक तळमळ लागून राहाते, त्यावेळीं परमेश्वर एकनिष्ठेची कसोटी पाहून गुरुदर्शन घडवीत असतो ! गरुडाची येथवर स्थिति आली. त्याचा निरुपाय झाला. पुढचा पाय पुढें मागचा मागें, डोळे मिटूं लागले. शरीर गलितगात्र झालें. भगवच्चिंतनाचा उच्चार करण्याचेंही त्राण जिभेंत उरलें नाहीं !

याच वेळीं ध्यानमग्न असलेले भगवान कश्यपमहामुनी आपली समाधि विसर्जन करून उठून बाहेर येतांना जवळच गरुडाच्या दृष्टीस पडले ! प्रत्यक्ष पितृदर्शन ! गुरुदर्शन ?

गरुडाला त्याही स्थितींत अत्यंत हर्ष झाला त्यानें क्षीण स्वरांत हांका मारली "बाबा ! बाबा !"

कश्यप महामुनींचें आपल्या पुत्राकडे लक्ष गेलें. त्यानें मारलेल्या हांका ऐकल्या ते तसेच तातडीनें त्याच्याजवळ गेले. गरुड अगदीं मेटाकुटीस आला होता. कश्यप महामुनींनीं जवळ येऊन गरुडाच्या अंगावरून हात फिरवला. त्याला घेऊन आपल्या तपश्चर्येच्या ठिकाणीं आणलें. त्यानें सांगण्यापूर्वींच गरुड क्षुधेनें अत्यंत पिडला आहे, हें पुत्रवत्सल पित्यानें जाणलें त्याला खायला प्यायला देण्याची व्यवस्था केली. गरुडाला त्यानंतर जीव आल्यासारखें झालें !

पितृदर्शनानें गरुडाचा पुनर्जन्म झाला. त्याचा आत्मविश्वास बळावला ! पिता म्हणजे गुरुमाऊली ! गुरुनेंच अभय कर मस्तकीं ठेवल्यावर गरूड कळीकाळाला थोडाच भीक घालणार आहे ?

## प्रकरण अकरावें

शक्ति आल्यावर पुष्कळ वेळानें कश्यप महामुनींनीं गरुडाला सर्व हकीकत विचारली. त्यानें ही निःसंकोच मनानें अतिशय थोडक्यांत पण स्पष्ट निवेदन केली. त्या बरोबर आपल्या स्वर्गावरच्या स्वारीचाही उल्लेख केला!

सर्व हकीकत ऐकून कश्यप महामुनी कांहीं वेळपर्यंत अत्यंत उद्विग्न झाले! कद्रूच्या वागण्यानें त्यांना विमनस्कता प्राप्त झाली. भवितव्य म्हणून त्यांनीं एक दीर्घ निश्वास सोडला!

जशी कद्रूच्या आणि तिच्या मुलांच्या हकीकतीनें त्यांना उद्विग्नता आली, त्याचप्रमाणें गरुडाचें धैर्य, त्याचा उद्देश, त्याची चिकाटी, त्याचें ध्येय, त्याचें वर्तन वगैरे पाहून कश्यप महामुनींना अधिकच संतोष वाटला! "तूं आपल्या मातेला निश्चित बंधनांतून मुक्त करशील!" असा गरुडाला मनोभावानें आशिर्वाद दिला! त्याला पुढील मार्गाची माहिती करून दिली. अडचणींची, मोहांची स्थळें सांगून ती चुकविण्याची दिशाही दाखवून दिली. यापुढील मार्गांत क्षुधा अधिकच कल्पांत करणार, त्याकरितां गरुडाच्या विनंतिवरूनच देहधारणेकरितां, ध्येयसिद्धीकरितां, निरुपाय म्हणूनच कश्यपमहामुनींनीं जागजागीं हिम प्रदेशांत आढळणारे प्राणी भक्षण करण्यास आज्ञा दिली! आतां गरुड अगदींच निर्भय निश्चींत झाला स्वर्ग अल्पावकाशांत गाठणार असा त्याला पूर्ण भरंवसा वाटूं लागला!

तपश्चर्येला बसण्यापूर्वी कश्यपमहामुनींच्या चरणावर मस्तक ठेवून पुढील मार्ग आक्रमावयाचा, तोंपर्यंत विश्रांती घ्यावयाची, असें गरुडानें वडिलांशीं बोलत असतांच ठरवून टाकलें!



## प्रकरण बारावें

–सौन्दर्याच्या, मायेच्या बाजाराला भुलावयाचें, मातृसेवेला विसरून जाऊन,
आईला आणि भावाला परदास्याच्या नरकांत तसेंच पिंचत ठेवून
आपण निरंतर स्वर्गसुखांत राहण्याची अधम लालसा धरावयाची!
त्या मोहला बळी पडावयाचें? धिग् धिग् आपलें जिणें!–

"आई, कर्कोटक पुन्हां अरेरावीनें वागावयाला लागला!"

"वागूं दे! ते तसेच वागायचे!"

"पण त्यांनीं आपल्याशीं वागायच्या अटी पाळल्या नाहींत!"

"त्यांचा तो धर्मच नाहीं! त्यांच्या अटी पाळण्याकरितां नसतातच!"

"पण त्यांच्याकडून हडसून खडसून गरुडदादानं कबूल करून घेतलं होतं! मग आतां ते असे कां वागतात? आम्हीं कांहीं त्यांच्याशीं वावगे वागतों का? आम्हीं आमच्या कर्तव्यांत चुकतों का?"

"अरुणा, तूं अगदीं वेडा आहेस!"

"कद्रूमाईसुद्धां पहिल्याप्रमाणेंच वागते! गरुडदादानें परत येईपर्यंत तिनें तरी म्हटल्याप्रमाणें वागायला नको काय?"

"अरे, ती तशी कां वागेल? तिच्या हातांत सत्ता आहे, तोंवर ती तशीच वागणार!—"

"आणि आपल्याला छळीत राहणार."

"हो."

"मग त्यांत फरक केव्हां व्हायचा?"

"बाळ स्वर्गांतून अमृत घेऊन येईल तेव्हां?"

मायलेकरांचें वरील अर्थाचें संभाषण गरुड स्वर्गाकडे गेल्यानंतर बहुधा चारदोन दिवसांनीं होतच होतें. कद्रू अगोदर जशी वागत असे, तसाच क्रम तिचा अजूनही चालू होता. गरुडाची दहशत दूर झाल्यामुळें कर्कोटकादि मंडळी अधिकच चेकाळली होती. पांगळा आपलें काय करणार? म्हणून त्याच्या पाठीशीं ते अधिकच लागत. त्यांतच त्यांना ज्या रूपवती

# प्रकरण बारावें

स्त्रीनें चटका लाविला होता—वेडे केले होते ती त्यांना झुकांडी देऊन लहर येऊन कोठें तरी अदृश्य झाली होती. त्यामुळें कर्कोटकादि सत्ताधाऱ्यांना अधिकच पिसाळल्याप्रमाणें झालें होतें. त्या कारणानें त्यांच्या छळाला अधिकच जोर आलेला होता. दुसरीकडचा सर्व राग सत्ताधारी हाताखाल-च्यावरच काढून घेत असतात. भावी भाग्यावर दृष्टि खिळवून विनता व अरुण त्यांचे सर्व छळ सोशीत असत. 'अरेला कारे' म्हणण्याची धमक आंगीं नसल्यावर करावयाचें कसें? 'अशुभस्य कालहरणम्' या न्यायानें वागावयाचें, दुसरें काय? विनतेची व अरुणाची दिनचर्या अशाच प्रकारानें चालली होती.

"स्वर्गापर्यंत बाळ जाऊन पोंचला असेल नाहीं बरं?" विनतेनें अरु-णाला मनाला व देहाला अत्यंत क्लेश झाले म्हणजे विचारावें.

"अर्थात्! एव्हांना तो पोंचलाच असला पाहिजे. त्याची भरारीच तशी विलक्षण आहे. एकदां त्यानं मनांत आणल्यावर मध्येंच कोठें थांबा-वयाचा नाहीं!" अरुणानें आईला धीर येण्याकरितां उत्तर द्यावें.

"बाळ कुठं विश्रांति घेत असेल?" हताश होऊन विनतेनें आपल्या-शींच पुटपुटावें.

"खरंच आई, गरुडदादाला वाटेंत खायला तरी काय मिळत असेल?"

"त्याला कोणी आस्थेनं आश्रय देत असतील का?"

"दादाला आपली आठवण होत असेल का?"

"आपल्याला त्याची आठवण होते आहे ना? मग तो आपली आठ-वण कसा विसरेल? आपल्याकरितांच तर त्यानें स्वतःचा जीव ब्रह्मार्पण केला आहे ना?"

"मग दादा अमृत घेऊन अगदीं लवकर येईल नाहीं?"

"अगदीं लवकर येईल!"

सत्ताधाऱ्यांच्या छळानें गांजलेले जीव हृदय भरून येऊनच बोलूं लागत! त्यांच्या बोलण्यांतच निराशेतून आशा जन्म घेई. गरुड अमृत लवकर आणणार, हें मनांत येतांच त्या मायलेकरांचीं मनें आनंदानें प्रफुल्ल होत!

त्यावेळचा तो अननूभूत आनंद अरुण तितक्याच आनंदानें आईजवळ व्यक्त करी ! विनता त्याच्या पाठीवरून प्रेमळ हात फिरवीत अरुणाप्रमाणेंच आपलेंही मन दिव्यानंदानें तुडुंब भरून गेलें आहे हें न बोलतां— नुसत्या मूकवाणीनें अरुणाला सांगे.

" आई ! आपल्याला आतां किती आनंद झाला आहे नाहीं ? "

विनता त्याकडे पाहून उत्तरादाखल नुसती हंसे !

" आई, आपल्याप्रमाणेंच गरुडदादा यावेळीं आनंदांत असेल का ? त्याला आनंद झाला असेल का ? "

" खचीत झाला असेल ! "

" तें कसें ? "

" ज्यावेळीं आपल्या दोघांला इथं त्रास होत असतो, कद्रूमाई आपल्या सत्तेच्या लत्ता कारणाशिवाय पाठींत घालीत असते आणि आपल्याला दुःख होत असतं, त्यावेळीं बाळालाही मार्गांत तशाच बिकट अडचणी छळीत असतील, त्याला त्रास देत असतील. त्या कारणानं तिकडे तो दुःखी असेल ! आतां आपण यावेळीं आनंदांत आहोंत तर बाळाला त्याच्या आत्मविश्वासानें अडचणींतून पार पाडून आनंदीत केलं असेल ! " विनता अरुणाला आपली विचारसरणी समजून देत होती. विनतेचे उद्गार ऐकून अरुणाला कांहीं विलक्षण वाटलें ! त्या भरांत तो अगदीं नाचूं बागडूं लागला. त्या भरांत तो आपले आणि आपल्या आईचे सारे दुःखकष्टही विसरला !

" असं आहे तर " अरुण आईला नाचतबागडतच सांगूं लागला, "आई, आपण नेहमींच आनंदांत असूं या. केवढाही त्रास झाला, कितीही छळ झाला, तरी आपण आनंदांतच राहूं या म्हणजे गरुडदादा तिकडे नेहमीं आनंदांत राहील आणि त्याच्या हातून अमृतप्राप्तीचं कार्य सहजरीतीनं होईल आणि आपण सर्व दुःखांतून मुक्त होऊं ! "

" माझा अरुणबाळ कित्ती कित्ती शहाणा आहे ! " विनतेनें लडिवाळपणानें अरुणाचा पटदिशीं एक मधुरसा पापा घेऊन म्हटलें. " बाळ, तुझी

वाचा सोन्याची होईल. तूं म्हणतोस तसंच करूं. आपण नेहमींच आनंदांत असूं या. महत्कार्याला पुढें सरसावलेल्या कार्यकर्त्याला पाठिंबा द्यावयाचा असतो! तोच पाठिंबा कार्यांत यश द्यावयाला कारणीभूत होतो!"

तीं मायलेंकरें त्या प्रसंगीं किती तरी आनंदित दिसत होतीं!

तीं इकडे अशी आनंदमग्न असतांना त्यावेळीं गरुड कोठें होता?—

गरुड आपल्या पित्याची अनुज्ञा घेऊन, भरारीसरसा स्वर्गाच्या सीमारेषेवर येऊन उभा ठाकला होता!

स्वर्ग! प्राणिमात्र ज्याची कल्पना नेहमीं घोळवीत असतात, जिथल्या सुखांची इच्छा करीत असतात तो स्वर्ग! 'आपण येथपर्यंत आलों!' या विचारानें गरुडाला हायसें वाटलें. तो इकडे तिकडे पाहातो आहे, त्याच्या नेत्रांना जिकडे पाहील तिकडे उत्सव चालला आहे असें दिसत आहे! गरुडाची दृष्टि तरळली. त्याला विचारालाही अवधी मिळाला नाहीं, इतक्यांत स्वर्गातील सुखें सकुटुंब सपरिवार त्याच्या सभोंवार जमूं लागलीं. अनेक पुण्यकर्मे करून, खडतर तपश्चर्या आचरून अनेक पुण्यात्मे स्वर्ग गांठतात केव्हां आणि त्यावर आपण होऊन झडप घालून, आपल्या पाशांत ओढून, त्यांचा पुण्यसंत्तम संपुष्टांत आणून त्यांना अधोगतीला पोंचवितों केव्हां असें स्वर्गातल्या सौख्यांना होऊन गेलेलें असतें. किंवा तसें करीत राहण्याची सक्त आज्ञाच स्वर्गातल्या देवांची त्यांना असतें.

गरुड स्वर्गांत उभा राहताक्षणींच त्या सुखांची दाटी निरनिराळ्या स्वरूपांत, निरनिराळ्या मिषानें व वेषानें एकदम झाली! स्वर्गीचें उद्यान सदा भरलेलें! नाना प्रकारचीं पुष्पें प्रफुल्ल झालेलीं! त्यांचा सुगंध दरवळलेला! रुचीला अवीट, रसानें टचटचलेलीं फळें वृक्षांना निरंतर लगटलेलीं! अनंत अत्तरांचे खच सांचलेले! निर्मल जलांच्या पुष्करणी तुडूंब भरलेल्या! सुगंधीत जलांची कारंजीं अविश्रांत थुईथुई करीत राहिलेलीं! स्वर्गीच्या उद्यानाची ही शोभा पृथ्वीवरच्या पुण्यात्म्याला आपली बरीच पुण्याई याच ठिकाणीं वेंचावयाला लावी! गरुडाची गति स्वर्गीच्या उद्यानांत—नंदनवनांत—भटकतांना काय झाली असेल, हें सांगतां येणें कठीण आहे!

## मातृसेवा

डोळे, कान, मन, शरीर, इच्छा, हौस, या सर्वांची तृप्तता करावयाला स्वर्ग सर्वथा समर्थ ! गरुडाची पापणीला पापणीच लागेना. डोळे पाहूं लागले. कान ऐकूं लागले, शरीर व मन स्पर्श व अनुभूति यांनीं मोहून गेली ! गरुड स्तिमित झाला. आपली कल्पना कुंठित होणार कीं काय ? ही त्याला धास्ती पडली ! या अचेतनांतून गरुड किंचित् वर मान करून सचेतनाकडे दृष्टि वळवीत आहे तों, स्वरूपसुन्दरा, नयनमनोहरा, चित्तविभ्रमा, अशा सौन्दर्यसपन्न ललना त्याच्या दृष्टीला पडूं लागल्या ! प्रफुल्ल पुष्पांचे ताटवे ठायींठायीं विभूषित ललना उभ्या आहेत असें भासवूं लागले, तर मंद-मंद चालणाऱ्या चंद्रिका वायूच्या मंद लहरींनीं फलपुष्पांचे ताटवे डोल घेताहेत असा भ्रम पडूं लागला !

वासंतिका, माधविका, वल्लरी, रंभा, उर्वशी, देवांगना, जोत्स्ना, चंद्रिका, नलीनी, विमला, कमला, एक कीं दोन, लक्षावधी ललना निसर्ग-शोभेशीं स्पर्धा करीत नंदनवनांतून स्वैरविहार करीत होत्या !

गरुडानें प्रथम त्यांना पाहिलें. त्यांचेंही लक्ष गरुडाकडे गेलें. पृथ्वी-वरचा नवा पुण्यपांथस्थ दिसला, त्याच्याभोंवतीं त्या भराभर गोळा झाल्या.

" वीरवर ! स्वागत असो ! "

" आपण आलांत ! आम्हांला फार आनंद झाला ! "

" आपण प्रवासाच्या दगदगीनें जरी श्रांत झाला असला—"

" तरी संकोच बाळगण्याचें कांहीं कारण नाहीं. इथं खुशाल विश्रांति घ्यावी. "

" आम्हांला लागेल ती सेवाचाकरी सांगावी ! "

" आम्हीं आनंदानें करूं ! "

" आमचा धर्मच आहे तो ! "

" आमचं कर्तव्यच आहे तें ! "

" पृथ्वीवरचे पुण्यात्मे आले म्हणजे आम्हांला किती हर्ष होतो ! "

" खरंच ! आपली कांति किती तेज:पुंज आहे !"

" अगदीं स्वर्गांतल्या देवांना लाजाविण्यासारखी !"

## प्रकरण बारावें

" आपली वाणी–पण बाई, आपण बोलतच नाहीं! आपली वाणी आमच्या कानांना ऐकूं दे गडे! "

" कांती जशी सतेज तशीच वाणी पण मधुर असलीच पाहिजे! "

" बोलायचं नाहीं कां बरें?"

" आम्हांला सेवा सांगून धन्य नाहीं का करायचं गडे?"

" मी आपले पाय चेंपू का?"

" मी आपल्याला विंझणवारा घालूं ना?"

" आपण तृषित आहांतसें दिसतें? मी निर्मळ पाणी घेऊन येतें अं?"

" मी आपल्यासाठीं मधुर आणखी ताजीं फळें घेऊन येतें! "

" मी ताज्या पुष्पांचे हारगजरे तयार करून आणतें!"

याप्रमाणें एकेक अप्सरा बोलूं लागल्या. लगट करूं लागल्या. गडबड करूं लागल्या. त्यांच्यामध्यें परकीपणा–दुजाभाव नाहींच. पूर्वजन्मींचा लागाबांधा असल्यासारख्या दृष्टीभेटीबरोबर बोलूं चालूं लागल्या. स्वर्गांत दुजाभाव–भेदभाव–आपपरभाव कोठून असणार? अप्सरांच्या या वर्तनानें गरुडाची कठीण अवस्था झाली! अशा अनपेक्षित सुखांचा बेसुमार मारा त्याच्यावर वर्षाव करूं लागला. तो दिङ्मूढ होऊन गेला. परंतु पृथ्वीवरचा पुण्यपांथस्थ बोलत नाहीं, उत्तर देत नाहीं, मुखावर विकार दर्शवीत नाहीं, वाचा उकलीत नाहीं असें पाहून अप्सरा कांहींशा खट्टु झाल्या! बोलल्या-शिवाय सावज आपल्या जाळ्यांत सांपडणार किंवा नाहीं हें त्यांना समजा-वयाचें कसें? पण एवढ्या तेवढ्यावरून त्या निराश थोड्याच होतात? एक प्रकारानें काम झालें नाहीं, तर दुसरा प्रकार करावयाचा!

" आपलं पवित्र नांव कळेल का आम्हांला? " फिरून अप्सरांनीं विचारावयाला सुरुवात केली.

करायचें काय आपलें नांव यांना कळून? असा विचार मनांत येऊन गरुड स्तब्धच राहिला!

" आपलें ब्रीद काय? " दुसरा प्रश्न दुसरीनें केला.

" मातृभक्ति! " गरुडाच्या मुखांतून चटकन् उत्तर आलें.

" आपला उद्योग ? "

" मातृसेवा ! "

" आपले विचार ?"

" मातृभक्ति !"

" आपले आचार ? "

" मातृसेवा ! "

" आपली आत्यंतिक आवड ?"

" मातृभक्ति ! "

" आपल्या आयुष्यांतल्या अत्युच्च सुखाची कल्पना काय ? "

" मातृसेवेची पूर्ति ! "

अप्सराची निराशा वाढूं लागली ! गरुडाच्या मुखांतून " मातृभक्ति " व " मातृसेवा " याशिवाय दुसरा शब्दच ऐकावयाला मिळेना. तो दृष्टीला दृष्टी भिडवीना किंवा आपल्याकडे पाहून हंसेना. विचलित होईना. " मातृभक्ति " " मातृसेवा " हे शब्दसुद्धा पुन्हां पुन्हां ऐकावेत. त्याच्या उच्चारांत–ध्वनींत सुद्धां अद्भूत तेज आहे, असें अप्सरांना वाटत होतें. पांथस्थ कसा हंसेल, कसा आपल्याकडे वळेल, याबद्दल त्या अधिकच विचार व प्रश्न करूं लागल्या. स्त्रियांचा उपजत स्वभावच असा असतो. आपल्या जाळ्यांत कोणी अडकत नाहीं, आपल्या प्रेमाचा प्रभाव एकाद्या-वर चालत नाहीं, असें पाहिलें कीं, त्या नाना तऱ्हा करूं लागतात. हट्टाला पेटतात पण आपलेंसें करूं पाहतात ! तसें झालें नाहीं तर आपलें जिणें व्यर्थ असें त्यांना वाटतें आणि मरणाहून त्याचें दुःख त्यांना अधिक वाटतें ! ही अगदीं सामान्य स्त्रियांची रीति असते. मग त्या तर स्वर्गां-तल्या बोलून चालून अप्सरा होत्या. गरुड आपल्या तावडींत सांपडत नाहीं, असें वाटल्यावर त्यांच्या जिवाचें काय झालें असेल ? हा पांथस्थ अगदीं रुक्ष, अरसिक, असा वाटून त्याचा त्यांना किंचित् रागसुद्धां आला. त्याचा तिरस्कार करावासा वाटूं लागला. पण तसें त्यांच्यानें करवेना. तो त्यांच्या प्रेमाच्या पाशांत तत्क्षणीं सांपडला असतां, तर तसेंही त्यांनीं

केलें असतें. पण तो त्यांच्या त्या जाळ्यांतच सांपडत नाहीं असें त्यांना वाटलें आणि त्यांनीं उलटच धडपड चालविली !

" खरेंच आपण कोणावर प्रेम करतां ? " एकीनें थोडा वेळ मध्यें गप्प बसून मग विचारलें !

" माझ्या मातेवर ! " गरुडाचें उत्तर ठरलेलें.

" आपण आमच्यावर नाहीं का प्रेम करणार ? "

" हीं प्रेमानं आणलेलीं मधुर फळें–यांचा प्रेमानंच नाहीं का स्वीकार करणार ? "

" हें स्वच्छ पाणी मुद्दाम आपल्याकरितां येऊन आलें आहे हो !–घ्यायचं ना हें ?–घ्यायचं ना ?"

" आपलें प्रेम आमच्यावर असूं द्या–आपल्याला सौख्य लागेल !"

"आपण आमच्यावर प्रेम करा–आपलें इच्छित मनोरथ पूर्ण होतील!"

" आपल्या प्रीतीला माझ्या प्रेमाचा हात धरूं दे–स्वर्गांतली वाटेल ती वस्तु मी आपल्या चरणीं आणीन !"

" खरंच सांगायचं आपण स्वर्गांत कोणत्या हेतूनं आलां आहांत ? स्वर्गांत आपल्याला काय मिळवायचं आहे ? "

" अमृत !" गरुडाला वाटलें उत्तर देण्यासारखा प्रश्न आहे. त्यानें पट्-दिशीं तेवढेंच उत्तर दिलें.

" अमृत ?" वासंतिका खो खो खो हंसत म्हणाली, " आपल्याला अमृत हवं आहे ? मग त्यांत कठीण तें काय ? हें पहिल्यांदाच नाहीं बरं सांगायचं ? तें आपल्या सेवेला केव्हांही तयार आहे ?

गरुड सहेतुक पण आश्चर्यातिरेकानें त्यांच्याकडे पाहूं लागला.

"इश्श ! असं काय तें पहायचं ! घ्यायचं ना अमृत ? सेवायचं ना ?–"

'म्हणजे काय ? कुठें आहे तें' अशा अर्थानें गरुडानें त्यांच्याकडे नुसतेंच पाहिलें.

" हें माझ्या अधरीं अमृत आहे हो !"

" माझ्या दृष्टींत आपल्याला अमृत नाहीं का दिसत ? "

" माझ्या गालांवर हें आपल्याला हवं असलेलं अमृत मिळेल गडे !"

" मला प्रेमाचं दृढालिंगन मिळाल्याखेरीज आपल्याला अमृताची प्राप्ती व्हायचीच नाहीं मुळीं !"

गरुडानें अमृताचा नुसता उच्चार करतांक्षणीं सर्व साजणी अमृत देण्याकरितां म्हणून अहमहमिकेनें पुढें सरसावल्या. त्यांना वाटलें पांथस्थ आपल्या आटोक्यांत आला. पण गरुड जागचा हलला नाहीं. शब्दानें, दृष्टीनें, किंवा संकेतानें त्यानें अप्सरांना अनुहुंकार दिला नाहीं. त्यामुळें त्या बोलत, पण पुढें जाण्याचें त्यांना धाडसच होईना ! त्यांच्या आतांपर्यंतच्या शृंगारचेष्टांचा गरुडावर कांहींच तादृश्य परिणाम झाला नाहीं हें पाहून त्याही हतबुद्ध झाल्या ! ह्याला वश करायला आतां करायचें तरी काय ? हें त्यांना कोडें पडलें. आतां एकजण दाताच्या कुंदकळ्या दाखवीत जवळ जाऊन गळयांत पडायचे धाष्टर्य करूं लागली. तर एक लटकें रुसूं लागली. एक लाजून दूर उभी राहूं लागली. एक दीर्घ उसासे सोडूं लागली. एक फणफणूं लागली, तर एकीचे डोळे पाण्यानें डबडबले ! सगळया जणींचे सगळे लटके चाळे ! पण दुसऱ्याला दिसायला खऱ्यापेक्षांही खरें ! हंसण्याचा, रुसण्याचा, फणफणण्याचा, लाजण्याचा, उसाशाचा हटकून गरुडावर प्रभाव चालणार, डोळयांतील पाण्याचा पूर तर त्याला कधींच ओलांडतां येणार नाहीं, ही प्रत्येकीची खात्री ! पण इतकें झालें तरी गरुड मेरूपर्वतासारखा अचल तो अचल !

इतक्यांत त्या अप्सरांत आणखी एक रुपवती स्त्री घाईघाईनें येऊन घुसली ! ती आतांपर्यंत तेथें नव्हतीच ! श्रमानें ती अधीकच खुलून दिसत होती ! तिथल्या सगळया अप्सरांच्या अगोदरच तिला गरुड दिसला. तोच तिला हवा होता. त्याला पाहातांच ती हर्षानें देहभान विसरण्याच्या बेताला आली. जवळ येतांच तिनें एकदम बोलावयाला सुरवात केली.

"खगेंद्रा, आपण स्वर्गांत भरारी मारलीत–आपल्यावरील प्रेमानें पृथ्वीवरून मला आपल्या मागोमाग असं धांवत आणलं ! प्रेमाची शक्ति कांहीं निराळीच असते ! होय ना ! वीरश्रेष्ठा, पृथ्वीवरच्या आपल्या पराक्रमाला

मी दिपून गेलें. त्याच वेळीं मी मनानें आपली दासी झालें आहे ! आपण अजून मला ओळखलें नाहींत का ?–" बोलणारी स्त्री थांबली. जसें गरुडानें तसेंच त्या सर्व अप्सरांनीं या नव्या स्त्रीकडे पाहिलें. गरुडाला मात्र किंचित् तिला ओळखलें असें वाटलें. तो विकार त्या स्त्रीलाही दिसला. तिला बरें वाटलें. ती त्याच आधारावर पुढें बोलूं लागली:–

"खगेंद्र, तुम्हीं मला ओळखलेंत ! मी माझें भाग्य समजतें. पण त्या बरोबर आपण माझ्या वर्तनाबद्दल तिरस्कार कराल. पण कृपा करून तसें करूं नका ! मी आपल्या शत्रूंच्या गोटांत राहून त्यांनाच उत्तेजन देत गेलें हें खरें. पण त्याचमुळें आपलें वीरत्व मला दिसून येऊन मी आपल्या पराक्रमानें वेडी झालें व आपल्या पायाशीं आलें ! माझ्या गतापराधाची मला क्षमा करा ! माझ्यावर अगोदर प्रेम करा असं सांगण्याचा मला आतां अधिकारच नाहीं, म्हणून मीच होऊन आपल्याला सांगतें, मी अगोदर आपल्या कार्यांत सहकारी होईन, कार्य करीन आणि मग आपल्याजवळ माझ्या हक्कानें प्रेम मागेन ! वीरश्रेष्ठा, असें आश्चर्यानें मजकडे पाहूं नका ! मी आपलें कार्य करायला आलें आहें !–"

गरुड नुसतें ऐकतच राहिला. त्या अप्सराही लक्ष लावून ऐकूं लागल्या. त्यांना वाटलें, त्याची ती प्रियकरीण आहे. दोघांचें भांडण झालें आहे, तें आतां मिटणार आहे म्हणून ती धडपड करीत आहे. ऐकूं या तर खरें यांची प्रेमकहाणी ! याच विचारानें त्या कुतुहलानें त्या ऐकत होता. असें होतें, तरी त्या स्त्रीचा त्यांना मनस्वी मत्सर वाटूं लागलाच ! स्त्रीयांचें हें असेंच असतें ! मत्सर त्यांच्या पांचवीलाच पुजलेला असतो !

आपलें बोलणें गरुड ऐकून घेतो आहे, हें पाहून तिला अधिकच धीर आला व ती पुढें सांगूं लागली "खगेंद्र महाराज, मी आपल्याला असं सांगतें स्वर्गांतून अमृतच घेऊन जायचं असेल, तर खुशाल घेऊन चला. तें ही मला आपल्याला मिळवून देतां येईल–मजबद्दल साशंक होऊं नका !–मी अमृताची सख्खी बहीण आहें. सागरकन्या आहें. मलाही सुरांनींच निर्माण करून मला 'सुरा' असें नांव दिलें आहे ! मी अमृताला हक्कानें आपल्या

कडे घेऊन येईन ?—पण मी म्हणतें, त्याची आपल्याला जरूरीच काय ?—अमृतामुळें होणारें कार्य मी अगोदरच्च केलं आहे ?—ऐकायचं आहे का तें ? ऐकायचं असेल तर !—''

सुरा आपण होऊनच एकसारखें सांगू लागली ! सुरेनें आपली ओळख दिल्यानंतर सर्व अप्सरांनीं तिच्याकडे अत्यंत आश्चर्यानें पाहिलें. ती आपल्यापेक्षां फारच चांगली बोलकी आहे, हें त्यांच्या निदर्शनाला आलें. ही आपली सखी होईल तर आपण आपला प्रभाव पहिल्यापेक्षां खचीत अधिक गाजवूं असें कित्येक अप्सरांच्या मनांत त्याच वेळीं आलें. आपल्या बोलण्याचा परिणाम गरुडावर दिसत नव्हता, तो सुरेच्या भाषेनें त्याच्यावर होतो आहे, हें त्यांनीं पाहिलें आणि मगच त्यांचें तिच्या विषयींचें मत बदलत चाललें.

'' खगेंद्र महाराज, '' सुरा पुढें सांगू लागली, '' ज्या पणानें आपणाला व आपल्या मातेला कद्रूमाईनें जिंकलें. तें सर्व कापट्य होतें. कद्रूमाईनें आपल्या मुलांच्या सहाय्यानें तें कपट रचलें होतें, हें आपल्याला माहित तरी आहे काय ? नसेल तर तें कपट होतें. तुमच्या शत्रूनें केवळ कपटानें तुमचा दावा साधला होता ! मग मी म्हणतें, जर मुळांतच कपट होतें, त्याबद्दल आपण कोणाच्या अटकेंत काय म्हणून राहणार ? ती अटकळून आपल्या शत्रूंना स्वर्गीचें अमृत काय म्हणून नेऊन देणार ? त्यांच्या अपकारांची फेड उपकारानें कशासाठीं म्हणून करणार ?—मी हें आपलें असें काम केलेलें आहे. तर आतां असेंच्या असें परत चलायचें ! माझ्यादेखत आपल्या शत्रूंच्या पदरीं त्यांचें कपट कारस्थान घालायचें आणि स्वतंत्र व्हायचं हें असं झालं म्हणजे मगच मी आपल्या चरणाजवळ मला आश्रय द्या अशी विनंती करीन मला वीरपुंगव आवडतात त्यांची भोक्ती मी आहे म्हणूनच माझें आपल्यावर अनिवार प्रेम जडलें आहे. आपण कार्यमुक्त होईपर्यंत आपल्या प्रेमाचा विरह मी कसाही सहन करीन''

सुरा याप्रमाणें काय काय आणि किती किती तरी बोलत होती. तिच्या बोलण्यानें गरुड थक्क झाला सुरेचें सांगणें बरोबर होतें, खरेदी

होतें. पण त्याचें गरुडाला काय होय ? कद्रू कितीही खोटी असली, तिनें कोणतेंही कपट कारस्थान प्रथम लढविलें असलें तरी त्याकरितां आपण दिलेल्या वचनापासून काय म्हणून ढळावयाचें ? आपण वचनबद्ध आहोंत आणि वचन पुरें करणें हेंच आपलें सर्वश्रेष्ठ कर्तव्य आहे तें आपल्याला केलेंच पाहिजे ! बायका कितीही चतुर असल्या, प्रेमी असल्या, धाडसी असल्या, तरी त्यांची सल्ला काय कामाची ? सुरेबद्दल गरुडाला विलक्षण नवल वाटलें. पण त्याचे विचार बदलले नाहींत ! तो सुरेचें बोलणें मात्र शांतपणानें ऐकत राहिला होता. पण त्याचाच परिणाम सुरेवर असा विचित्र झाला कीं तिला वाटलें, ज्याअर्थी इतकें आस्थेनें गरुडानें आपलें म्हणणें ऐकून घेतलें, त्याअर्थी तें त्याला पटलें. आतां तो आपल्या सांगण्याप्रमाणें ऐकणार. शेवटीं तो आपला स्वीकारही करणार ! या विचारानेंच तिला कृतकृत्य झाल्यासारखें झालें. तिच्या मूळच्या लाल कांतींत अधिक लालीची भर पडली !

आतां सुरा मोठ्या प्रौढीनें अप्सरांत मिसळली. त्यांच्याशीं ओळख करूं लागली. सागरांतलें रत्न—अमृताची बहिण—म्हणून त्या अप्सरांनींही तिला आपली मैत्रीण बनविलें. खेळीमेळीनें वागायचें, एकमेकींच्या उपयोगी पडावयाचें, असेंही त्यांनीं गळ्याच्या शपथा घेऊन त्याच वेळीं ठरवून टाकलें. गरुडाला खायला वगैरे देण्याकरितां म्हणून सुरा आपल्या कांहीं मैत्रिणींच्या कानांत सांगून तेथून निघून जाऊं लागली. जातांना गरुडाला अगदीं लाडीकपणानें " इतक्यांतच येतें अं आपल्याला कांहीं तरी खायलाप्यायला घेऊन; तंवर इथंच बसायचं. जायचं नाहीं कुठं बरं का ? " म्हणत मान मुरडून, भुंवई वर चढवून, गालांत किंचित् हंसलेसें करून मग झट्दिशीं गेली. कांहीं अप्सरा तिच्या नादीं लागून तिच्या मागें गेल्या. पण कांहीं चांगल्या खमंग होत्या त्यांनीं ती दूर जातांच गरुडाला घेरलेंच. एक म्हणाली:—

" ऐकायचं हो, आम्हांला एकाद्याच्या प्रेमांत पडायचं नाहीं. पण दिसलं तें सांगायला कांहीं हरकत नाहीं. आपण तर अमृताकरतां इथं

आलांत, आणखी या तुमच्या आवडत्या बाईचा विचार आपल्याला इथून अमृत न घेतांच घेऊन जायचा दिसतोय. ”

“ हें खरं प्रेम आहे वाटतं ? खरं प्रेम असतं तर ती असं म्हणालीच नसती. ” दुसरी म्हणाली.

“ गडे, आमचं ऐकायचं हो. आपण इथून कध्धीं कध्धीं जायचं नाहीं. आपल्याला अमृत हवं ना ? इथं निरंतर राह्यचं कबूल केलं तर अमृताला कमी काय गेलं आहे ? हवं तितकं अमृत मिळेल. ” तिसरी म्हणाली.

“ आपल्याला काय वाटेल तें वाटो, पण त्या स्त्रीपासून आपल्याला कधींच सुख लागायचं नाहीं. आपण आमच्या सेवेला दोन दिवस सवड द्यावी, म्हणजे त्या बाईच्या आपल्यावरील प्रेमांत, आणखी आमच्या आपल्यावरील प्रेमांतील अंतर आपल्याला खचित चांगलं दिसून येईल. ”

“ मग आपल्याला खात्रीनें वाटेल कीं, निरंतर इथंच रहावं—कुठंच जाऊं नये. ”

“ किती तरी पुण्यश्लोक इथें येतात, आमची सेवाचाकरी घेतात. अमृत सेवन करतात. देहाचं, आयुष्याचं, जीविताचं सार्थक करतात. स्वर्गांत यापेक्षां मोठं सुख कोणतें आहे नाहीं तरी ? देवेंद्र कोणाही पाहु-ण्यांचें आदरातिथ्य करायचं म्हणजे आम्हांलाच दिमतीला देतात. त्या आम्हीं होऊनच आपल्या सेवेला आलों आहोंत. ”

“ तर, वीरपुंगवा, वीरवरा, आमच्या विनंतीला मान द्यायचा ना ? निरंतर इथं राह्यचं मान्य करायचं ना ? देहाचं, जीविताचं सार्थक करा-यचं ना ?—करायचं गडे मान्य ? एवढं मान्य करून आम्हां दासींना सुखी नाहीं का करायचं ? ”

असें म्हणून सुरेच्या अगोदर आपण आणलेली फळें गरुडाला देऊन त्याला तृप्त करायचं म्हणून त्या तिकडे वळल्या.

तेवढाच वेळ गरुडाला मोकळा वाटला. त्या दूर होतांच गरुडाला विचार करायला सुचलें. केवढा हा दांडगा मोह ! या सौंदर्याच्या, या मायेच्या बाजारांतून सुटका होणें ब्रम्हदेवालाही दुरापास्तच होय ! केवढी

# प्रकरण बारावें

ही प्रचंड शक्ति ! या सौन्दर्याच्या बाजारांत हिंडण्याकरितां पुण्यसंचय करावयाचा ? स्वर्ग गांठावयाचा ? एवढीच पृथ्वीवरच्या प्राण्यांची इती-कर्तव्यता आणि धडपड ? इथंच निरंतर वास करावयाचा ? इथंच राहून अमृत सेवन करायचे ? इथंच देहाची, आयुष्याची, जीविताची, पुण्या-ईची, सार्थकता व्हावयाची ? आणि त्या करितां इतर पुण्यात्म्याप्रमाणें मलाही इथेंच रहावें लागावयाचें ? पण मी असाच इथं राहिलों तर—तर—काय ?

आपल्या उपाशी आईच्या पुढचें अन्नाचें ताट कद्रूमाई अधिकारानें भिरकावून देत आहे. आपली तीच गत होत आहे. तसेंच उपाशी पोटीं पानांवरून उठवून पाठीवर प्रतोदाचे तडाखे ओढून आपली चाकरी कद्रू-माई व तिची मुलें आमच्याकडून करून घेत आहे ! आई घळघळघळ अश्रु ढाळते आहे ! आपल्याकडे आशेनें ती पहात आहे !

हें चित्र त्याच वेळीं गरुडाच्या दृष्टीपुढें उभें राहिलें आणि त्याचें आपादमस्तक शरीर थरारलें. त्याच्या शरीरावरील रोमांच ताठ उभे राहिले, मस्तक तप्त झालें !

"काय ? मी येथें निरंतर राहावयाचें ? सौंदर्याच्या, मायेच्या बाजाराला भुलावयाचें आणि मातृसेवेला विसरून जाऊन आईला आणि भावाला पर-दास्याच्या नरकांत पिचत ठेऊन आपण स्वर्गसुखांत रहाण्याची प्रथम इच्छा धरायची ! त्या मोहाला बळी पडावयाचें ? धिग् धिग् जिणें ! गरुडाच्या मना, सावध हो. सौन्दर्याच्या जाळयांत अडकूं नकोस ! मधुर वाणीला मोहूं नकोस ! आपण येथें त्याकरितां आलों नाहीं ! आपल्याला निरंतरचें तें सौख्य नको ! देहाचें, जीविताचें सार्थकही नको ! मना, तूं मातृसेवेच्या व्रताचं कंकण बांधलं आहेस, तूं या मोहक मायेच्या बाजारांत गुंतूं नकोस. कितीही नाजूक बिसतंतूहूनही मृदू, सागराहूनही पसार व्हावयाला दुर्लंघ्य हा मायावी मोह असो, मातृसेवेच्या सिद्धीकरितां तुला मृदूबंधनें तोडलींच पाहिजेत, सागर उल्लंघिला पाहिजे आणि एकदम अमृताच्या घराला जिथें असेल तिथें जाऊन हात घातलाच पाहिजे !"

# मातृसेवा

गरुडाच्या मनांत आलें. त्याची सर्व शक्ति एकवटून, त्यानें त्या जबरदस्त मायेच्या मोहांतून एकदम भरारी मारली. काय झालें हें त्यानें मागें वळून मुळींच पाहिलें नाहीं !

सर्व अप्सरा मात्र वेड्यासारख्या गरुडाकडे पहातच राहिल्या !

गरुड भरारी मारीत निघाला आणि सुरा धांवत धांवत तेथें आली. ती त्याला एकसारख्या हांका मारीत सुटली !

प्रेमानें हांका मारल्या. आनंदानें परत बोलाविलें. करुण रवानें ती त्याला हांका मारूं लागली. तिच्या कोणत्याही उपायाचा गरुडावर परिणाम झाला नाहीं. त्यानें मागें वळूनही पाहिलें नाहीं. सुरेची पुरी निराशा झाली ! ती संतापली. गरुडाला शिव्याशाप देऊं लागली. "आतां आपण परत कशा जाणार ? गेलों तर कर्कोटक विचारील कां तरी ? त्याला आपण न विचारतां–फसवून आलों, आपण गरुडाकरितां निघालों हें कर्कोटकादिकांना कळल्यावर ते मला सावलीला तरी उभें राहूं देतील का ? हो ! देतील ! माझा पुन्हां त्यांच्यावर प्रभाव चालवीन. त्यांना शंका आली तर मी त्यांना सांगेन गरुडाच्या मार्गांत विघ्न आणायला मी तुमच्याचकरितां त्याच्या पाठोपाठ गेलें होतें. यावर त्यांचा विश्वास बसेल. पण दुर्भागी सुरे, त्यावर त्यांचा नाहींच विश्वास बसला तर ? तर काय, त्यांच्या छातीवर थयथया नाचेन. त्यांचा सूड घेईन. त्यांचा सत्यनाश करीन. माझी विटंबना त्यांनीं मांडली तर मी त्यांची विटंबना केल्याखेरीज कशी राहीन ? गरुड गेला, माझा अव्हेर केला, जाऊं दे. विश्वाच्या पाठीवर हाच कांहीं एक वीरपुंगव नाहीं ! दुसरे हजार वीरश्रेष्ठ शोधून त्यांची संगत करीन. त्यांना माझ्या संगतींत घेईनें. माझ्या जिवाची—जन्माची हौस पुरवीन !"

सुरा याप्रमाणें नानाप्रकारानें बडबडत सुटली होती. अप्सरांना तिच्या बडबडण्याचें, रागाचें, रडण्याचें मात्र खरेंखुरें हंसू येत होतें.

अप्सरांची फजिती तिच्याप्रमाणेंच झाली होती. तरी त्या उठून दुसऱ्या विलासाला लागल्या. सुरेची बाष्कळ बडबड चाललेलीच होती.



# प्रकरण तेरावें

—अमृत मागून मिळत नसतें, तें जबरदस्तीनेंच मिळविलें पाहिजे, असा उपदेश
त्या ठिकाणीं गरुडाच्या कानीं कोणी तरी करीत होतें !—

—एकाद्याचें नशीबच असें असतें कीं, दुःखें दुसऱ्याक्षणीं संपावयाची असलीं,
तरी तीं पहिल्या क्षणाच्या अखेरपर्यंत छळीत असतात ! सुखांच्या
चिन्हांचा मागमूस लागूं देत नाहींत !—

"**मी** अमृताकरितां आलों आहे ! जितक्या त्वरित मी अमृत पृथ्वी-तलावर घेऊन जाईन तितक्या त्वरित माझ्या मातेची पारतंत्र्यां-तून मुक्तता व्हावयाची आहे !" देवेंद्राच्या सभेंत निर्भयपणें शिरून, कांहीं थोड्या कुशल प्रश्नानंतर आगमनाचा हेतु विचारला जातांच गरुडानें क्षणमात्र विलंब न करतां उत्तरादाखल सांगितलें. अमृताची अनपेक्षित मागणी पृथ्वीवरच्या प्राण्यानें केल्यामुळें सभेंतील यच्चावत् देवादिकांत एक प्रकारची विलक्षण खळबळ उडाली ! खुद्द देवेंद्र आश्चर्यचकित झाला ! त्याची भृकुटि वक्र झाली, सिंहासनाधिष्ठित देवेंद्राचें शरीर आपादमस्तक कंपा-यमान झालें ! मस्तकावरचा रत्नजडित मुकुट किंचित् हलल्यासारखा झाला, तर पायांखालची गादी पायानें बरीचशी दबली गेली ! गरुडाकडे तीक्ष्ण नेत्र रोखले गेले ! जणुं काय नुसत्या नेत्रांच्या विस्फारण्यानेंच देवेंद्र गरुडाला 'अमृत मागण्याचा अक्षम्य अपराध तुझ्या हातून झाला कसा ?' असें विचारीत होता !

अमृताची मागणी आणि तीही पृथ्वीवरच्या प्राण्याकडून ? त्यांत खुद्द देवेंद्राकडेच ! देवांना—देवेंद्रांना त्या मागणीचा जबरदस्त धक्का बसला !

सभास्थानांतील आपापल्या ठिकाणीं स्थानापन्न झालेले देव देवेंद्राकडे आणि गरुडाकडे आळीपाळीनें टकमक पहातच राहिले होते ! त्या पहाण्याच्या गडबडीनें म्हणा किंवा कशानेंही म्हणा, देवेंद्र गरुडाप्रमाणें आणि गरुड देवेंद्राप्रमाणें असल्यासारखा त्यांना भास झाला ! त्यांचा आपल्या डोळ्या-वर विश्वासच बसेना !

## मातृसेवा

देवेंद्राची भेदक दृष्टी गरुडाला तिळमात्रही विचलित करूं धजली नाहीं! आपल्यासमोर उभा राहून 'अमृता'ची निःशंक मागणी करणारा हा धाडसी कोण? अमृताची मागणी करणें आणि इंद्रपद खालीं करून मागणें यांत देवेंद्राला भेद वाटत नसल्यामुळें, ज्यानें एक क्षणीं अमृताची मागणी केली, तो दुसऱ्या क्षणीं आपलें सिंहासन कां मागणार नाहीं? असाही भयंकर विचार क्षणार्धात देवेंद्राच्या मस्तकांत येऊन गेल्याखेरीज राहिला नाहीं!

शचिही चकित झाली! ती एकसारखी देवेंद्राच्या मुखाकडे पहात राहिली. देवेंद्राचें अस्थिर मन स्थिर केव्हां होतें आणि आपला जीव शांत होतो, असें शचिला होऊन गेलें होतें?

गरुडाची दृष्टि देवेंद्राच्या दिव्य सभेचें अप्रतिमत्व न्याहाळीत नव्हती! अनंत आकाशींचें सभामंदिर, प्रकाशाचीं दिव्यतम द्वारें, चांदण्यांचा चांदणा, इंद्रधनुष्यासारख्या कमानी, ठायींठायींचे सुवर्ण स्तंभ, रत्नजडित सिंहासन, कुबेराची संपत्ति लुटून उभारलेलें सभामंदिर हीं सर्व गरुडाची दृष्टि भांबावून टाकावयाला असमर्थ होतीं! त्याची दृष्टि अमृत शोधीत होती. त्याच्या हृदयाचे ठोके "अमृतसिद्धी झाली पाहिजे. मातेला स्वातंत्र्य मिळालें पाहिजे!" हींच अक्षरें कानांना ऐकावयाला लावीत होते! सभामंदिराच्या बाह्य भपक्याला, विशाल वैभवाला, गरुडाची दृष्टी कस्पटाप्रमाणें मानून कांहींतरी निराळें—त्यानें ज्याचा उच्चार आपल्यासमोर बिनदिक्कत केला तें शोधीत आहे, हें देवेंद्राच्या ध्यानांत आल्याशिवाय कसें राहणार? त्याचें मन स्थिर होण्याऐवजीं अधिकच अस्थिर झालें! शचीचा धीर सुटत चालला! देवेंद्राच्या जोरावर धुंद झालेला देवगण देवेंद्राची त्रेधातिरपीट उडालेली पाहून जागच्या जागींच खिळल्यास आश्चर्य काय?

आपल्या प्रश्नाला उत्तर नाहीं आणि तें यावयाचेंहीं नाहीं हें गरुडाच्या ध्यानांत यावयाला उशीर लागला नाहीं. अमृत त्याच्या दृष्टिपथांत येईना! अमृत असें बाहेर थोडेंच असणार? आपल्याला तें

## प्रकरण तेरावें

सहजासहजीं, स्वस्थ बसून, मागून, मिनतवारीनें, सामोपचारानें वगैरे मिळणें कठीण आहे, कारण तसें मिळावयाचें असतें तर तें इतक्या दुर्गम ठिकाणीं ठेवण्यांत कां आलें असतें ? तें देणें देवेंद्राला सुलभ असतें, तर त्याची मागणी करतांच देवेंद्र मूकवाचा कां बनला असता ? सर्व सभा अशी अस्वस्थ कां झाली असती ?

'अमृत मागून मिळावयाचें नाहीं. तें जबरदस्तीनें घेतलें पाहिजे' असा उपदेश गरुडाच्या कानीं त्या ठिकाणीं कोणी तरी करीत होतें. 'येथें नाहीं तर अमृत दुसरे ठिकाणीं कोठें असेल ?' हें गरुड पहात होता. त्याला या सभास्थानापलीकडे एवढेंच किंबहुना याहूनही विशाल दुसरें सभास्थान आहे असें दिसलें. येथें नसेल तर त्या स्थानीं अमृत खाचित असलें पाहिजे आणि तेथें जाऊन तें मिळविलें पाहिजे. याप्रमाणें गरुडाचें विचारचक्र चालून इष्ट स्थळीं आलें. आपल्या मनाला आणि पायांना, देवेंद्राच्या दुसऱ्या स्थानीं जाण्याची आज्ञा करण्यापूर्वी गरुडानें देवेंद्राला, त्यानें आपल्या मागणीला उत्तर न दिल्यामुळें पहिलेच शब्द ऐकविले.

"स्वर्गाधिश, मी अमृताकरितां आलों आहें. अमृताच्या प्राप्ती-मुळेंच माझ्या मातेला स्वातंत्र्याची प्राप्ती व्हावयाची आहे. आपणांकडून अमृत संतोषानें, आनंदानें मिळावें, अशी माझी इच्छा आहे ! मातृ-सेवेचा आनंद देवांना होतो, असा आपला लौकिक आहे. तो लौकिक सत्य आहे, असें मला दिसेल असा मला भरंवसा आहे !"

गरुडाची गंभीर वाणी प्रत्येक अक्षर एक प्रकारच्या अंतःशक्तीच्या पाठिंब्याच्या जोरावर निर्धास्तपणें उच्चारीत होती.

देवांनाच काय पण देवेंद्रालाही वाटलें कीं प्रश्नाचें उत्तर दिल्याखेरीज गत्यंतर नाहीं. पण उत्तर काय द्यावयाचें ? होय म्हणावयाचें ? मग देवांचें देवत्व कुठें उरलें ? अमृताची मागणी घालणारी व्यक्ति सकृद्दर्शनीं सर्व-सामान्य वाटली, पण नंतर ती असामान्य भासूं लागली. आतां तर ती तुल्यबल आहे असा धाक वाटूं लागला.

परंतु देवेंद्र अंतःकरणांत उठलेल्या अस्वस्थतेच्या खळबळाटाला सहजा-सहजीं व्यक्त स्वरूप तात्काळ थोडेंच देणार? मुखमंडळावर भासमान् होणारी सरोषता प्रयत्नानें दूर करून देवेंद्रानें किंचित् हास्यमुख केलें, आणि गरुडाच्या प्रश्नाला उत्तर द्यावयाला तो सरसावला.

" पुण्यश्रेष्ठ! आपण आमच्या सभेंत आलांत! आम्हांला फार फार आनंद झाला. देवेंद्र आपलें स्वागत अंतःकरणपूर्वक करीत आहे! आपल्या आगमनानें देवसभेला अधिकच तेज चढलें आहे. आपण आपल्या सहवासाचा लाभ जितके अधिक दिवस द्याल, तितके दिवस देव-सभेला आनंदाच्या शिखरीं असल्यासारखें होईल! आपण येथें असेपर्यंत देवसभा आपल्या सन्मानांत केव्हांही आणि कसलीही कसूर करणार नाहीं! परंतु—"

" परंतु मला आपल्याकडून मिळणाऱ्या सन्मानापेक्षांही अमृताची अवश्यकता अधिक आहे. तें मला मिळालें म्हणजे आपल्याकडून मोठ्यांत मोठा सन्मान मला मिळाला असें मी समजेन." गरुड देवेंद्राचें अर्धेंच भाषण थांबवून म्हणाला, " स्वर्गाधिपती, अमृतावांचून मला आपल्या-कडून दुसऱ्या कशाचीही अपेक्षा नाहीं—"

" परंतु!" देवेंद्र कसें बोलावें काय बोलावें याचा विचार करीत, तुटक बोलूं लागला, " अमृत आपण मागितलेंत, त्यासाठीं येथें आलां आहांत, हें ठीक आहे. परंतु त्यासंबंधानें आपल्याला निराश करण्याचें बिकट काम माझ्याकडे आलें आहे, याबद्दल मला अत्यंत वाईट वाटतें! अमृत हें फक्त देवांकरितांच आहे. त्याशिवाय तें इतरांना केव्हांही दुर्मि-ळच असावयाचें असा नियमच झालेला असल्यामुळें—"

" परंतु तें मला पाहिजे आहे. अमृत आपला शत्रू या नात्यानें मी मागत नाहीं. मला त्याची जरूरी आहे. माझ्या मातेचें स्वातंत्र्य त्यावर अवलंबून आहे. अगोदर किंवा नंतर देवाशीं विरोध करण्याची, शत्रुत्व संपादण्याची माझी इच्छा नव्हती आणि नाहीं. असें असतां अमृत मला कां मिळूं नये हें समजत नाहीं. देव म्हणविणारांत–प्रत्यक्ष स्वर्गांत–इतकी

विषमता राजरोस वावरत असेल असें मला वाटलें नव्हतें. मी असूर नाहीं. देवांचा वैरी नाहीं. वैरी होण्याची माझी इच्छा नाहीं असें असतां—"

" परंतु स्वर्गाचा तसा नियम आहे, त्याला काय करावयाचं ? हें आम्हीं आपल्याला सामोपचारानं सांगत आहोंत—"

देवेंद्राचा नकार दिसतांच, सामोपचाराच्या नांवाखालीं गोड बोलून तोंडाला पानें पुसण्याची क्लृप्ति देवेंद्र करीत आहे, हें दिसतांच तेथें थांबण्यांतही अर्थ नाहीं, देवेंद्राचें स्वागत स्वीकारण्यांतही मतलब नाहीं, असें ठरवून अमृताच्या शोधाकरतां दुसऱ्या सभामंदिरांत धाडसानें घुसावयाचेंच हा संकल्प ठरवून त्याप्रमाणें तात्काळ गरुडानें कृतीलाही आरंभ केला ! गरुडाला एकेक क्षण युगासारखा भासत होता. आपण अमृत मिळवितों केव्हां आणि माता पारतंत्र्यांतून बाहेर येते केव्हां असें त्याला होऊन गेलें होतें. अशा स्थितींत तो देवेंद्राचा सामोपचार ऐकणार थोडाच !

गरुडानें देवेंद्राच्या सामोपचाराला सरळ धुडकावलें. त्याच्याकडे दुर्लक्ष करून त्या दुसऱ्या सभागृहांत तो तसाच शिरला ! सामोपचार निष्फळ झाला. आपली फजीती झाली. आपल्याकडे दुर्लक्ष करून गरुड हट्टानें दुसऱ्या सभास्थानीं प्रविष्ट झाला, या प्रकारानें देवेंद्र गडबडल्याखेरीज राहिला नाहीं. सामोपचारानें हें प्रस्थ आवरलें नाहीं, अप्सरांच्या भुलावणीला भुललें नाहीं, त्याची गय करून चालणार नाहीं. त्याला वेळच्या वेळीं आणि जागच्या जागीं दबावून डांबून टाकला पाहिजे. नाहीं तर स्वर्गाचें श्रेष्ठत्व राहाणार नाहीं, वर्चस्व नामशेष होणार ही मूर्तिमंत भीति देवेंद्रापुढें उभी राहिली ! आम्हीं सामोपचारानेंच थांबणार नाहीं, तर त्याला दाबून टाकून आमचें खरें स्वरूप जाणवून देऊं या आकांक्षेनें जबरदस्तीनें पुढें घुसणाऱ्या गरुडाच्या पाठोपाठ देवेंद्राला धांव मारावी लागली ! शचीचा जीव उडून गेला; तिनें देवेंद्राला धरून ठेवण्याचा प्रयत्न केला. पण त्यांत तिला मुळींच यश आलें नाहीं !

गरुड दुसऱ्या सभामंडपांत प्राप्त झाला ! पहिलें मंदिर बाह्य वैभवाचें, शिष्टाईचें, असें होतें, तर दुसऱ्या सभामंडपांत सशस्त्र सुरवरांची गर्दी

दृष्टीला पडली ! अमृताचें रक्षण करण्याकरितांच ती करडी व्यवस्था असल्याचें दिसलें. परस्थ पाहातांच सशस्त्र सुरवर चवताळून गरुडाच्या अंगावर धांवून आले. शस्त्रांचीं टोकें त्याच्यावर रोंखली गेलीं. पण काय झालें होतें कोण जाणें, तीं शस्त्रास्त्रांचीं टोकें कोणाही एकाला गरुडाच्या शरीराला टेंकविण्याचें मनांतून धाष्टर्यच होत नव्हतें !

गरुडालाही त्या शस्त्रास्त्रांच्या टोकांनीं भिवविलें नाहीं ! त्याला आपण देवांच्या सभेंत एकटे आहोंत, हे मनांत आणतील तर निमिषमात्रांत आपले राईराईएवढे तुकडे करून टाकतील, असें वाटावयाचें पण तेंही गरुडाला वाटत नव्हतें ! जसें कांहीं आपल्याच हजारों सशस्त्र संरक्षकांच्या गराड्यांत आपण आहोंत, असेंच गरुडाला तेथून चालतांना वाटत होतें. त्याच्या सभोंवार कुणी तरी वावरत असून, ते गरुडाचें प्राणावर उदार होऊन रक्षण करीत आहेत, हें सशस्त्र सुरवरांनाही उगीचच्या उगीच भासत होतें. केवळ त्याच कारणानें त्यांच्या तीक्ष्ण शस्त्रांचीं टोकें गरुडाच्या शरीराला स्पर्शच करीत नव्हती ! हा चमत्कार पाहून देवेंद्र जितका चिडला, संतापला, तितकाच किंबहुना त्यापेक्षां अधिक आश्चर्यचकित झाला! सर्वांप्रमाणें देवेंद्रही कुठलीही कृती न करतां गरुडाकडे पहातच राहिला.

गरुडासभोंवती कोणाचें रक्षण होतें ?

गोरगरीब, ऋषिमुनी, अनाथअपंग, यांचें पुण्य आशिर्वाद, मातेविषयींची निस्सीम भक्ति व सेवेची उत्कंठा, हींच काय ती गरुडाची सहाय्यक मंडळी. अन्य कोणीही नव्हतें. त्याचमुळें गरुडाचा आत्मविश्वास दांडगा होता, तर त्याचमुळें देवेंद्र गडबडून गेला होता ?

आपल्या सामोपचाराला—फसवणुकीला न जुमानतां गरुड पुढें सरकला, हें देवेंद्राला सहन कसें होणार ? ज्या गुणांचे स्तोम देवादिक गाजवितात, त्या गुणांचा आपल्यामध्यें भरपूर वास आहे, आणि ते गुण ज्यांच्यांत असतील ते आपल्यासारखेच मानावयाला तयार आहोंत, असा जे डांगोरा पिटावितात, त्याचा पोकळपणा गरुडानें सामोपचाराच्या सभेंत बोलून दाखविल्यामुळें देवेंद्र चांगलाच खवळला होता. अमृताचें रक्षण गरुडा-

पासून केलेंच पाहिजे, त्याच्या हातीं तें मुळींच लागूं द्यावयाचें नाहीं अशा निश्चयानें क्रुद्ध होऊन जिकडे गरुड फिरेल त्याच्या पाठोपाठ देवेंद्र फिरत होता.

अमृत रक्षणाकरितां केवढी तयारी ठेवली आहे ? किती बंदोबस्त राखला आहे ! केवढें फिरतें चक्र पुढें ठेवलें आहे ! सामोपचारांचा प्रचंड खटाटोप ! तर त्याहीपेक्षां तीक्ष्ण शस्त्रास्त्रांचा पहारा !

गरुडाची दृष्टी त्या ठिकाणीं अमृताचा शोध करीत असतां, अमृताऐवजीं आपल्यावर रोंखलेली तीक्ष्ण शस्त्रांचीं टोकें त्याला दिसलीं त्यावेळीं क्षणमात्रच गरुडाचें मन 'पाय पाठीमागें फिरवावें, प्राणाला मुकूं नये, देवांची अवज्ञा करूं नये,भलत्या भरीस पडूं नये, देवांच्या देवेंद्राच्या कोपाला कारणीभूत होऊं नये,' असें सांगणार न सांगणार तोंच 'विनतामाता आपल्याला करुण वाणीनें हांका मारीत आहे. कद्रूमाईचा छळ आतां आपल्याला सोसवत नाहीं. आतां प्राण कंठाशीं आले आहेत. अमृता-शिवाय तूं परत आलास, शस्त्रास्त्रांना भ्यालास, सामोपचारानें लटपट-लास, खोट्या पण गोड भाषणाला भाळलास, तर तुझी दुबळी आई जीवंत रहात नाहीं!' असे विनतेचे शब्द त्याला ऐकूं येऊं लागले. उपाशी पोटीं आपली आई पाणी आणीत असतां मूर्च्छा येऊन खालीं बसली, सत्ताधारी सर्प तिला त्या स्थितींत त्रास देत आहेत, निर्दयतेनें उठवीत आहेत, हें भयं-कर चित्र गरुडाच्या दृष्टीसमोर आलें ! देवेंद्राच्या शस्त्रास्त्रांचीं टोकें दिसे-नाशीं झालीं. परत फिरण्याचा दुष्ट विचार कोठच्या कोठें वितळून गेला; त्यानें अमृताकरितां दृष्टी फिरविली, दुसऱ्या सभागृहांतही अमृताचें अस्तित्व आढळलें नाहीं. त्याची दृष्टी दवेंद्राकडे गेली. त्याची क्रुद्धता त्याला दिसली. गरुडाची दृष्टी येथेंही भेदरली नाहीं, खालीं नमली नाहीं या कारणानें देवेंद्राचें मस्तक ठिकाणींच राहिलें नव्हतें ! गरुडानें पुन्हां विचारलें:–

"स्वर्गसम्राट् ! अमृत याहि ठिकाणीं नाहीं काय ? आपण अजूनही देऊं इच्छित नाहीं काय ? अमृत देऊन एका पुण्यश्लोक देवतेची पारतं-त्र्यांतून मुक्तता करण्याचें श्रेय आपण मिळवीत नाहीं काय ? मी आपल्या

-सामोपचाराला भाळलों नाहीं, शस्त्रास्त्रांनींही दबलों नाहीं—दबणार नाहीं ! मला माझ्या प्राणांची पर्वा नाहीं ! माझ्या संकल्पाला अडविण्याची शक्ति या शस्त्रास्त्रांच्या दबकावर्णीत मुळींच नाहीं ! तेव्हां या भलत्या भरीस पडण्याचें कारणच नाहीं ! तेव्हां अजूनही अमृत स्वाधीन करावें आणि स्नेह जोडावा, अशी सम्राटाला माझी विनंतीच आहे !”

परंतु हें ऐकण्याच्या स्थितींत देवेंद्राचें मन होतें कोठें ? अमृत मागेल तो स्नेही राहणार कुठून ? तो देवेंद्राचा शत्रुच ! गरुडाइतका बेपर्वा देवेंद्राशीं अजून कोणी वागला नव्हता ! देवेंद्राला प्रत्युत्तर अजून कोणी केलें नव्हतें ! देवेंद्राच्या दृष्टीला दृष्टि अजूनही कोणी भिडविली नव्हती ! तें सगळ्या प्रकारचें धाष्टर्य गरुडानें केलें होतें ! गरुडाचें बोलणें देवेंद्राला ऐकावयालाही गेलें नाहीं, मग तो उत्तर काय देणार !

शस्त्रास्त्राच्या टोकांच्या कैंचींत गरुडाला धरलें तरी तो निर्भय, कार्योत्सुक, अमृतासाठीं उत्कंठीत असें पाहून देवेंद्राचा संताप अनिवार झाला खरा परंतु अंतःकरणांत भीतीनेंही ठाणें दिलें. आपल्याबरोबर असलेल्या देवगुरु बृहस्पतीकडे त्या अर्थानें त्यानें सहेतुक पाहिलें.

“हा काय प्रकार आहे ? अमृत मागणारा, त्याकरितां देवेंद्राची सत्ता, शक्ति, तेज पायाखालीं तुडवूं पाहाणारा-हा कोण आहे ? हा इतका उद्धट कसा? निर्भय कसा!” या प्रकारचे प्रश्न देवगुरूंना देवेंद्रानें तशाही स्थितींत विचारिले. जे भाव देवेंद्राच्या ठिकाणीं प्राप्त प्रसंगानें उत्पन्न झाले होते, त्यापैकीं सुरगुरूजवळ फारसे दिसले नाहींत. सुरगुरूंना गरुडाची संपूर्ण माहिती होती. देवेंद्राच्या प्रश्नाला त्यांनीं स्पष्ट असें जरी त्यावेळीं कांहीं उत्तर दिलें नाहीं आणि ती वेळही स्वस्थपणें, स्पष्टपणें उत्तर देण्याची नव्हती—तरी पण त्यांचा देवेंद्राकडे पाहाण्याचा भावही असा होता. “देवेंद्र, दिसावयाला क्षुद्र पण तपश्चर्येनें श्रेष्ठ अशा तपस्व्यांचा, गोरगरिबांचा, निरुपद्रव्यांचा तुझ्याकडून उपमर्द झाला आहे, त्याच तपस्व्यांचे, गोरगरिबांचे, निरुपद्रव्यांचे यानें आशीर्वाद मिळवून, आजची निर्भयता, आजचें तेज मिळविलें आहे—तो मनांत आणील तर तुला तो आटोपणार

नाहीं. देवपणांत–देवेंद्रपणांतही तुमच्याकडून उन्मत्तपणानें दुष्कृत्यें होऊन गेल्यानें, तीं क्षतें तुम्हांला केव्हां ना केव्हां तरी अशा प्रकारें जाचक झाल्यावांचून कशी राहातील? त्याचा फायदा इतर घेतल्याखेरीज कसे राहातील? हा गरुड आतां तुला ऐकणार नाहीं, आटोपणार नाहीं. ज्यानें तुझ्या सामोपचाराला मानलें नाहीं, जो तुझ्या दबकावणीला दबत नाहीं, तो तुझ्या हातांतून अमृत हिसकवून घेऊन आपला कार्यभाग उरकणार हें निश्चित आहे."

गरुडाला पलिकडे आणखी एक जबरदस्त सभास्थान दिसलें. त्याची रचना, ठेवण अजस्त्र अशा प्रकारची दिसली. बाह्य देखाव्यावरून अमृत त्या ठिकाणीं असलें पाहिजे असें गरुडाला निश्चयानें वाटलें. तो आतां अमृतावांचून कांहीं जाणत नव्हता, पहात नव्हता किंवा ऐकतही नव्हता. प्रत्येक पुढें पडणाऱ्या पावलाबरोबर त्याचें तेज फांकत चाललें होतें. पराक्रम त्याच्या अंगांत संचार करीत होता. कृतांत काळालाही अमृतप्राप्तिसाठीं कवटाळावयाची त्याची तयारी झाली होती.

गरुडाच्या त्या वेळच्या तेजापुढें देव–देवेंद्र–देवसभा हीं निस्तेजशी भासूं लागली. 'अमृत बळकावणार' ही बृहस्पतींची पुण्यवाणी गरुडाला आशीर्वादासारखीच झाली. हें वाक्य ज्या क्षणीं उच्चारलें गेलें, त्या क्षणीं अमृतासभोंवतालीं भिरभिर फिरणाऱ्या चक्राच्या दात्यांतून गरुड बेधडक अमृताच्या अगदीं जवळ जाऊन उभा राहिला होता.

समोर अमृताचें घट दिसले. गरुडाचा आनंद विश्वांत मावेना. हाताशीं आलेल्या घटाला हात घालतांना, देव त्याच्यावर झांप घालील, क्रुद्ध देव आपल्यावर झडप घालून, तुटून पडून, आपल्या हातून ते हिसकावून घेतील किंवा घटाला हात लावतांच आपला येथच्या येथें कपाळमोक्ष होईल, अशी गरुडाला मुळींच भीति वाटली नाहीं. अशा तऱ्हेचे विचार मनांत यावयाला अवकाशच नव्हता.

सर्व शक्ति एकवटून, सर्व तऱ्हेची पुण्याई एकत्र करून, सर्व श्रेष्ठ भगवंताच्या नामाचा प्रचंड गजर करून, मातृदेवतेच्या नांवाची दणदणून

टाकणाऱ्या जयजयकाराची घोषणा करून गरुडानें धांवत जाऊन अमृताच्या घटाला हात घातला. देवांच्या शस्त्रास्त्रांचा खणखणाट होऊं लागला. देवेंद्र संतापातीरेकानें बेभान होऊन, निकरानें हातांतील वज्र गरगर फिरवीत आपल्यावर भिरकाविण्याकरितां धांवत येत आहे, हें गरुडाच्या दृष्टीला दिसत होतें. हें असें व्हावयाचेंच. आपल्याला हेही आघात सोसावे लागणार, ते सोसलेच पाहिजेत; अमृत मिळवावयाचें आहे, अनिच्छेनें मिळवावयाचें आहे, कृतांताच्या कराल जबड्यांत हात घालून तेथून अमृत हस्तगत करावयाचें आहे; असें करतांना, शस्त्रास्त्रांचा खणखणाट व्हावयाचाच, रण माजावयाचेंच, संग्राम व्हावयाचेंच; त्याशिवाय अमृतप्राप्ति स्वातंत्र्यप्राप्ती कुठून होणार ? असा विचार करीत करीत चोंहीकडे पहात पहात गरुडानें अमृताचे घट हस्तगत केलेही. अमृत हातीं आल्याबरोबर गरुडाला केवढें अवसान चढलें. त्या वेळीं देवेंद्राचा त्वेष अनावर झाला. क्रोधाचा अतिरेक झाला आणि त्यानें गरुडावर हातांतील वज्र जोरानें भिरकावलें. कार्यसिद्धी झाल्यावर, अमृत हातीं आल्यावर गरुडाला वज्राघात काय करणार ? परंतु ज्या वज्रानें वृत्रासूर ठार झाला, शबर यमसदनीं गेला, नमुची हां हां म्हणून गतप्राण झाला, त्या वज्राचा मान राखण्यासाठीं, देवेंद्राच्या सम्राटपदवीला अभिवादन करण्यासाठीं वज्राच्या धक्क्यानें वायुलाही मागें टाकणारा आपला वेग त्यानें किंचिन्मात्र मंद केला इतकेंच.

देवेंद्र हतबद्ध झाला. देवादिकांच्या हातीं शस्त्रें असल्यानसल्यासारखीं झालीं. सर्व देव खालीं पाहूं लागले.

गरुड अमृत घेऊन मातेच्या मुक्ततेकरितां स्वर्गाहून पृथ्वीकडे मनोवेगानें मार्ग काढूं लागला.

देवदेवेंद्रांच्या हातांतून अमृत गेलें—पण पुढें काय करावयाचें ? सामसंपला, दाम दडपून मेला, दंडालाही गरुडानें धाब्यावर बसविलें आणि तो अमृत घेऊन गेला—देवांचें भवितव्य दुसरें काय ?

× × × × ×

## प्रकरण तेरावें

विनतामाता डोळ्यांत जीव ठेऊन गरुडाची प्रतिदिनीं मार्गप्रतिक्षा करीत होती. अरुणाचीही तीच अवस्था! आईचा जीव गरुड अमृत आणीपर्यंत तरी जगो, अशी त्याची परमेश्वराजवळ नित्य प्रार्थना असे. दररोज उठावें, "आपला बाळ कधीं परत येईल" असें विनतामातेनें अरुणाला विचारावें. अरुणाला करमेनासें झालें, कद्रूचा त्रास झाला म्हणजे आईजवळ बसून "कधीं ग गरुडदादा यायचा? आतां तो स्वर्गांतून लवकर परत येईल नाहीं?" असें त्यानें विचारावें. अशी या मायलेकरांची दिनचर्या चालली होती. आशेशिवाय जगण्यासारखें दुसरें कोणतेंही भांडवल त्या मायलेकरांजवळ नव्हतें!

कद्रू व कर्कोटकादि तिचीं मुलें यांनीं आपल्या वागण्यांत, अरेरावींत विनतेला छळण्यांत कोणत्याच प्रकारानें कमी केलें नव्हतें. कद्रूची तर खात्रीच होती कीं गरुड गेला तो कायमचा गेला! स्वर्गांत गेलेला प्राणी परत कशाला येतो? याच खात्रीच्या जोरावर ती विनेतला व तिच्या अरुणाला निर्दयतेनें वागवीत होती! गरुडाजवळ दिलेलीं वचनें ती चटसारीं विसरूनही गेली होती. कर्कोटक आणि इतर मुलें आतां अधिकच उद्दाम होऊन आईचेंही ऐकतनाशीं झाली होती. पदोपदीं ते तिचा उपमर्द करीत! 'आमच्याकरितां तूं आहेस, तुझ्याकरितां कांहीं आमचा जन्म नाहीं,' असें तिला खुशाल सांगत?

सुरा स्वर्गांतून निराश होऊन परत आल्यानंतर त्या मुलांच्या चांगलीच मानगुटीला बसली होती. ती त्यांना हवें तसें वागवीत असे, खेळवीत असे, नाचवीत असे; कद्रूच्या देखत ती त्या मुलांना आपल्या मांगातीं हवें तसें वागावयाला लावी. ना लाज, ना लज्जा; एकमेकांच्या गळ्यांत गळे घालून निःशंकपणानें कद्रुपुढें येत. फिदीफिदी हंसत नाना चार करीत. कद्रूला तें खपत नसे. पण करणार काय? मुलांचे चाळे ती निमूटपणें सहन करी! आपलीं मुलें अशींच करावयाचीं, त्यांनीं असें वागावयाचें नाहीं तर कोणीं, असेंही ती मनांत आणी व आपलें समाधान आपणच करून घेई!

## मातृसेवा

केव्हां तरी मुद्दाम कद्रू विनतेला बोलावून आणी व विचारी कीं, "केव्हां ग माई, तुझा गरुड परत यायचा? तें तुझं रत्न होतं ना? विश्वाच्या मोलाचं तें तुझं रत्न ना? स्वर्ग जिंकणारं रत्न ना तें? मग कुठं आहे त्याचा ठिकाण? अमृत आणलं कां त्यानं? त्याचा निरोप तरी? कधीं येतो आहे? बरं बाई, एकदां आला म्हणजे सुटशील तरी! आम्ही पण अमृत घेऊं! पण गडे माई तूं आतांशा निराश दिसतेस. तुझे प्राण अगदीं डोळ्यांत आलेले दिसताहेत! आतां तुझ्याकडून सेवा घ्यायची देखील पंचाईत वाटते! आतां तुझ्यासाठीं गरुड स्वर्गातून येणार कीं तूंच त्याचा शोध करायला स्वर्गात जाणार! हें तरी एकदां सांग!"

कद्रू कठोर थट्टा करी! विनता कळवळून ऐकून घेई. जवळपास कद्रूचीं मुलें असलीं तर तीं फिदी फिदी हंसत! अरुणाच्या डोळ्याच्या कडा पाण्यानं डबडबून जात अशा वेळीं विनता आपल्या कमनशीबाला बोल लावावयाला लागे. ईश्वरावर संतापावें असें तिला वाटे; "ईश्वरा, माझा अंत कां पहातोस आतां?" असा विचारण्याचा मोह तिला पुष्कळ वेळां अनावर होई!

एकाद्याचें नशीबच असें असतें. दुःखें दुसऱ्या क्षणीं संपावयाचीं असलीं तरी त्या क्षणापर्यंत ती उग्र रूपानें आणि नव्या दमानें छळीत राहतात. पुढल्या क्षणीं तीं संपवावयाचीं असलीं, सौख्याचा काळ यावयाचा असला, तरी त्याचीं शुभ चिन्हें दिसावयाचीं नाहींत! असाच प्रकार नशीब दुसऱ्याही बाबतींत करीत असतें. दुसऱ्या क्षणीं सर्वस्व नाश व्हावयाचा असला, तरी त्याच्या अखेरपर्यंत आसुरी वैभव मनसोक्त भोगावयाला सांपडतच असतें!

विनता आणि कद्रू यांच्या संबंधांत असेंच असलें पाहिजे. दुसऱ्या क्षणीं काय होणार होतें हें दोघींनाही तितकेंच अज्ञात होतें. विनतेला शेवटची घरघर लागावयाची पाळी आली होती, तर निष्कंटक सत्ता आपण अजरामर गाजवीत राहणार, सत्तेच्या वैभवाचें गौरीशंकर टोंक गांठलें आहे, निरंतर तेथेंच आपण राहणार, या शिवाय दुसरा कोणताही विचार कद्रूच्या मनाला शिवत नव्हता!

# प्रकरण तरावें

अशा स्थितींत एक क्षण असा आला कीं त्या क्षणीं कद्रूच्या मनाला वाटलें आपण जन्माला आल्याचें पुरेपूर सार्थक झालें. यापेक्षां आपल्या सुखाची दुसरी परमावधि नाहीं आणि हीच अवस्था निरंतर राहणार. तर विनतेचे प्राण व्याकूळ झाले. तिला दुसरा लोक दिसूं लागला. 'आपला परतंत्र आत्मा पारतंत्र्यांतच इहलोक सोडणार. स्वातंत्र्याच्या वाऱ्याची इहलोकींची गोड झुळूक अनुभण्यापूर्वीच आपल्याला परलोक पहावा लागणार, येथपर्यंत मजल गेली. आतां गरुड येत नाहीं. त्याला अमृत मिळत नाहीं. हें सर्व अपुरेंच राहणार. ही सृष्टि अपुरीच राहणार.' या विचारांनीं विनतेला सळो कीं पळो करून सोडलें. तिनें गरुडाची आठवण केली. भगवंताचें नांव घेतलें—अरुणाला जवळ घेतलें ती अखेरचा निरोप घेणार तोंच—

"गरुड आला! गरुडानें अमृत आणलें!" अशा प्रकारची अमृतापेक्षांही गोड आरोळी विनतेच्या कानीं आली. विनतेची मालवूं पाहणारी जीवज्योति, नुसत्या नवीन वार्तेनें तेजस्वी झाली. तिनें बाहेर डोकावलें? हां हां म्हणतां वार्ता व वार्तेबरोबरच गरुड अमृत घेऊन आपल्या आश्रमांत दाखल झाला? मायलेकरांची दृष्टादृष्ट झाली? त्यांच्या मन:स्थितीचें वर्णन कल्पनेलाही अगम्य आहे?

× × × ×

कद्रूला कळलें. ती धांवत आली? गरुडानें आपल्या सावत्र मातेलाही वंदन केलें. अमृत आणलें हें ऐकतांच विनतामाई मुक्त आहे, असें ती उद्गारली. विनता पारतंत्र्यांतून मुक्त झाली?

× × × ×

अमृत सेवन करावयाचें म्हणून कद्रू एकसारखी मुलांना हांका मारीत सुटली. पण तिचीं मुलें जागेवर कुठें होतीं? सावध कुठें होतीं? सुरेच्या सहवासांत कर्कोटकसुद्धां सर्व सर्प बेहोष होते? कद्रूचा थयथयाट झाला? तिनें मुलांना सावध करण्याची शिकस्त केली त्यांच्या नशीबीं अमृताचें

सेवन नव्हतेंच त्याला ती काय करणार ? तिनें 'हाय ! हाय !' म्हणत नशीबाला हात लावला ?

× × × ×

हीच संधि साधून, भगवान् श्री विष्णूच्या युक्तीनें देव गरुडाच्या पाठो-पाठ आलेच होते, त्यांनीं अमृत परत पळविलें. विनतामाता सावध झाल्यावर गरुडाला त्यांना अडविण्याचें तरी काय कारण होतें ? श्रीविष्णूची गरुडालाही तशीच आज्ञा होती.

× × × ×

सर्प सावध झाले आणि त्यांना जेव्हां हें सर्व कळलें, तेव्हां गरुडाचेंच हें कपटकारस्थान आहे, असें समजून ते सत्तेच्या जोरावरच चवताळून गेले. पण तेथें त्यांना काय दिसलें ?—

भगवान् श्रीविष्णूंनीं आपल्यासमोर हात जोडून नेत्र मिटून बसलेल्या विनतेच्या मस्तकीं आशीर्वादाचा हात ठेवला आहे. एका बाजूस शेष व दुसऱ्या बाजूस गरुड श्रीविष्णुपुढें हात जोडून उभे आहेत ? भगवान् श्री-विष्णू दोघांकडेही हास्यमुखानें पहात असून त्या हास्यानेंच गरुडाची मातृ-सेवा आपल्याला पसंत पडली ? आनंद झाला ? असेंच ते सुचवीत आहेत. कदाचित् ती भगवंताची मायाही असेल ? पण सर्पांना व कद्रूलाही तसें दिसलें खरें ? मग त्यापुढें त्यांच्या सत्तेचें वीष काय प्रभाव गाजविणार ? कद्रूला पाहण्याची शक्तीच नव्हती ? पातकी दृष्टी अशीच असते ? पण तिनें पाहिलें असतें तर तिला काय दिसलें असतें ? 'आतां तरी दुष्ट स्वभाव टाक–सज्जनांना ओळख–त्यांना छळूं नकोस–त्यांतच तुझें जीवितसार्थक्य आहे' असेंच भगवंतानीं तिला सांगितलें नसतें काय ?



# उपसंहार

सरस्वतीबाईचीं मुलें संध्याकाळीं घरीं परत आलीं. कुणी आपल्या स्नेहा-सोबत्याबरोबर सिनेमा पाहावयाला गेले होते तर कोणी नाटकाला गेलें होतें. त्या दिवशीं योगायोगानें सहज एक मौज झाली होती. महाराष्ट्रांत नवीन अवतीर्ण झालेल्या व एका विख्यात डायरेक्टरनें डायरेक्टर केलेला देशी–पुराण चित्रपट सिनेमांत लागला होता; तर त्याच पुराण कथानकावर एका नाटक मंडळीनें नवीन नाटक बसविलें होतें. दोहोंचें कथानक एकच होतें आणि तें म्हणजे वेदांतलें "सुपर्णाख्यान" किंवा महाभारतांतील "कद्रुविनताख्यान" होय. चित्रपट जितका चांगला होता, तितकेंच नाटकही सुंदर होतें. अर्थात सर्व मुलें मुली घरीं परत आल्यावर स्वाभाविकच पाहिलेल्या विषयासंबंधींच कुजबुजत होतीं. जेवतांना सर्वांच्या बोलण्याचा मुख्य विषय तोच होता. प्रथम थोडा वेळ चित्रपट चांगला होता, नाटक उत्तम होतें, एवढेंच झालें. पण विशेषतः त्या कथानकानेंच सर्वांना फार चटका लावला होता. प्रत्येकाचे डोळे उघडल्यासारखें झालें होतें. गरुडानें आईची निरपेक्ष केलेली सेवा प्रत्येकाला लाजविण्याला कारणीभूत झालेली होती. नाटकाचें आणि चित्रपटाचें वर्णन करीत असतां, आपल्या हातून आपल्या आईच्या सेवेविषयीं आजवर अक्षम्य अशी चूक झाली आहे. आईकडे, तिच्या इच्छेकडे, तिच्या सुखाकडे आपण मुळींच कधीं पाहिलें नाहीं. आपण आपलें सुखच पहात आलों आहोंत ! या जाणीवेनें प्रत्येकाला ओशाळल्याप्रमाणें झालें. प्रत्येक जण वर्णन करूं लागे आणि मध्येंच थांबे ! वाटे कीं आई आपल्याकडे पहात आहे, 'गरुड–अरुणा'प्रमाणें तुम्हीं माझ्यासंबंधानें काय केलें आहे असें विचारीत आहे. आपण दुपारीं ती हांक मारीत असतां तिकडे दुर्लक्ष करून स्वतःच्याच सुखासाठीं बाहेर चालते झालों ही केवढी लाजीरवाणी गोष्ट झाली ! हा विचार प्रत्येकाला त्रास देत होता !

गरुडासारख्या सत्पुत्राचें महात्म्याचें उघड चारित्र्य डोळ्यापुढें असून आपण इतकें नादान झालों आहोंत ! तेव्हां त्या पापाला

## मातृसेवा

विश्वाच्या पाठीवर कोठें तोंड असणार? असाच जळजळीत प्रश्न प्रत्ये-काच्या डोळ्यापुढें उभा राहात होता! ताटांतलें अन्न परब्रह्म त्यांना तोच प्रश्न करीत होतें! घरदार सभोंवारची सृष्टी त्यांना त्याच प्रश्नाच्या भडिमा-रानें थंडावून सोडीत होती!

जेवतांना पंक्तीवर विलक्षण स्तब्धता पसरली! स्वप्न सांगून झाल्यावर सरस्वतीबाईंनीं सहज वर पाहिलें. आपल्या प्रत्येक मुलाच्या डोळ्यांतून अश्रु-धारा चालल्या आहेत. तोंडांतला घांस तोंडांत आणि हातांतला हातांत, अशी त्यांची अवस्था झाली आहे, हें सरस्वतीबाईंना दिसलें. त्याही चक्क झाल्या! त्यांनाही गहींवर आल्यावाचून राहिला नाहीं. मुलांच्या मनाची अवस्था त्यांच्या ध्यानीं आली. त्यांनीं गद्‌गद् कंठानें मुलांना उद्देशून म्हटलें.

"बाळांनो! हें काय?"

"आई! आमचे डोळे आज साफ उघडले! आमच्या हातून तुझ्या संबंधांत झालेल्या चुकांचीं पापें डोळ्यांतून अश्रुरूपानें बाहेर पडत आहेत! जाऊं दे यांना बाहेर! त्यांची बाधा नको! तूं आतां आम्हाला आशिर्वाद दे! तुझ्या सेवेंत किंचितही आमच्या हातून कसूर होणार नाहीं! गरुडा प्रमाणें 'मातेची सेवा' हेंच आमचें जीवीताचें बीद्र हें तुझ्याच पुण्य पायांची शपथ घेऊन अन्नब्रम्हाला साक्ष ठेवून आज ग्वाही देऊन सांगतों!"

मुलांचा उद्गार ऐकून सरस्वतीबाईंना काय वाटलें असेल!

शुभ घडीचा शुभ निश्चय कोणाही सत्पुत्रांना केवढा आत्मविश्वास देईल! आईचे आनंदाश्रु त्या सत्पुत्रांना पावन करून सत्कार्याला प्रवृत्त केल्याशि-वाय कसे राहतील?—तथास्तु!

**यत्कृतं यत्करिष्यामि तत्सर्वं न मया कृतम्।**
**त्वया कृतं तु फलभुक् त्वमेव मधुसूदन॥**



# महाराष्ट्र–कुटुंब–मालेच्या

# व्यापारी

## पुस्तकावरील वऱ्या वर्तमानपत्रांचे व नियतकालिकांचे अभिप्रायः--

**केसरीः**—( पुणें. ) हल्लीं तरुण वर्गाची धांव नोकरी, वकिली व फार तर डॉक्टरी या धंद्यापलीकडे फारशी जात नाहीं. व्यक्तीची व तदनुरोधानें समाजाची व देशाची उन्नति होण्याला तरुणांनीं हे गर्दीचे मार्ग सोडून ज्या मार्गांत प्रत्येकाला आपल्या कर्तबगारीप्रमाणें मुबलक वाव मिळतो अशा व्यापाराच्या मार्गाकडे वळलें पाहिजे. व तशा रीतीनें वळतांना अनेक अडचणी आल्या तरी दृढनिश्चयाच्या जोरावर त्या बाजूला सारून पुढें जाणारा अंतीं कसा विजयी होतो, हें या ‘ व्यापारी ’ पुस्तकांत लेखकानें विनायक नांवाच्या तरुण व कर्तबगार व्यापाऱ्याच्या तोंडून सांगितलें आहे. स्वतः लेखकहि एक व्यापारी पेशाचे असल्यानें त्यांनीं नमूद केलेले विचार अनुभवजन्य असावेत ही गोष्ट साहजिक होय. पुस्तकाची भाषा गोड, चट-कन पटणारी व भावनामय असल्यानें कादंबरी उठावदार झाली आहे. आजपर्यंत महाराष्ट्र कुटुंबमालेनें महाराष्ट्रीय तरुणांच्या विचारसरणीला इष्ट असें वळण लावण्यासाठीं पुस्तकें काढिलीं. त्या धोरणानुसार हेंही पुस्तक मालेला शोभेसें आहे.

**नवाकाळः**—( मुंबई. ) विनायकरावाच्या आत्मचरित्राची ही कथा ठरावीक सांच्याची झाली नाहीं. “ वास्तविक पाहिलें तर विनायकरावाच्या आयुष्यांत तसें विशेष काय असणार ? ते कांहीं शिवाजी, बाजी, तानाजी, रामदास, नाहीं तर वाशिंग्टन, नेपोलियन, अशासारखे लोकोत्तर पुरुष नव्हते. किंवा टिळक, आगरकर, दादाभाई, गोखले, जमशेटजी, चिप-ळूणकर यांच्या मालिकेंतही बसण्यासारखे नव्हते. ते एक साधेसुधे गृहस्थ—माझ्याचप्रमाणें, माझ्याच वर्गांतले–माझ्या बरोबरचेच. पण ते व्यापारांत

पडले, स्वतंत्र जीवित कंठूं लागले, मी नोकरीचें जूं मानेवर घेतलें. त्यांनीं स्वतंत्र जीवन चालविल्यामुळें त्यांना आयुष्यांत कांहीं प्रसंग भोगावे लागले, ते प्रसंग गंमतीदार असणारच!" हे दिनकररावाचे उद्गार प्रस्तुत कादंबरीचें वर्णन यथातथ्यपणें दिग्दर्शित करतात. विनायकरावाच्या चरित्रांतील गंमतीदार वाटणाऱ्या प्रसंगांची सुरुवात १९०६—८ सालच्या धामधुमीच्या काळांत झाल्यामुळें चटकदारपणाच्या दृष्टीनें कादंबरीला चांगला उठाव मिळाला आहे.

**ज्ञानप्रकाशः**—( पुणें. ) पुस्तकाचें कथानक अगदीं सोपें असून त्यांतील प्रसंगही अगदीं सर्वसामान्य व्यवहारांत घडणारे आहेत; तरी भाषाशैली व कथानकाची कुशल मांडणी या योगानें तें वाचनीय व उपदेशक झालें आहे, याबद्दल लेखकाचें कोणीही अभिनंदनच करील.

**महाराष्ट्र**–ही बोधप्रद कादंबरी पुण्याच्या 'श्री गणेश प्रिंटिंग वर्क्स'चे चालक श्री० गणेश काशिनाथ गोखले यांनीं लिहिली आहे. या कादंबरींत स्वतःच्या बुद्धीच्या जोरावर व्यापारांत पुढें आलेल्या विनायक नांवाच्या तरुणाचें स्फूर्तिदायक चरित्र ग्रथित केलेलें आहे. आपलें हें चरित्र विनायक स्वतःच सांगतो. त्यामुळें, ही कादंबरी आत्मचरित्रासारखीच साधी, सरळ व मनोवेधक झाली आहे. विनायकाच्या मनाचा कल लहानपणापासूनच व्यापारधंद्याकडे होता. १९०७–८ सालीं स्वदेशी चळवळीच्या लाटेंत सांपडून त्यानें शाळा सोडली. त्यानंतर अनेक धंदे करीत करीत, त्यानें अखेर छापखान्याचा चालक होऊन, यशाचें शिखर गांठलें. आपलें यश हें आबासाहेब महाराजांच्या स्फूर्तीचें फळ आहे असें विनायक वारंवार म्हणतो. पण, तो केवळ एक श्रद्धेचा प्रकार दिसतो! विनायकाची स्वतःची कर्तबगारी हेंच त्याच्या यशाचें मूळ होय. ही कादंबरी जितकी बोधप्रद तितकीच मनोरंजक असून, प्रत्येक तरुणानें ती अवश्य वाचावी.

**बलवंत रत्नागिरीः**—व्यापारी—[ ले० श्री. ग. का. गोखले, प्र. महाराष्ट्र कुटुंबमाला ३९१ नारायण पेठ, पुणें शहर किं. १ रु. ] महाराष्ट्र कुटुंबमालेचे उत्साही संपादक व नाटककार श्री. नारायणराव कुळकर्णी

यांच्याकडून आलेलें सदर मालेचें १२ वें पुष्प 'व्यापारी' हें पाहून 'कादंबऱ्यांत व्यापार कसा शिरला?' याचें आम्हांला आश्चर्य वाटलें. पण पुस्तक वाचून पाहतां वाङ्मय क्षेत्रांत एका नव्या नवलाईचें रोपटें लावलेलें दिसून आलें व अत्यंत समाधान वाटलें. 'व्यापारी' हें कथानक सिंदबादच्या सफरीप्रमाणें मनोवेधक व कुतूहलोद्दीपक असून नुसत्या करमणुकीपेक्षां व्यापार, व्यवहार व समयसूचकता यांचेंही ज्ञान करून देणारें असल्यामुळें लेखकाच्या कल्पकतेचें कौतुक केल्यावांचून रहा-वत नाहीं. कथेंत आडकथा नको होती; पण तीमुळें थोडेसें समालोचन होत असल्यामुळें मौज वाटते. कमलेच्या खिन्नतेचें गुपित जातां जातां न सांगतां विनायकानें दुर्लक्ष केलेली ती चंद्रभागेची मुलगी तिच्याच तोंडानें बोलती केली असती तर 'मजा' झाली असती व वाढलेल्या मुलीची करुणकथा ऐकायला सांपडली असती. एकंदरींत या पुस्तकानें मालेच्या लौकिकांत चांगलीच भर घातली असें म्हणावयास हरकत नाहीं.

आनंद पुणें:—'महाराष्ट्र कुटुंब-माले'चें हें १२ वें पुष्प आहे. दीर्घोद्योग, आत्मविश्वास आणि निश्चय यांच्या जोरावर अगदीं गरीब-स्थितींतून उन्नत दशेस आलेल्या एका व्यापाऱ्याचें हें आत्मानिवेदन आहे. भाषा सरळ, क्वचित् विनोदी, आणि घरगुती वळणाची आहे. कलेच्या दृष्टीनें रचना तितकी रेखीव व बांधेसूत नाहीं. तथापि आजकालच्या काळांत अशीं उद्योगपर पुस्तकें व्हावयास हवीं आहेत.

संग्राम—( पुणें ) येथील महाराष्ट्र कुटुंबमालेचें १२ वें पुष्प श्री गणेश काशिनाथ गोखले यांनीं गुंफिलें असून ते नितांत सुंदर उतरलें आहे. कादंबरीचा काळ महाराष्ट्रांतील अत्यंत धामधुमीचा आधुनिक असल्यामुळें प्रत्येक प्रसंगांत एक प्रकारची तेजस्विता, धडाडी, क्रांती दृष्टीस पडते. १९०७–८च्या वातावरणांत प्रत्येक महाराष्ट्रीय तरुणाच्या विचाराला एक प्रकारची कलाटणी मिळाली होती. सी. आय. डी. चा ससेमिरा, उत्साही व स्वातंत्र्यप्रिय तरुणांच्या आयुष्याची माती करून त्यांना व त्यांच्या कुटुं-बीयांना कसा जाचत काचत होता वगैरे गोष्टी कादंबरीकारानें इतक्या

कुशलपणें विस्तारल्या आहेत कीं, आपण वीस वर्षांपूर्वीच्या त्या धामधुंमीच्या काळांतच आहोत काय असेच वाटेल. कथानकाचें मुख्य सूत्र व्यापार. विनायकरावांच्या आत्मकथनांत व्यापारप्रेम शब्दाशब्दांतून ओथंबून राहिलें आहे. कित्येक प्रसंग तर इतके हुबेहुब वठले आहेत कीं, आपण प्रत्यक्ष ह्या मंडळीपैकीं एक जण आहोत काय असा भास होतो. कथानकाची 'गप्पा' रूपी पद्धती व तिची मांडणी गोड साधली आहे. त्यांतून साधी व मोहक भाषा व प्रसंगाची निवड ह्यामुळें पुस्तक हातीं घेतल्यावर संपेपर्यंत खालीं ठेववत नाहीं. महाराष्ट्र कुटुंबाचा हा 'व्यापारी' आदर्श निःसंशय सुंदर आहे. ह्या प्रकाशनाबद्दल लेखक व प्रकाशक स्तुतीस पात्र आहेत.

**नवी मौज**—महाराष्ट्रकुटुंब मालेचें हें बारावें पुष्प असून त्याचे लेखक श्री. गणेश काशिनाथ गोखले हे आहेत. रा. गोखले हे कसलेले लेखक म्हणून प्रसिद्ध नसले तरी अनुभविक व्यापारी आहेत आणि म्हणूनच त्यांनीं लिहिलेली ही 'व्यापारी' कादंबरी मनाला व अनुभवाला पटणारी अशी सरस उतरली आहे. रा. गोखले यांनीं आपल्या कादंबरींत व्यापारी माणसाच्या मार्गांतील अडचणी दाखविल्या असून योग्य मार्गानें गेल्यास त्या अडचणी कशा दूर होतात तें साधार दिग्दर्शित केलें आहे. अशा तऱ्हेचीं पुस्तकें समाजजीवनाला अत्यंत उपकारक होत असल्यामुळें व्यापारी कादंबरी प्रसिद्ध करून महाराष्ट्र कुटुंबमालेनें उच्च दर्जाची समाजसेवा केली आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. मालेचा अधिकाधिक उत्कर्ष होवो !

**उद्यम**—( नागपूर ) सात्त्विक करमणुकीबरोबरच समाजाच्या विविध अंगांचीं रमणीय पण बोधप्रद चित्रें कादंबरीच्या रूपानें दाखवून तीन वर्षांच्या अल्पावधींतच प्रसिद्धीस आलेल्या महाराष्ट्र कुटुंब मालेचें हें बारावें पुष्प असून त्याचे लेखक हे छापखान्याच्या उद्योगांत यशस्वी झालेले असे एक तरुण आहेत. सुशिक्षित महाराष्ट्रीयांनीं व्यापारांत पडल्यावांचून त्यांचा व देशाचाही तरणोपाय नाहीं हें तत्त्व अतीशय सुंदर

व मनोवेधक आत्मचरित्राच्या रूपानें या कादंबरींत ग्रथित केलेलें आहे. आज कित्येक वर्षेपर्यंत आम्हीं सांगत असलेले वरील तत्त्व कथात्राज्ञ-याच्या रूपानें सुशिक्षित महाराष्ट्रीयांना पटविण्याची आवश्यकता महाराष्ट्रांतील कथालेखकांना भासूं लागली आहे असें या मालेंतील या व आणखी एक दोन पुस्तकांवरून स्पष्ट दिसत आहे. त्यांच्या प्रयत्नाला तरी यश येवो व महाराष्ट्रांतील बुद्धिमान तरुण वर्गाचें मन कारकुनीच्या ठराविक चाकोरींतून बाहेर पडून व्यापाराच्या व कारखान्याच्या विश्वव्यापी संसारांत रमूं लागो अशी आमची उत्कट इच्छा आहे.

रणगर्जना—( ले. श्री. गणेश काशिनाथ गोखले प्र. श्रीदत्त एजन्सी ३९१ नारायण पेठ पुणें ). ही कादंबरी महाराष्ट्र–कुटुंब–मालेचें १२ वें पुष्प म्हणून प्रसिद्ध झाली आहे. राष्ट्रभक्तांचीं लहानपणीं व्याख्यानें ऐकून नोकरीविषयीं तिटकारा व स्वतंत्र उद्योगधंद्याविषयीं आवड उत्पन्न झालेला एक तरुण अनेक धक्केचपेटे सोशीत, प्रतिकूल परीस्थितीशीं झगडत, शेवटीं एका मोठ्या धंद्याचा मालक कसा झाला याचें सुबोध वर्णन या कादंबरींत करण्यांत आलें आहे. कादंबरींचे नायक विनायकराव यांचे शाळेंत असतांनाच अभ्यासापेक्षां एका शेटजीच्या दुकानांतील विक्री करण्याची कुशलता, शेटजीशीं प्रामाणिकपणा हे लहानपणचे गुण व पुढें मोठेपणीही धैर्यानें संकटाशीं तोंड देणें, कोणताही प्रसंग आला तरी दानत बिघडूं न देणें व नेहमीं व्यापारधंद्यांची वृद्धि करण्यासाठीं दक्षतेनें झटणें हे मोठेपणचे गुण, यांचें कै० रा. ब. अनंत शिवाजी देसाई टोपीवाले या गरीब स्थितींतून कोट्याधीश बनलेल्या प्रसिद्ध व्यापाऱ्याच्या चरित्रांतील गुणांशीं साम्य पाहून यशस्वी व्यापारी होण्यास एकाच प्रकारचे गुण कसे लागतात याची सत्यता पटते. आपल्या मुलानें एखादी पदवी मिळवून "साहेबाच्या हाताखालीं मोठ्या पगाराची नोकरी मिळवावी" अशी इच्छा करणाऱ्या आईबापांनीं, ही कादंबरी स्वतः वाचावी व मुलांकडून वाचवावी म्हणजे नोकरीच्या गुलामगिरीपेक्षां व्यापारांतच द्रव्य व मान यांचा जास्ती लाभ होऊन, स्वतंत्र बाण्यानें कसें राहतां येतें व समाजाच्या

व राष्ट्राच्या उपयोगी नोकरांहून अधिक करों पडतां येतें हें समजून येऊन त्यांच्या ठायीं व्यापाराची आवड उत्पन्न होईल. कुटुंबांत लहानापासून थोरापर्यंत सर्वांनीं वाचण्यासारखें हें पुस्तक आहे. किं० १ रु.

वैनतेयः—महाराष्ट्र कुटुंबमालेचें हें अकरावें पुष्प असून तें छापखान्याचा धंदा यशस्वी रीतीनें चालविणारे श्री. गणेश प्रिंटिंग वर्क्सचे सेक्रेटरी श्री. ग. का. गोखले यांनीं लिहिलें आहे. नोकरी विहिरीसारखी तर व्यापार समुद्राप्रमाणें असतो. विहिरींत कितीही फेऱ्या घातल्या तरी पोहणाराची प्रगति होणार नाहीं. अगर कितीही बुड्या मारल्या तरी मोत्यें हातीं लागणार नाहींत. समुद्राचें तसें नाहीं. त्याच्या पृष्ठभागावर वादळें होतात. त्याप्रमाणें अंतरंगांत लक्ष्मीही असते. आजच्या महाराष्ट्राला व्यापार व उद्योगधंदे यांचा मंत्र जपल्यावांचून आपली उन्नति करून घेणें शक्य नाहीं. सदरहू कादंबरींत अनेक संकटांशीं झुंज खेळून यशस्वी झालेल्या एका तरुणाचा वृत्तांत आला आहे. कला अगर वाङ्मय या दृष्टीनें विशेष वाखाणण्याजोगें कादंबरींत कांहीं नसलें तरी मनोरंजनाबरोबर मार्गदर्शन करण्याची शक्तिही तिच्यांत आहे. मध्यम स्थितींतल्या माणसांना उत्साहवर्धक व सन्मार्गदर्शक असें जें वाङ्मय महाराष्ट्रकुटुंबमालेनें प्रसिद्ध केलें आहे त्यांत या पुस्तकानें नवी भर पडली आहे.

भारतमित्रः—( प्र० महाराष्ट्र कु. माला, ३९१ नारायण पुणें शहर. ) नोकरीकडे धांव घेणाऱ्या आधुनिक तरुणांनीं व्यापारी जगांत प्रवेश केल्यास त्यांना आपला संसार कसा सुखाचा थाटतां येईल याचें उत्कृष्ट विवेचन या कादंबरींत सुबोधभाषेंत केलें आहे. आधुनिक तरुणांस हें पुस्तक बरेंच मार्गदर्शक होईल यांत शंका नाहीं. किं० १ रु.

दुनियाः—पुण्यांत श्रीयुत ना. वि. कुळकर्णी यांच्या संपादकत्वाखालीं निघत असलेल्या महाराष्ट्र कुटुंबमालेंतील हें एक नवीन पुष्प आहे. मालेच्या नेहमींच्या सरावाप्रमाणें एक विशिष्ट विषय या कादंबरींत प्रतिपादन केलेला आहे. कादंबरीच्या नांवांतच एक विषय प्रतिपादन केलेला

आहे. आपल्या दक्षिणी लोकांचें व्यापार व हुन्नर ह्या विषयांकडे लक्ष वेधलें तर ह्या कादंबरीलेखनाचें सार्थक होईल अशी आशा कर्त्यानें दर्शविली आहे !

एका व्यापाऱ्याचें आत्मचरित्र ह्या कादंबरींत गुंफण्यांत आलें आहे. चरित्रनायक विनायक हा एक उच्च म्हणून गणल्या जाणाऱ्या कुटुम्बांत जन्मलेला आहे. त्याची बुद्धि तीव्र–तैल आहे पण अभ्यास करण्याचा त्याला फारच कंटाळा असतो. गुंडगिरी करण्यांत त्याचा हातखंडा ! त्याचा वडील भाऊ तर त्याच्या अगदीं उलट वर्तनाचा होता असें म्हटलें तरी चालेल. आपण आणि आपला अभ्यास ह्याखेरीज त्याला बापड्याला कांहीं सुचत नसे व रुचत नसे. विनायकाचे दोन सहाध्यायी मित्र होते—बाबू कानडे आणि दादा पुरोहित.

त्यांतील कानडे हा तर श्रीमंताचा मुलगा. दादाचा स्वभाव फारच बड-बड्या असे.

कथानकाचा काल १९०६ च्या सुमाराचा घेतलेला आहे. त्यावेळीं स्वदेशीचें व्रत अगदीं जोरांत सुरू होतें. व स्वदेशी आचरणाऱ्यांवर आणि तें आचरण करण्याबद्दल व्याख्यानें झोडणाऱ्यावर सरकारची फारच वक्र-दृष्टी होती. त्याच सुमारास सज्जनगडावर एक मोठा उत्सव करण्यांत आला होता. त्यावेळेस महाराष्ट्रांतील सर्व पुढारी सज्जनगडावर व्याख्यानें देण्या-साठीं किंवा उत्सवांत भाग घेण्यासाठीं गेले होते. विनायकाची सज्जनगडा-वर जाण्याची फारच इच्छा होती पण वडीलांची परवानगी मिळाली नाहीं. कारण ते सरकारी नोकर होते व मुलांच्या पापाचें (?) फळ त्यांना भोगावयास लागण्याचा संभव होता; म्हणूनच त्यांनीं त्याला परवानगी दिली नाहीं. परवानगी ऐन वेळीं न मिळाल्यामुळें विनायकाचें पित्त खव-ळलें व आईनें शिदोरी दिली असतांना ती न घेतां त्यानें तडक घराबाहेर पाऊल टाकलें व योजलेल्या ठिकाणीं उभा राहून आपल्या सोबत्यांची तो वाट पहात राहिला. ते येतांक्षणींच त्यानीं पायीं मार्ग आक्रमिण्यास सुरवात केली. वाटेंत भूक लागली असताना अन्नाची आग पाण्यावरच भागवावी लागली. जेम तेम मंडळी सज्जनगडावर पोहोंचली. तिकडे व्याख्यानाचें

सदावर्त सुरूं होतेच. लो. टिळक, शि. म. परांजपे, कोल्हटकर वगैरेंचीं व्याख्यानें पोटभर ऐकल्यावर व प्रसाद पोटभर ग्रहण केल्यावर ही बाल-मंडळी परत साताऱ्यास आली. विनायकाच्या घरचें बस्तान त्याच्या जाण्या-मुळें अगदींच बिघडून गेलें होतें. इतक्यांत त्याच्या वडिलांची बदली झाली व त्याला स्वावलंबनाचा पहिला धडा गिरवावा लागला. पहिल्यानें पेन्सिल, स्टेशनरी वगैरे साध्या गोष्टीच तो विकीत असे व ह्या कामीं त्याला शाळेजवळच असलेल्या एका व्यापाऱ्याची मदत झाली. त्या व्यापा-ऱ्याच्या दुकानीं विनायक तासन् तास बसलेला असे व त्याच्या दुकानची खडान् खडा माहिती झाली. नंतर त्यानें शाईचा कारखाना काढ-ण्याची महत्त्वाकांक्षा धरली व त्याच्या दोन बालमित्रांचें त्याला ह्या कामीं फार सहाय्य झालें. पण कानडे ह्या बालमित्रानें थोडे फार पैसे पुरविले असल्यामुळें भांडवलशाही गाजविण्यास कमी केलें नाहीं.

ह्याच सुमारास गोवें येथील एका उद्योगमंदिरासाठीं उमेदवार पाहिजेत अशी एक जाहिरात त्याच्या वाचण्यांत आली. आपल्या महत्त्वाकांक्षा पूर्ण करण्यासाठीं म्हणून त्यानें गोंव्यास जाण्यास ठरविलें व निरवानिरव करण्यास सुरुवात केली. आपल्या छोट्या कारखान्यांतून गरजेइतके पैसे उभारून तो गोंव्यास गेला व 'महाराजां'च्या आश्रमांत पोहोंचला. कांहीं वेळानें या आश्रमावर गदा आली व महाराजांना कैद करण्यांत आलें. स्वावलंबनाचे धडे देणाऱ्या व गुलामगिरीच्या विरुद्ध बंड करण्यास शिक-विणाऱ्या संस्थेवर सरकारचा रोष व्हावा ह्यांत कांहीं विशेष नाहीं. विनाय-काची पुण्यास रवानगी करण्यांत आली. विनायकाचा गोंव्यांतील आश्र-मांत दाखल होण्याचा अनिष्ट परिणाम त्याच्या वडीलांच्या नोकरीवर झाला. वडील भावाला सरकारी नोकरी मिळाली होती व त्या नोकरीमुळेंच त्याला विनायकाशीं बोलण्याची चोरी झाली होती !!

गरीब विचारा विनायक नोकरीसाठीं वणवण फिरूं लागला. शेवटीं एका फिरत्या सिनेमावाल्याला जाहिराती वगैरे लिहून देऊन शेवटीं त्याचा तो म्यानेजर झाला. पण तो सिनेमा कोल्हापुरास जातांच चोरीचा माल

ठरून मालकास गिरफदार करण्यांत आलें. झालें. शेवटीं विनायक पुनः बेकार झाला.

इतक्यांतच विनायकाचें लग्न झालें. आईच्या एका मैत्रिणीची मुलगी सांगून आली असतांहि ती त्यानें नाकारली. पण शेवटीं आईच्या इच्छामुळें व मुलीचा बाप श्रीमंत असल्यामुळें तसेंच व्यापारांत पैशाची मदत मिळण्याच्या आशेमुळें त्यानें एका कुरूप मुलीशीं लग्न केलें. लग्नानंतर सर्व खेळ उघडकीस आला व बापाच्या उघड्या श्रीमंतीचा बोजवारा उडाला. मुलीचा कांहींच अपराध नसल्यामुळें व तिला दोष देऊन तिच्यावर रोष करण्यास कांहींच कारण नाहीं अशी खात्री पटल्यामुळें त्या मुलीला विनायकानें व आईबापानें फारच ममतेनें वागवलें. ह्याच सुमारास विनायक आजारी पडला पण विनायकाच्या उद्यमप्रियतेबद्दल फारच कौतुक वाटत असलेल्या त्याच्या मास्तरानें आपल्या ओळखीच्या डॉक्टराकडून योग्य उपचार करवून त्याला दुखण्यांतून उठविलें. त्याची तडफ पाहून डॉक्टरांनीं त्याला एका औषधाचें प्रिस्क्रिपशन् दिलें व त्या बरहुकूम त्यानें औषध बनविण्यास सुरवात केली. जाहिराती वगैरे देऊन त्यानें हा धंदा उर्जितावस्थेस पोहोंचविला. आपल्या धंद्याचें क्षेत्र वाढविण्यासाठीं तो पुण्यास गेला. तों त्याचा बालमित्र त्याला, नाटक मंडळींत मॅनेजर झालेला भेटला. पुढें एका नाटककाराच्या नाटकाचें पुस्तक त्यानें छापलें व तें जोरानें संपलें. कंपनींत त्याचा मानमरातब चांगला राखण्यांत आला. त्याचें दुसरें एक नाटक त्यानें छापलें पण त्याच सुमारास कानडे ह्यानें पुन्हां एकदां भांडवलशाही गाजवली व त्याच्यावर पैशाची डिक्री मिळविली. मास्तरांच्या व नाटककारांच्या मध्यस्तीनें हें प्रकरण मिटविण्यांत आलें. पुढें त्यानें आपला धंदा फारच जोमानें चालविला व तो यशस्वी म्हणून गणला गेला.

विनायक आपलें चरित्र आपला "कव्या" मित्र–दिनकर–यांस व त्यांच्या मुलांस व बायकोस वर्णन करतो आहे अशी ह्या कादंबरीची रचना केली आहे. ह्या रचनेमुळेंच कादंबरींत कांहींतरी मजा आली आहे–नाहींतर एकाद्या ती गॅझेटप्रमाणें नीरस व कंटाळवाणी ठरली असती.

## अभिप्राय

एका व्यापाऱ्याची लहानपणापासून तों प्रौढपणीं व्यापारांत उच्च पायरी मिळेपर्यंतची हकीकत ह्यांत गोंवली आहे. त्यांत त्याला आलेलीं संकटें, कराव्या लागलेल्या उलाढाली वगैरे गोष्टींच्या वर्णनाचेंच प्राचुर्य फार असल्यामुळें कादंबरीचा आत्मा गणलेल्या Human interest ला ह्या कादंबरींत बिलकुल वाव नाहीं. स्वभावपरिपोषाकडे सुद्धां फारसें लक्ष देण्यांत आलेलें नाहीं. विनायकाच्या ठायीं व्यापारी बुद्धि उपजतच प्राप्त होती व परिस्थितीमुळें तिला जास्त जोराची चालना मिळाली एवढेंच काय तें ही कादंबरी वाचून कळतें. परिस्थितीमुळेंच व्यापार करण्याची इच्छा त्यांच्या मनांत प्रादुर्भूत झाली हें दर्शविलें असतें तर फार चांगलें झालें असतें. कारण कवीप्रमाणें व्यापारी कांहीं जन्मतःच निर्माण होत नसतात !

महाराष्ट्रीय तरुणांचें व्यापाराकडे लक्ष ओढलें जावें या उद्देशाबरहुकूम कादंबरीचा परिणाम त्यांच्या मनावर होईल असें मात्र वाटतें.

भांडवलवाले लोक किती त्रास देतात हे मात्र या कादंबरींत चांगल्या रीतीनें विशद करून दाखविलें आहे.

कादंबरीची भाषा साधारण बरी आहे. कांहीं कांहीं वेळां तर संपादकाच्याच लेखणीची चुणूक भासते. पुस्तक संग्राह्य आहे.

अरुणः—पुण्याच्या ' महाराष्ट्र–कुटुंब–माले 'चें हें नवीन पुष्प गणेश प्रिंटिंग प्रेसचे व्यवस्थापक रा. ग. का. गोखले यांनीं गुंफलें आहे. ' महाराष्ट्र–कुटुंब माले 'चीं आजपर्यंतचीं प्रायः सगळींच पुस्तकें संपादकांनीं आरंभीं जाहीर केलेल्या ध्येयानुसार निघालीं आहेत. महाराष्ट्राच्या सध्यांच्या निकृष्ट परिस्थितींत गरीब व मध्यम स्थितींतल्या लोकांना आपल्या आयुष्याचें ध्येय ठरविण्यास, या पुस्तकांतील दोन तीन पुस्तकांचें सहाय्य होण्यासारखें असलें, तरी एक दोन पुस्तकें सोडल्यास बाकीच्या पुस्तकांत कादंबरीची रमणीयता मात्र अल्प प्रमाणांतच वाचकांना आढळून येते. स्वतःचें ध्येय ठरविण्याच्या हेतूनें ' महाराष्ट्र–कुटुंब–माले 'चीं पुस्तकें वाचण्यास आतुर असणाऱ्या वाचकांपेक्षां सामान्यतः कादंबऱ्या वाचणाऱ्या शौकिन वाचकांचीच संख्या जास्त असेल. तशांत स्वखर्चानें कादंबरी—

इतकेंच काय, पण एक आण्याचें वर्तमानपत्र घेण्याचेंही औदार्य आमच्या महाराष्ट्रीय वाचकांच्या अंगीं अत्यंत अल्प प्रमाणांत वसत असल्यामुळें, अशा—म्हणजे ध्येयाचा रुक्ष पाल्हाळ जास्त आणि कादंबरीची रम्यता कमी अशा कादंबऱ्यांना जास्त आश्रय मिळूं शकत नाहीं. कादंबरी ध्येयविशिष्ट तर असावीच; पण शर्करावगुंठित क्विनाइनच्या गोळीप्रमाणें तें ध्येय वाचकांच्या गळीं उतरतांना त्यांना त्याची कटुता न जाणण्याइतकी कादंबरीची सजावट रम्य होणें जरूर असतें. त्याचप्रमाणें कादंबऱ्यांच्या नांवाकडेही चालकांनीं विशेष लक्ष पुरवलें पाहिजे. 'न्याय' 'मजूर' 'कारकून' 'व्यापारी' ही कादंबरीचीं नांवें कादंबरीच्या अंतरंगाची कल्पना वाचकांना चटकन् करून देतात आणि त्यामुळें त्या कादंबरींत काय असेल हें जाणण्याची उत्कंठा त्यांना लागत नाहीं. फुलें दृष्टिसुख देत असली तरी तीं सुंदरशा 'फ्लावरपॉट'मध्यें ठेवल्यावर जशीं जास्त सुंदर दिसतात, तशींच कादंबऱ्यांच्या नांवाबाबतींतही काळजी घेणें जरूर असतें.

प्रस्तुत 'व्यापारी' ही कादंबरी, विषय रुक्ष असतांही लेखकानें कुशलतेनें रंगविली असल्यामुळें कंटाळा आणीत नाहीं. सबंध कादंबरी हें विनायकाचें आत्मचरित्र आहे आणि तें 'कव्या'नें वाचकांपुढें ठेवलें आहे असें लेखकानें दाखवलें असल्यामुळें, तें ध्यानांत येण्यापूर्वी दुसऱ्या प्रकरणाकडे वाचक थोडाफार घुटमळन जातो. बहुतेक प्रत्येक प्रकरणांत आरंभीं विनायकरावांना लेखकानें तृतीय पुरुषी म्हणून वाचकांपुढें आणलें आहे; हाही पुनःपुनरुक्तीचा दोष टाळला असता तर बरें झालें असतें. ही पद्धत अरेबियन नाइट्स'च्या वळणावर गेलेली दिसते. मधून मधून कांहीं वाक्यें इंग्रजी वळणाचीं दिसतात. पहिलीं दोन प्रकरणें बऱ्याच कुशलतेनें रंगविलीं आहेत. 'माले'च्या पुस्तकांत 'चिमणी' आणि 'माझें बाळ तें' यानंतर आम्हीं याच पुस्तकाचा अनुक्रम लावतों.

तुतारी:—नीरस नांवाची पण सरस अंतरंगाची ही कादंबरी पुण्याच्या 'महाराष्ट्र–कुटुंब–माले'चें बारावें पुष्प म्हणून प्रसिद्ध झाली आहे. खेड्यापाड्यांतील कुटुंबांना उद्योगधंद्यांना प्रवृत्त करणारीं मार्गदर्शक पुस्तकें प्रसिद्ध

करणें हें या मालेचें ध्येय आहे. या ध्येयानुसार प्राय: सारींच पुस्तकें निघालीं आहेत. सामान्य वाचकांचें मनोरंजन आणि ध्येयवादी वाचकांसाठीं ध्येयदर्शन, यांचा मिलाफ करण्याचा प्रयत्न प्रत्येक पुस्तकांतून करण्यांत आला आहे. पण प्रस्तुत 'व्यापारी' कादंबरीइतकें मनोरंजनाचें आणि ध्येयदर्शनाचें सुंदर मिश्रण एकाही पुस्तकांत आम्हाला तितकेसें आढळून आलें नव्हतें. या कादंबरींत विशेष रम्यत्व येण्याचें कारण म्हणजे ती आत्मचरित्रपर आहे.

ह्या कादंबरीचें कथानक म्हणजे विनायकाचा बाळपणापासूनचा इतिहास आहे. त्याच्या व्यापारी वृत्तीचा पायंडा शाळेंत पडला. ड्रॉइंगच्या तासावेळीं त्याच्या दोघां मित्रांकडून एकंदर सहा पैसे घेऊन त्यानें तीन पेन्सिली आणून दोघांना दोन दिल्या आणि स्वतःचें कमिशन म्हणून एक पेन्सिल स्वतःला ठेविली ! यानंतर कागद, वह्या, रबर, चॉकलेटें इत्यादि वर्गांतल्या वर्गांत विकून त्यानें फायदा मिळवलेल्या एका रुपयावर शाईचा कारखाना सुरू केला. प्रस्तुत कथानायक अनेक संकटांतून गेला आहे. व्यापाराकडे त्याचा विशेष कल असल्यामुळें बुद्धिवान असून देखील त्याचें अभ्यासाकडे दुर्लक्ष होई. अखेर त्याला आबासाहेब नांवाचे कोणी एक गृहस्थ गोंवें प्रांतांत विद्यार्थ्यांचा स्वतः खर्च चालवून आपल्या उद्योगशाळेंत त्यांना उद्योगधंद्याचें शिक्षण देत असल्याचें 'केसरी' वरून कळलें आणि त्याला तेथें जाण्याची तळमळ लागली. मातापितरांच्या इच्छेविरुद्धही तो तेथें गेला. मध्यंतरीं राजद्रोहाच्या आरोपावरून आबासाहेबांना तुरुंगवास पत्करावा लागला. तेथें कष्टांत दिवस काढीत असतांना वडिलांच्या आजाराची तार आल्यामुळें त्याला परत घरीं जावें लागलें आणि गोंव्याचा एक चळवळ्या म्हणून त्याचें नांव वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झाल्यामुळें वडिलांची नोकरी गेली तशी आपल्या नोकरीवरही गदा येऊं नये या इच्छेनें त्याचा भाऊ, त्यानें घरांत पाय ठेवला त्याच वेळीं बाहेर पडतो. पुढें व्यापारानिमित्त भांडवल मिळावें म्हणून तो एका श्रीमंत मनुष्याच्या कुरूप मुलीशीं लग्न करतो; पण त्या श्रीमंतानें आपली कुरूप

मुलगी खपविण्यासाठींच ही उसनी श्रीमंती आणली होती हें पुढें उघड-कीला आल्यावर विनायक चिडतो; पण त्याचा राग आपल्या बायकोवर न काढतां तिला तो ममतेनें वागवतो.पुढें एका डॉक्टरच्या सल्ल्यावरून बाजा-रांत बरेंच गिऱ्हाईक असलेलें पण किळसवाणें असें एक औषध तो तयार करतो व बायकोच्या साहाय्यानें त्या धंद्यांत यश संपादन करतो. त्याच दरम्यान त्याला पुण्याला जावें लागतें व तेथील एका नाटककंपनीं-तील 'मास्तरा'शीं—नाटककाराशीं त्याची चांगलीच जानपछान होऊन तो त्यांच्या दोन नाटकाचें प्रकाशन स्वतःच्या शिरावर घेतो व आपल्या बाबू कानडे नांवाच्या मित्राकडून उसनावर रक्कम घेऊन पुस्तकें प्रसिद्ध करतो. पण लवकरच बाबू कानड्याची बुद्धि फिरून तो उसनवार दिलेल्या पैशाबद्दल त्याची पाठ पुरवून अखेर त्याच्या विरुद्ध कोर्टांत दावा करतो आणि विनायकाच्या दुर्दैवानें तो जिंकतो. पण ऐन वेळीं 'मास्तर' तेथें दाखल होतात आणि बाबू कानडयाची कानउघाडणी करतात. त्यामुळें विनायक त्या संकटांतून निभावून पुढें आपलें बस्तान नीट जमवून एकंदर अठरा कारखाने काढतो.

या कथानकांत प्रेमाचा यत्किंचितही संबंध नाहीं; पण कादंबरी रसाळ झाली आहे. 'अरेबियन नाइट्स्' प्रमाणें आपल्या आयुष्याचा इतिहास विनायकानें आपल्या मित्राला व त्याच्या पत्नीला आणि मुलांना रोज रात्रौ थोडथोडा सांगितला आहे. आणि त्यांत 'अरेबियन नाइट्स्' प्रमाणें अद्भुत रम्य प्रसंग नसले तरी लेखकानें वाचकांना कुतुहल उत्पन्न होईल इतक्या कुशलतेनें प्रत्येक प्रकरण तोडलें आहे. मात्र प्रायः प्रत्येक प्रकर-णाच्या आरंभीं कांहीं भाग विनायकाच्या रात्र होईपर्यंतच्या कामाचा पाढा दिला आहे तो रसभंग करणारा झाला आहे.

या कादंबरीचें पहिलें प्रकरण विद्यार्थ्यांच्या बालस्वभावाचें चांगलेंच निदर्शक आहे. नाटककंपनींतील 'मास्तर' हें गडकऱ्याचें पात्र असावें असा त्यांच्या एकंदर वर्णनावरून भास होतो. लेखकाच्या पेशाचा त्याच्या लेखनावर परिणाम बव्हंशीं घडून येत असतो हें 'सुखस्वप्नें' या पुस्तका-

वर टीका करतांना आम्हीं जें विधान केलें होतें तें या पुस्तकालाही लावून पाहण्यासारखें आहे. पुस्तकावर ज्यांचें नांव आहे ते लेखक रा. गणेश काशिनाथ गोखले हे पुण्याच्या श्री गणेश प्रिंटिंगप्रेसचे व्यवस्थापक आहेत; आणि त्यामुळें आपल्या पेशाची आपल्या कृतीवर छाप पाडून त्यांनीं छापखाना, फाउंड्री, पेपरमर्चंट इत्यादिकें नायकाला मालक केलें आहे!

ध्येय राखतांना थोडासा धंदाही चालकांनीं पाहाणें जरूर असतें. म्हणून व्यवहाराकडे दुर्लक्ष न करतां संपादकांनीं कादंबऱ्यांच्या नांवाच्या बाबतींत थोडेंसें माधुर्य आणावें, अशी त्यांना आमची अल्पसूचना आहे. रुक्ष नांवांनीं वाचकांचें आकर्षण होणें सद्यःस्थितींत अवघड आहे. म्हणून प्रस्तुत मालेच्या कादंबऱ्या कितीही उत्कृष्ट असल्या तरी त्यांच्या नांवांमुळें वाचकांचें तिकडे आकर्षण होईल असें वाटत नाहीं. कादंबरीच्या मानानें किंमत एक रुपया फारशी जास्त नाहीं.

**चाबूकस्वारः**—प्रसिद्ध लेखक व नाटककार श्री. ना. वि. कुळकर्णी, यांनीं आपल्या संपादकत्वाखालीं पुण्यास सुरू केलेल्या 'महाराष्ट्र कुटुंब माले'च्या ३ ऱ्या वर्षाचें अखेरचें पुष्प श्री. ग. का. गोखले यांनीं लिहिलेलें असून, तें नुकतेंच आमचेकडे अभिप्रायार्थ आलेलें आहे. सदर्हू लेखक गृहस्थ यांची छापखान्याच्या धंद्यांतील हुषार व कर्तबगार तज्ज्ञ या नात्यानें बरीच प्रसिद्धि असून, वाङ्मयप्रांतांत त्यांनीं हा प्रथमच प्रवेश केलेला आहे. कांहीं नवे लेखक जुन्या मुरलेल्या लेखकांसही मागें टाकणारी वाङ्मयमूर्ति क्वचितप्रसंगीं घडवतात, परंतु गोखले यांस तें यश मिळण्यास अद्याप अवकाश आहे, असें त्यांच्या या 'व्यापारी' कृतीवरून म्हणावें लागतें. कादंबरीसाठीं विषय निवडण्यांत गोखले यांनीं सर्वस्वी जरी नाहीं तरी बरीचशी नवीनता दाखविली असून, ती त्यांच्या स्वतःच्या उद्योगप्रेमास उचित आहे यांत संशय नाहीं. व्यापाऱ्यानें—कथानायक विनायकरावानें—आपलें चरित्रवृत्त आत्मकथनाच्या रूपानें आपल्या दिनकर—त्याची बायको कमला—या दोघांचीं मुलें प्रभाकर—मनोहर इ. लहानथोर मित्र मंडळाला, तो कांहीं कामानिमित्त सहज पुण्यास त्यांचेकडे आला होता

त्यावेळीं–त्याच्या आग्रहावरून सांगितली आहे आणि ती चटकदार वठली आहे हें खरें असलें तरी 'कादंबरीकले' स या पद्धतीनें हानि पोंचते, हें लेखक नवा असल्यामुळें त्याच्या लक्षांत आलेलें दिसत नाहीं. त्यापेक्षां संवादरूप आत्मचरित्र असें यास म्हणणें जास्त योग्य होईल. "विनायक व दिनकर हे बालमित्र होते, पण परिस्थितीच्या प्रवाहांत सांपडलेला दिनकर नोकरीवाला बनतो आणि त्याचा मित्र विनायक हा परिस्थितीचे प्रवाहांत न सांपडतां अनेक टक्केटोणपे खाऊन व हालअपेष्टा सोसून एक बडा धंदेवाला बनतो," हें या व्यापारी पुस्तकाचें सार आहे. ही गोष्ट जुनी म्हणजे सुमारें ६—७ सालची असल्यानें त्यावेळच्या राष्ट्रीय चळवळी व पुढाऱ्यांचेंही प्रसंगोचित असें रसभरित वर्णन आलेलें असून, एका पुढाऱ्याच्या उपदेशामुळेंच विनायकाची व्यापाराकडे दृष्टि वळते, व शाळेंत असल्यापासूनच त्याच्या व्यापारविषयक प्रीतीची शिसपेन, शाई, सिनेमा मॅनेजर, औषधविक्या, नाट्यपुस्तक–प्रकाशक, छापखाना, फाऊंडरी, पेपरमर्चंट इ. धंदे एकाहून एक वरचढ अशा प्रकारें केल्यामुळें प्रगति होते व शेवटीं कागदाची गिरणी काढण्यासाठीं विलायतची वारी करून येण्याचाही त्याचा निश्चय होतो. पुढाऱ्याची शिकवण, शाळेंत जाऊन बसण्याऐवजीं जिन्नस विकण्यासाठीं एका व्यापाऱ्याचे दुकानीं हेलपाटे घालण्याची हौस यामुळेंच विनायकाची इतकी उन्नति झाली व तो 'समजूतदार भांडवलवाला' बनल्यामुळें–केवळ विवेकभ्रष्ट व्यापारी न राहिल्यानें, समाजाच्या उपयोगीही त्यास थोडेंबहुत पडतां आलें. या कादंबरींतील गमतीची गोष्ट म्हणजे विनायकास पहिल्याप्रथम सांगून आलेली मुलगीच पुढें त्याच्या मित्राच्या–म्हणजे दिनकरच्या–पत्नीपदीं विराजमान झालेली असते व हे दिनकरनें विनायकास सांगेपर्यंत ठाऊक नसतें. एकंदरींत, कादंबरीचा विषय बराचसा नवीन व लेखकही नवा–पण उद्योगधंद्याचा अभ्यासू आणि लेखनविषयाचा जिज्ञासू असल्यामुळें, हें छोटेसें पुस्तक चटकदार व चांगलें झालें आहे. आतां, त्यांत कादंबरी-कलेच्या स्वभावपरिपोषण–वाचकांच्या मनांचें आकर्षण इ० गोष्टींस धोका

पोंचला आहे हें नाकबूल करण्यांत इंशील नाहीं. याखेरीज कविलोकांचा काव्यव्यवसाय हा बायकी होय, व्यापारी वर्गांत शिरणारा मनुष्य उनाडच व अशिक्षितच असावयाचा. सगळ्याच लोकांनीं व्यापारांत पडलें पाहिजे असलें जें घातक तत्त्वज्ञान विनायकाचे तोंडून प्रतिपादण्यांत आलें आहे तेंही अतिशय चुकीचें व भ्रामक समजुतींचें निदर्शक आहे, तसेंच विनायक गोव्यास तेथील आबासाहेबांच्या उद्योगशाळेंत शिकावयास गेला असतां, त्याचे गुरुवर्य आबासाहेब यांस ते क्रांतिकारक असल्याचें आरोपावरून ब्रि. सरकारकडून पकडण्यांत येतें, असा जो यांत अस्पष्ट उल्लेख आहे तो 'पोर्तुगीज सरकारवर ब्रि. सरकारचा अंमल चालत नाहीं' या संबंधींच्या लेखकाच्या अज्ञानाचा निदर्शक दिसतो. पुस्तकाची किं. १ रु. असून, त्याची बांधणी कव्हर हेंही जणूं व्यापारी पद्धतीस अनुसरून व्हावें अशा कल्पनेनेंच कीं काय मारवाडी थाटाचें बनवण्यांत आलें आहे.

